# श्रीमद्भगवद्गीता.

श्लोक, पदें, अन्वय आणि मराठी अर्थासहीत.

( आवृत्ति दुसरी. )





किंमत १। रुपया.

ॐ तत्सत्

# श्रीमद्भगवद्गीता.

श्लोक, पदें, अन्वय आणि मराठी अर्थ.

## आवृत्ति दुसरी.

या पुस्तकांतील भाषांतर रा. सा. केशव जनार्दन पाटणकर आणि रा. रा. सदाशिव विश्वनाथ वैद्य यांनीं अनेक ग्रंथांच्या आधारें तयार केलें व तें रा. रा. लक्ष्मण पांडुरंग भोसेकर यांनीं तपासून शुद्ध केलें.

हें पुस्तक रा० दत्तात्रय गणेश खांडेकर यांनीं पुणें येथें लॉ प्रिंटिंग छापखान्यांत छापलें व रा. सा. केशव जनार्दन पाटणकर यांनीं पुणें पेठ सदाशिव घर नंबर ~~३०२~~ ५३३ येथें प्रसिद्ध केलें.

शके १८४१. सन १९१९.

# प्रस्तावना.

श्रीमद्भगवद्गीतेचीं पुष्कळ भाषांतरें झालीं आहेत, परंतु ज्याला संस्कृत भाषा येत नाहीं त्याला श्लोकांचीं पदें, अन्वय वगैरेचा बोध होऊन स्पष्ट रीतीनें श्लोकांचा अर्थ समजण्यासारखें मराठींत भाषांतर झालेलें नव्हतें. मला स्वतःला ही अडचण फारच भासली. माझ्या एका सन्माननीय बंधूनीं गीतेचें अध्ययन करण्याची रीत सुचविली ती अशी:—दररोज रात्रीं निजण्यापूर्वी एक श्लोक, त्याचा पूर्ण अर्थ समजून घेऊन पाठ करावा. पहांटेस स्नानसंध्या झाल्यावर रात्रीं पाठ केलेल्या श्लोकाचें मनन करावें व साधारणपणें त्याच अर्थाचे पुढें किंवा मागें गीताग्रंथांत आलेले किंवा इतर ग्रंथांत वाचलेले श्लोक असतील त्यांतील अर्थामध्यें विशेष फरक काय आहे याचा तुलनात्मक रीतीनें सांगोपांग विचार करावा. अशा चिकित्सक दृष्टीनें परीक्षण झाल्यावर आपण शांत रीतीनें तदंतर्गत एकंदर विषयाचें मनन करीत स्वस्थचित्त व्हावें. या रीतीनें आपल्या चिकित्सक बुद्धीची वाढ होऊन सत्वसंशुद्ध बुद्धीचीही हळूहळू जागृति होईल आणि निवळ शब्दार्थ व भाष्य यांच्या पलीकडे गति जाऊन तत्वज्ञानविषयक गुढार्थ स्पष्ट होत जाईल. श्लोकांत सांगितल्याप्रमाणें आपलें आचरण होत आहे किंवा कसें यावर सारा दिवस दक्षता ठेऊन रात्रीं दुसरा श्लोक पाठ करण्यापूर्वी त्या दिवसाच्या आचरणांत सद्वर्तन किती झालें व प्रमाद किती झाले यांची नोंद आपल्या रोजनिशींत करून ठेवावी व कांहीं चुका होत असतील तर त्या सुधारण्याचा सारखा प्रयत्न करीत राहावें. “ गीताध्ययन करणें तें असें करीत जा ” अशी समज मिळाल्यानंतर त्या उद्योगाला लागलों. संस्कृत भाषेचें ज्ञान नसल्यामुळें गीतेचे श्लोक नीट वाचतां येईनात. तेव्हां ज्या ग्रंथांत भगवद्गीतेचा अर्थ केला आहे अशा बऱ्याच ग्रंथांचा संग्रह करून मला पाहिजे होतें तसें भाषांतर लिहून काढण्याला मीं सुरवात केली. चार अध्यायांचें भाषांतर होऊन छापून निघण्यास सुमारें एक वर्ष लागलें. नंतर माझे मित्र रा. रा. सदाशिव विश्वनाथ वैद्य यांनीं या कामीं मदत केल्यानें सर्व अध्यायांचें भाषांतर होऊन मंडळीकडे लवकर पाठवितां आलें. भाषांतर शुद्ध करण्याचें काम रा. रा. लक्ष्मण पांडुरंग भोसेकर यांनीं केलें. उभयतांच्या मदतीबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

प्रथमावृत्तीच्या प्रती शिल्लक नसून ग्राहकांच्या बऱ्याच मागण्या आल्यामुळें पूर्वीच्या आवृत्तींत सुधारणा करून ही दुसरी आवृत्ति काढली आहे. ही आवृत्ति काढण्याला ज्या मित्रमंडळींनीं द्रव्यद्वारा सहाय केलें त्यांचाही मीं फार आभारी आहें.

लेखक [illegible]कर.

# गीताध्यानम् ( संस्कृत )

पार्थाय प्रतिबोधितां भगवता नारायणेन स्वयं
व्यासेन ग्रथितां पुराणमुनिना मध्ये महाभारते ।
अद्वैतामृतवर्षिणीं भगवतीमष्टादशाध्यायिनी—
मंब त्वामनुसंदधामि भगवद्गीते भवद्वेषिणीम् ॥ १ ॥

नमोऽस्तु ते व्यास विशालबुद्धे
फुल्लारविंदायतपत्रनेत्र ।
येन त्वया भारततैलपूर्णः
प्रज्वालितो ज्ञानमयः प्रदीपः ॥ २ ॥

प्रपन्नपारिजाताय तोत्रवेत्रैकपाणये ।
ज्ञानमुद्राय कृष्णाय गीतामृतदुहे नमः ॥ ३ ॥

सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः ।
पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥ ४ ॥

वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनं ।
देवकीपरमानंदं कृष्णं वंदे जगद्गुरुम् ॥ ५ ॥

× × × × ×

× × × × ×

भीष्मद्रोणतटा जयद्रथजला गांधारनीलोत्पला ।
शल्यग्राहवती कृपेण वहिनी कर्णेन वेलाकुला ॥
अश्वत्थामविकर्णघोरमकरा दुर्योधनाऽवर्तिनी ।
सोत्तीर्णा खलु पांडवै रणनदी कैवर्तकः केशवः ॥ ६ ॥

## टीका समश्लोकी ( प्राकृत )

सांगे ज्या तुजला स्वयेंचि भगवान् श्रीकृष्ण पार्थाप्रती
ज्या तूं ते ग्रथिलेंहि आद्य–मुनिनें व्यासें महाभारतीं
वेदान्ताद्वय वर्षलीस अठरा अध्यायिं जी तूं जनीं
ध्यातों त्या तुज हे भवारि, जननी, गीते महाभागिनी ॥ १ ॥

व्यासा, महाप्रज्ञ विशाल नेत्रा ।
माझा नमस्कार तुला पवित्रा ॥
जेणें महाभारतरूप तैलें ।
त्वां ज्ञानदीपा जनिं पाजळीलें ॥ २ ॥

आश्रितांचा कल्पवृक्ष । ज्ञानमुद्रांकुशा करी ॥
जो धरी, नमितों कृष्णा । त्या गीतामृतदोहका ॥ ३ ॥

सर्वही वेद या गाई । दोही गोपालनंदन ॥
भोक्ता वत्स सुधीः पार्थ । दूध गीता सुधाचि हे ॥ ४ ॥

पुत्र जो वासुदेवाचा । कंस चाणूर घातकी ॥
देवकी-हर्षदायी, तो । वंदूं कृष्ण जगद्गुरु ॥ ५ ॥

भीष्म–द्रोणाचि हे महातट जिला, पाणी जिचें सिंधुप[1] ॥
गांधारीसुत हे निळीं सुकमलें तो नक्र मद्राधिप[2] ॥
संपूर्णा भरतीच कर्ण, कृप हा ओघा जिच्या दाखवी ।
अश्वत्थाम, विकर्ण घोर मकरां जी स्वोदरीं साठवी ॥
ऐशा युद्ध–नदींतुनी परतिरां गेले सुखें पांडव ।
नावाडी मिळला तयां कुशल हा भक्ताश्रयी[3] केशव ॥ ६ ॥

---

[ १ ) सिंधदेशाचें पालन करणारा सिंधुराजा = जयद्रथ [ २ ] म
देशाचा अधिप = स्वामी, धनी = शल्य. [ ३ ] भक्तांचा आश्रय करणा
भक्ताधीन

× × × × ×
× × × × ×
× × × × ×
× × × × ×

पाराशर्यवचः सरोजममलं गीतार्थ गंधोत्कटम् ।
नानाख्यानककेसरं हरिकथासंबोधनाबोधितम् ।।
लोके सज्जनषट्पदैरहरहः पेपीयमानं मुदा ।
भूयाद्भारतपंकजं कलिमलप्रध्वंसि नः श्रेयसे ॥ ७ ॥

मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम् ।
यत्कृपा तमहं वंदे परमानंदमाधवम् ॥ ८ ॥

यं ब्रह्मावरुणेंद्ररुद्रमरुतः स्तुन्वंति दिव्यैः स्तवै-
र्वेदैः सांगपदक्रमोपनिषदैर्गायंति यं सामगाः ।
ध्यानावस्थिततद्गतेन मनसा पश्यंति यं योगिनो
यस्यांतं न विदुः सुरासुरगणा देवाय तस्मै नमः ॥ ९ ॥

॥ इति ध्यानम् ॥

—— ——

व्यासाचें वच हें सरोवर, तया मार्जांच जें जन्मलें ।
हा गीतार्थ गमे सुवासचि, तयें सौगंध्य ज्या लाभलें ।।
आख्यानें बहु, तेंचि केसर जयामाजीं, तयें शोभलें ।
देवाचा इतिहास बोधपर जो तेणें विकासे खुलें[४] ।।
भृंग सज्जन हे जयांतिल रसा प्याया सुखें गुंतले ।
टाकी ध्वंसुनि पाप–ताप कलिचे जें आपुल्याचो बळें ।।
ऐसें भारतपंकज[५] क्षितितलीं जें आपणां लाभलें ।
तें सर्वत्र करो सदैव आमुचें सर्वा–जनांचें भलें[६] ।। ७ ।।

बोलवीते मुक्याला हा । पांगळ्या लंघवी गिरी ।
कृपा ज्याची वंदितो त्या । परमानंद माधवा ।। ८ ।।

ज्या देवा स्तवितात इंद्र, वरुण, ब्रह्मा, मरुत्, रुद्र ही ।
गातो ज्यासचि, सामगायक, पदीं वेदक्रमीं[७] सांग ही ।।
योगी तद्गत एकचित्त करुनी ध्यानस्थ ज्या पाहती ।
ज्याचा अंत सुरासुरांहि न, तया देवास माझी नती[८] ।।९।।

ल. पां. भोसेकर

— – ——–—

( ४ ) खुलें=उघलें होई किंवा शोभे. ( ५ ) कमल. ( ६ ) कल्याण.
( ७ ) ( वेदाचीं ) पदें व क्रम त्यांनीं. ( ८ ) नमस्कार.

## नमः परमात्मने ।



गोविंदं त्रिभुवनपालकं दयाब्धिम् ।
चित्कंदं सुखनिलयं विकारशून्यं ॥
वंदे तं विजयमनोगतं समस्तं ।
संदेहं मधुरगिरारणेऽहरद्यः ॥ १ ॥

# श्रीमद्भगवद्गीता.

## प्रथमोऽध्यायः

धृतराष्ट्र उवाच—**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।**
**मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥**

**धर्मक्षेत्रे**=धर्मस्य क्षेत्रे ( पवित्र स्थळीं ) **कुरुक्षेत्रे**=कुरोः क्षेत्रे (कुरुक्षेत्रामध्यें ) **समवेताः** ( जमलेले ) **युयुत्सवः** ( युद्धाकारितां उत्सुक झालेले ) **मामकाः** ( माझे; दुर्योधनादि माझे पुत्र व त्यांचे स्नेही; कौरव ) **पांडवाः**=पांडोः पुत्राः ( पांडूचे मुलगे धर्मादि आणि त्यांचे स्नेही; पांडव ) **च** ( आणि ) **एव** ( सुद्धां ) **किं** ( काय ) **अकुर्वत** ( करिते झाले ) **संजय** ( हे संजया ! )

संजय, धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेताः युयुत्सवः मामकाः च पांडवाः किं एव अकुर्वत.

धृतराष्ट्र म्हणालाः—हे संजया ! पवित्र कुरुक्षेत्रस्थानीं युद्धाविषयीं उत्सुक होऊन जमलेले माझे कौरव आणि पांडव यांनीं काय केलें? ॥ १ ॥

संजय उवाच—**दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।**
**आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥**

---

( १ ) संजय हा प्रसिद्ध पुराणीक सूत यांचा मुलगा. ( २ ) 'कुरुक्षेत्र' हें नांव दिल्लीजवळ यमुना व सरस्वति या दोन नद्यांच्या मधील मैदानास आहे. कौरवपांडवांचा पूर्वज कुरु नांवाचा राजा या मैदानांत नांगर धरून नांगरीत होता, म्हणून याला क्षेत्र ( शेत ) असें म्हणतात.

**दृष्ट्वा** ( पाहून ) **तु** ( खरोखर ) **पांडवानीकं**=पांडवानां अनीकं ( पांडवांची सेना ) **व्यूढं** ( व्यूह रचून तयार असलेली ) **दुर्योधनः** ( दुर्योधन ) **तदा** ( तेव्हां ) **आचार्यं** ( गुरु द्रोणाचार्यांकडे ) **उपसंगम्य** ( जवळ जाऊन ) **राजा** ( राजा दुर्योधन ) **वचनं** ( भाषण ) **अब्रवीत्** ( बोलला ).

तदा पांडवानीकं व्यूढं तु दृष्ट्वा राजा दुर्योधनः आचार्यं उपसंगम्य वचनं अब्रवीत्.

संजय म्हणालाः—त्यावेळीं व्यूह रचून तयार असलेली पांडवांची सेना पाहून राजा दुर्योधन गुरु द्रोणाजवळ जाऊन ( पुढें सांगितल्याप्रमाणें ) बोलला ॥ २ ॥

**पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।**
**व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ॥**

**पश्य** ( पहा ) **एतां** ( ही ) **पांडुपुत्राणां**=पांडोः पुत्राणां ( पांडुपुत्रांची ) **आचार्य** ( हे गुरो ) **महतीं** ( मोठी ) **चमूं** ( सेना ) **व्यूढां** ( व्यूह रचून तयार केलेली ) **द्रुपदपुत्रेण**=द्रुपदस्य पुत्रेण ( द्रुपद राजाचा पुत्र ‘धृष्टद्युम्न’ यानें ) **तव** ( तुझ्या ) **शिष्येण** ( शिष्यानें ) **धीमता** ( शहाण्या ).

आचार्य, तव धीमता शिष्येण द्रुपदपुत्रेण व्यूढां एतां महतीं पांडुपुत्राणां चमूं पश्य.

हे गुरो ! आपल्या हुषार शिष्यानें–धृष्टद्युम्नानें–व्यूह रचून तयार केलेली ही मोठी पांडवांची सेना पहा ॥ ३ ॥

**अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।**
**युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥**

**अत्र** ( येथें, या पांडवसेनेमध्यें ) **शूराः** ( शूर ) **महेष्वासाः**=महांतः इष्वासाः येषां ते ( मोठालीं धनुष्यें आहेत ज्यांचीं ते ) इष्वासः=इषुनां आसः ( आसनं, स्थानं ) इष्वासः ( बाणांचें आसन=शरासन, धनुष्य ) **भीमार्जुनसमाः**=भीमस्य अर्जुनस्य समाः ( भीमाच्या, अर्जु-

नाच्या बरोबरीचे, तोडीचे ). युधि ( युद्धांत ) युयुधानः ( सात्यकी ) विराटः ( विराट ) च ( आणि ) द्रुपदः ( द्रुपद ) च ( आणि ) महारथः=महान् रथो यस्य सः ( ज्याचा रथ मोठा आहे तो; युद्ध कलेंत दहा हजार धनुर्धाऱ्यांशीं एकटा लढावयास समर्थ असणाऱ्याला 'महारथी' असें म्हणतात ).

अत्र शूराः महेष्वासाः युधि भीमार्जुनसमाः युयुधानः च विराटः च द्रुपदः महारथः

या पांडवसेनेमध्यें शूर, महाधनुर्धारी आणि समरांगणांत भीमार्जुनांची बरोबरी करणारे असे महारथी सात्यकी आणि विराट आणि द्रुपद, ॥ ४ ॥

**धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।**
**पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ ५ ॥**

धृष्टकेतुः ( धृष्टकेतु, चेदिराजा ) चेकितानः ( चेकितान ) काशिराजः=काश्याः राजा ( काशीचा राजा ) च ( आणि ) वीर्यवान् ( वीरपुरुष, बलवान ) पुरुजित् ( पुरुजित् ) कुंतिभोजः ( कुंतिभोज ) च ( आणि ) शैब्यः ( शैब्य ) च ( आणि ) नरपुंगवः=नरेषु पुंगवः ( मनुष्यांमध्यें श्रेष्ठ, नरश्रेष्ठ )

धृष्टकेतुः, चेकितानः, च काशिराजः वीर्यवान्, पुरुजित्, कुंतिभोजः, च शैब्यः नरपुंगवः.

धृष्टकेतु ( चेदिराजा ), चेकितान, आणि बलवान् काशिराजा, पुरुजित, कुंतिभोज आणि शैब्य हे नरश्रेष्ठ, ॥ ५ ॥

**युधामन्युश्च विक्रांत उत्तमौजाश्च वीर्यवान् ।**
**सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥**

युधामन्युः ( युधामन्यु ) च ( आणि ) विक्रांतः ( महापराक्रमी ) उत्तमौजाः ( उत्तमौजा ) वीर्यवान् ( वीरपुरुष ) सौभद्रः ( सुभद्रेचा मुलगा अभिमन्यु ) द्रौपदेयाः ( द्रौपदीचे प्रतिविंध्यादि पांच मुलगे ) च ( आणि ) सर्वे ( सर्व ) एव ( देखील ) महारथाः ( महारथी ).

( १ ) 'पुंगव' हा शब्द उत्तरपद झाला असतां श्रेष्ठवाचक होतो.

विक्रांतः युधामन्युः च वीर्यवान् उत्तमौजाः च सौभद्रः च द्रौपदेयाः सर्वे एव महारथाः.

महापराक्रमी युधामन्यु, आणि वीरपुरुष उत्तमौजा, आणि सुभद्रासुत अभिमन्यु, आणि द्रौपदीचे प्रतिविंध्यादि पांच मुलगे, हे सर्व महारथी ( पांडवसेनेमध्यें आहेत ) ॥६॥

**अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ।**
**नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७ ॥**

**अस्माकं** ( आमचे ) **तु** ( आतां, यापुढें ) **विशिष्टाः** ( प्रमुख ) **ये** ( जे ) **तान्** ( त्यांना ) **निबोध** ( लक्षांत घे ) **द्विजोत्तम** ( हे ब्राह्मणश्रेष्ठा ) **नायकाः** ( नायक, सेनाधिपति ) **मम** ( माझ्या ) **सैन्यस्य** ( सैन्याचे ) **संज्ञार्थं**=संज्ञायाः अर्थं ( ओळखण्याकरितां ) **तान्** ( त्यांना ) **ब्रवीमि** ( मी सांगतों ) **ते** ( तुला ).

द्विजोत्तम, अस्माकं तु ये विशिष्टाः तान् निबोध, मम सैन्यस्य नायकाः तान् ते संज्ञार्थं ब्रवीमि.

हे द्विजश्रेष्ठा! आतां यापुढें आमच्याकडील जे प्रमुख आहेत ते समजून घ्या; माझ्या सैन्यांत जे सेनाधिपति आहेत, ते कोणकोण, तें कळण्यासाठीं आपणांस सांगतों ॥ ७ ॥

**भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।**
**अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥**

**भवान्** ( आपण ) **भीष्मः** ( भीष्म ) **च** ( आणि ) **कर्णः** ( कर्ण ) **च** ( आणि ) **कृपः** ( कृपाचार्य ) **च** ( आणि ) **समितिंजयः**=समितिं जयति (सेनासमुदायाला जिंकणारा) **अश्वत्थामा** (अश्वत्थामा) **विकर्णः** ( विकर्ण ) **च** ( आणि ) **सौमदत्तिः** ( सोमदत्ताचा मुलगा, सौमदत्ति ) **तथा** ( त्याप्रमाणें ) **एव** ( देखील ) **च** ( आणि ).

भवान् भीष्मः च कर्णः च समितिंजयः कृपः च अश्वत्थामा, च विकर्णः च सौमदत्तिः तथा एव,

आपण, भीष्म व कर्ण, सेनासमुदाय जिंकणारे कृपाचार्य, आणि अश्वत्थामा, विकर्ण आणि त्याचप्रमाणें सौमदत्ति, ॥ ८ ॥

**अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।**
**नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥**

**अन्ये** ( दुसरे ) **च** ( आणि ) **बहवः** ( पुष्कळ ) **शूराः** ( शूर ) **मदर्थे**=मम अर्थे ( माझ्याकरितां ) **त्यक्तजीविताः**=त्यक्तं जीवितं यैः ते ( ज्यांनीं प्राण अर्पिले आहेत ते, जीवाची आशा न ठेवणारे ) **नानाशस्त्रप्रहरणाः**=नाना शस्त्राणि प्रहरणानि येषां ते ( शस्त्र म्हणजे ज्यानें जखम होते तें, तरवार इत्यादि; प्रहरण म्हणजे ज्यानें धक्का बसतो तें, गदा इत्यादि. अनेक प्रकारचीं शस्त्रें व गदा धारण करणारे ) **सर्वे** (सर्व) **युद्धविशारदाः**=युद्धे विशारदाः ( युद्धकलेंत निपूण ).

अन्ये च मदर्थे त्यक्तजीविताः नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः बहवः शूराः ( संति ).

आणखी दुसरे, माझ्याकरितां जीवाची आशा न ठेवणारे, अनेक प्रकारचीं शस्त्रें व गदा वगैरे धारण करणारे, सर्व युद्धकलेंत निपूण असे पुष्कळ शूर पुरुष आहेत ॥ ९ ॥

**अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।**
**पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥**

**अपर्याप्तं** (अपरिमित, अफाट) **तत्** ( तें ) **अस्माकं** ( आपलें ) **बलं** ( सैन्य ) **भीष्माभिरक्षितं**=भीष्मेण अभिरक्षितं ( भीष्मांनीं रक्षण केलेलें ) **पर्याप्तं** ( परिमित, मोजकें ) **तु** ( तर ) **इदं** ( हें ) **एतेषां** ( यांचें ) **बलं** ( सैन्य ) **भीमाभिरक्षितं** ( भीमानें रक्षण केलेलें ).

अपर्याप्तं अस्माकं तत् बलं भीष्माभिरक्षितं, तु पर्याप्तं इदं एतेषां बलं भीमाभिरक्षितं.

आमचें तें अफाट सैन्य भीष्मांच्या देखरेखीखालीं आहे, तर त्यांचें (पांडवांचें) हें मर्यादित म्हणजे मोजकें भीमाच्या देखरेखीखालीं आहे ॥ १० ॥

अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ।
भीष्ममेवाभिरक्षंतु भवंतः सर्व एव हि ॥ ११ ॥

**अयनेषु** ( सैन्याच्या रांगांमध्यें, नेमून दिलेल्या स्थानांवर अगर द्वारांवर ) **च** ( आणि ) **सर्वेषु** ( सर्वांमध्यें ) **यथाभागं** ( नेमलेल्या भागाला ) **अवस्थिताः** ( उभे राहून ) **भीष्मं** ( भीष्माला ) **एव** (मात्र) **अभिरक्षंतु** ( रक्षण करावें ) **भवतः** ( तुम्ही, आपण ) **सर्वे** (सर्व) **एव** ( सुद्धां ) **हि** ( खरोखर ).

सर्वेषु च अयनेषु यथभागं अवस्थिताः भवंतः सर्वे एव हि भीष्मं एव अभिरक्षंतु.

आणि सर्व रांगांमधून आपापल्या जागीं नेमल्याप्रमाणें उभे राहून आपण सर्वांनीं मिळून भीष्माचें संरक्षण करावें ॥ ११ ॥

तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः ।
सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥ १२ ॥

**तस्य** ( त्याला ) **संजनयन्** ( उत्पन्न करणारा ) **हर्षं** ( आनंद ) **कुरुवृद्धः** =कुरुषु वृद्धः (कौरवांमध्यें वडील असणारा) **पितामहः** (आजा = भीष्म ) **सिंहनादं** = सिंहस्य नादं ( सिंहाची गर्जना ) **विनद्य** ( आवाज करून ) **उच्चैः** ( मोठ्यानें ) **शंखं** ( शंख ) **दध्मौ** ( वाजविला ) **प्रतापवान्** ( प्रतापशाली ).

तस्य हर्षं संजनयन् कुरुवृद्धः प्रतापवान् पितामहः उच्चैः सिंहनादं विनद्य, शंखं दध्मौ.

(इतक्यांत) त्याला ( दुर्योधनाला ) आनंदवित होत्साते कौरवकुलाचे अतिवृद्ध आजे भीष्म यांनीं मोठ्यानें सिंहासारखी गर्जना करून आपला शंख ( युद्धाची सलामी म्हणून ) फुंकला ॥ १२ ॥

ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ।
सहसैवाभ्यहन्यंत स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १३ ॥



**ततः** ( त्यानंतर ) **शंखाः** ( शंख ) **च** ( आणि ) **भेर्यः** ( भेरी )

च (आणि) पणवानकगोमुखाः = पणवाः च आनकाः च गोमुखाः च ( झांज, ढोल व शिंगें ) सहसा ( एकदम, एका वेळीं ) एव ( देखील) अभ्यहन्यंत ( वाजविलीं गेलीं ) सः ( तो ) शब्दः ( ध्वनी, नाद ) तुमुलः ( प्रचंड, सर्वत्र भरून राहणारा ) अभवत् (झाला ).

ततः शंखाः च भेर्यः च पणवानकगोमुखाः च सहसा एव अभ्यहन्यंत सः शब्दः तुमुलः अभवत्.

त्यानंतर ( कौरवसेनेमध्यें ) शंख, भेरी, झांजा, ढोल, शिंगें इत्यादि रणवाद्यें एकदम वाजविण्यास आरंभ झाला आणि त्यांचा तो नाद सर्वत्र दुमदुमून राहिला ॥ १३ ॥

ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यंदने स्थितौ ।
माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥

ततः ( त्यानंतर ) श्वेतैः ( पांढऱ्या शुभ्र ) हयैः ( घोड्यांनीं ) युक्ते ( जोडलेले अशा ) महति ( मोठ्या ) स्यंदने ( रथामध्यें ) स्थितौ ( दोघे बसलेले ) माधवः ( श्रीकृष्ण ) पांडवः( अर्जुन ) च (आणि) एव ( देखील ) दिव्यौ ( दिव्य, दैवी ) शंखौ ( दोन शंख ) प्रदध्मतुः ( फुंकले ).

ततः श्वेतैः हयैः युक्ते महति स्यंदने स्थितौ माधवः च पांडवः एव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः.

त्यानंतर पांढरे शुभ्र घोडे जोडलेल्या मोठ्या रथांत बसलेले श्रीकृष्ण आणि अर्जुन यांनीं आपले शंख फुंकले ॥ १४ ॥

पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ॥
पौंड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥

पांचजन्यं ( ' पांचजन्य ' नांवाचा शंख ) हृषीकेशः = हृषीकाणाम् ईशः ( इंद्रियांचा स्वामी, श्रीकृष्ण ) देवदत्त ( ' देवदत्त ' नांवाचा शंख ) धनंजयः = धनं जयति इति. ( धन जिंकणारा, अर्जुन ) पौंड्रं ( 'पौंड्र' नांवाचा शंख ) दध्मौ ( फुंकला ) महाशंखं (मोठा शंख) भीमकर्मा =

भीमं कर्म यस्य सः ( भयंकर कर्म करणारा ) **वृकोदरः** = वृकस्य इव उदरं यस्य सः ( लांडग्यासारखें पोट ( खाणें ) ज्याचें तो भीम ).

हृषीकेशः पांचजन्यं, धनंजयः देवदत्तं, भीमकर्मा वृकोदरः महाशखं पौंड्रं दध्मौ.

श्रीकृष्णांनीं पांचजन्य, अर्जुनानें देवदत्त, आणि भयंकर कर्मे करणारा वृकोदर म्हणजे भीम यानें पौंड्र नांवाचा मोठा शंख फुंकला ॥ १५ ॥

**अनंतविजयं राजा कुंतीपुत्रो युधिष्ठिरः ।**
**नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥**

**अनंतविजयं** ( अनंताविजय नांवाचा शंख ) **राजा** ( राजा ) **कुंतीपुत्रः** = कुंत्याः पुत्रः ( कुंतीचा मुलगा ) **युधिष्ठिरः** (धर्म) **नकुलः** ( नकुल ) **सहदेवः** ( सहदेव ) **च** ( आणि ) **सुघोषमणिपुष्पकौ** = सुघोषं च मणिपुष्पकं च ( ' सुघोष ' आणि ' मणिपुष्पक ' नांवांचे शंख ).

कुंतीपुत्रः राजा युद्धिष्ठिरः अनंतविजयं, नकुलः च सहदेवः सुघोष-मणिपुष्पकौ.

कुंतीपुत्र, धर्मराजानें ' अनंतविजय, आणि नकुल व सहदेव यांनीं ' सुघोष व ' मणिपुष्पक ' नांवांचे शंख, ॥ १६ ॥

**काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः ।**
**धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥**

**काश्यः** (काशिराजा) **च** (आणि) **परमेष्वासः** = परमः इष्वासः यस्य सः ( मोठं आहे धनुष्य ज्याचें तो ) **शिखंडी** ( शिखंडी ) **च** ( आणि ) **महारथः** ( महारथी ) **धृष्टद्युम्नः** ( धृष्टद्युम्न ) **विराटः** ( विराट ) **च** ( आणि ) **सात्यकिः** ( सात्यकि ) **च** ( आणि ) **अपराजितः** ( पराजय न पावलेला, अजिंक्य ).

च परमेष्वासः काश्यः च महारथः शिखंडी, धृष्टद्युम्नः च विराटः, च अपराजितः सात्यकिः,

आणि महाधनुर्धारी काशिराजा, महारथी शिखंडी, धृष्टद्युम्न व विराट आणि अजिंक्य सात्यकि, ॥ १७ ॥

**द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।**
**सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक्पृथक् ॥ १८ ॥**

**द्रुपदः** ( द्रुपदराजा ) **द्रौपदेयाः** ( द्रौपदीचे प्रतिविंध्यादि पांच मुलगे ) **च** ( आणि ) **सर्वशः** ( चोहोंकडे, सर्व ठिकाणीं ) **पृथिवीपते** = पृथिव्याः पते ( हे पृथ्वीच्या राजा, धृतराष्ट्रा ) **सौभद्रः** ( अभिमन्यु ) **च** ( आणि ) **महाबाहुः** = महान्तौ बाहू यस्य सः ( लांब बाहू ज्याचे तो, आजानुबाहू ) **शंखान्** ( शंख ) **दध्मुः** ( फुंकले ) **पृथक्पृथक्** ( वेगवेगळे ).

द्रुपदः द्रौपदेयाः च महाबाहुः सौभद्रः च, हे पृथिवीपते !, पृथक्पृथक् शंखान् दध्मुः.

द्रुपदराजा, द्रौपदीचे पुत्र आणि आजानुबाहु अभिमन्यु या सर्वांनीं, हे राजा ( धृतराष्ट्रा )! चोहोंकडे आपापले निरनिराळे शंख फुंकले. ॥ १८ ॥

**स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ॥**
**नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥**

**सः** ( तो ) **घोषः** ( आवाज ) **धार्तराष्ट्राणां** = धृतराष्ट्रस्य पुत्राणां ( धृतराष्ट्राच्या पुत्रांचीं, कौरवांचीं ) **हृदयानि** ( अंतःकरणें ) **व्यदारयत्** ( विदारलीं, फाडून टाकलीं ) **नभः** ( आकाश ) **च** ( आणि ) **पृथिवीं** ( पृथ्वी ) **च** ( आणि ) **एव** ( देखील ) **तुमुलः** ( तुंबळ, घनघोर ) **व्यनुनादयन्** ( दणाणून सोडणारा ).

सः तुमुलः घोषः नभः च पृथिवीं च एव व्यनुनादयन् धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत्.

त्या घनघोर आवाजानें आकाश आणि पृथ्वी दणाणून सोडलीं व कौरवांचीं अंतःकरणें ( काळीज ) विदारून टाकलीं ॥ १९ ॥

**अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः ॥**
**प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥ २० ॥**

**अथ** ( यानंतर ) **व्यवस्थितान्** ( व्यवस्थित रीतीनें उभे असले-

त्यांना ) दृष्ट्वा ( पाहून ) धार्तराष्ट्रान् ( धृतराष्ट्राच्या पुत्रांना, कौरवांना ) कपिध्वजः = कपिः ध्वजे यस्य सः ( मारुति आहे ज्याच्या ध्वजावर तो, अर्जुन ) प्रवृत्ते ( करण्याची तयारी झाल्यावर ) शस्त्रसंपाते = शस्त्राणां संपाते ( शस्त्रांचा प्रहार होत असतां ) धनुः (धनुष्य) उद्यम्य ( उचलून घेऊन ) पांडवः ( अर्जुन ).

अथ धार्तराष्ट्रान् व्यवस्थितान् दृष्ट्वा कपिध्वजः पांडवः शस्त्रसंपाते प्रवृत्ते धनुः उद्यम्य,

यानंतर कौरव आपापल्या ठिकाणीं व्यवस्थित रीतीनें उभे आहेत असें पाहून, एकमेकांवर शस्त्रें टाकण्याची वेळ आली असतां धनुष्य उचलून घेऊन, ज्याच्या ध्वजावर मारुति आहे असा पांडुपुत्र म्हणजे अर्जुन,॥२०॥

हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।
अर्जुन उवाच—सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥२१॥

हृषिकेशं ( श्रीकृष्णाला ) तदा ( तेव्हां ) वाक्यं ( भाषण ) इदं ( हें ) आह ( बोलला ) महिपते = मह्याः पते ( हे पृथ्वीपते, हे धृतराष्ट्रा ) अर्जुन उवाच ( अर्जुन म्हणाला ) सेनयोः ( दोन सैन्यांच्या ) उभयोः ( दोन्हीं ) मध्ये ( मध्यभागीं ) रथं ( रथ ) स्थापय ( उभा कर ) मे ( माझा ) अच्युत ( हे श्रीकृष्णा ).

महिपते, हृषीकेशं इदं वाक्यं तदा आह. ( अर्जुन उवाच ) अच्युत, उभयोः सेनयोः मध्ये मे रथं स्थापय.

हे पृथ्वीपते धृतराष्ट्रा ! श्रीकृष्णाला तेव्हां असें भाषण करता झाला. अर्जुन म्हणाला:—अच्युता ! दोन्हीं सैन्यांच्या मध्यभागीं माझा रथ नेऊन उभा कर ॥ २१ ॥

यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।
कैर्मया सह योद्धव्यमस्मिन् रणसमुद्यमे ॥ २२ ॥

यावत् ( जोंपर्यंत ) एतान् ( यांना ) निरीक्षे ( पहातों ) अहं ( मी ) योद्धुकामान् = योद्धुं कामो येषां तान् ( ज्यांची युद्ध कराव-

याची इच्छा आहे त्यांना) **अवस्थितान्** (युद्धासाठीं तयार असणाऱ्यांना) **कैः** ( कोणाशीं ) **मया** ( म्यां ) **सह** ( बरोबर ) **योद्धव्यं** (युद्ध करावयाचें आहे ) **अस्मिन्** ( त्यांत ) **रणसमुद्यमे** = रणस्य समुद्यमे ( रणसंग्रामांत ).

यावत् एतान् योद्धुकामान् अवस्थितान् ( च ) अस्मिन् रणसमुद्यमे कैः सह मया योद्धव्यं अहं निरीक्षे.

म्हणजे युद्धाची इच्छा धारण करून उभे राहिले आहेत त्यांना, तसेंच या रणसंग्रामांत मला कोणाबरोबर लढावयाचें आहे तें मी पाहीन ॥ २२ ॥

**योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।**
**धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥**

**योत्स्यमानान्** ( युद्धाची इच्छा धरून आलेल्या वीरांना ) **अवेक्षे** ( पाहतों ) **अहं** ( मी ) **ये** ( जे ) **एते** ( हे ) **अत्र** ( येथें, रणभूमीवर ) **समागताः** ( जमलेले आहेत ) **धार्तराष्ट्रस्य** (धृतराष्ट्राच्या पुत्राचें, दुर्योधनाचें ) **दुर्बुद्धेः** ( दुष्टबुद्धीच्या ) **युद्धे** ( युद्धांत ) **प्रियचिकीर्षवः** = प्रियस्य चिकीर्षवः ( हित करावयाची इच्छा धारण करणारे, हितचिंतक. )

युद्धे दुर्बुद्धेः धार्तराष्ट्रस्य प्रियचिकीर्षवः ये एते अत्र समागताः तान् योत्स्यमानान् अहं अवेक्षे.

दुष्टबुद्धि दुर्योधनाचें हित चिंतणारे जे हे युद्धोत्सुक होऊन येथें रणभूमीवर आले आहेत त्या वीरांना मी पाहीन ॥ २३ ॥

**संजय उवाच–एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।**
**सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥**

**एवं** ( याप्रमाणें ) **उक्तः** ( म्हटला गेलेला ) **हृषीकेशः** ( श्रीकृष्ण ) **गुडाकेशेन** = गुडाकायाः ईशेन (निद्रेला जिंकणारानें, अर्जुनानें ) **भारत** ( हे भरतकुलोत्पन्ना धृतराष्ट्रा ) **सेनयोः** ( दोन्ही सैन्यांच्या ) **उभयोः** (दोन्ही) **मध्ये** (मध्यभागीं) **स्थापयित्वा** (उभा करून) **रथोत्तमम्** = रथानां उत्तमं ( उत्तम रथ ).

भारत, गुडाकेशन एवं उक्तः हृषीकेशः उभयोः सेनयोः मध्ये रथोत्तमं स्थापयित्वा,

संजय म्हणालाः—हे धृतराष्ट्रा, याप्रमाणें अर्जुनानें म्हटल्यावर भगवान् श्रीकृष्ण दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं आपला उत्तम (दिव्य) रथ नेऊन उभा करून ॥ २४ ॥

**भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ।**
**उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥ २५ ॥**

**भीष्मद्रोणप्रमुखतः**=भीष्मस्य च द्रोणस्य च प्रमुखतः (भीष्म आणि द्रोण यांच्या समोर) **सर्वेषां** (सर्वांना) **च** (आणि) **महीक्षितां**= महीं क्षियति स महीक्षित् तेषां (पृथ्वीवर जो तावा चालवितो, म्हणजे राज्य करतो त्यांच्या, राजांच्या) **उवाच** (म्हणाला) **पार्थ** (अर्जुना!) **पश्य** (पहा) **एतान्** (यांना) **समवेतान्** (जमलेल्यांना) **कुरून्** (कौरवांना) **इति** (असें).

भीष्मद्रोणप्रमुखतः च सर्वेषां महीक्षिताम् (प्रमुखतः) उवाच 'पार्थ, एतान् समवेतान् कुरून् पश्य' इति.

भीष्म, द्रोण आणि सर्व राजे यांच्यासमोर 'पार्था, जमलेल्या या कौरवांना पहा' असें म्हणाले ॥ २५ ॥

**तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् ॥**
**आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥ २६ ॥**

**तत्र** (तेथें, त्या रणभूमीवर) **अपश्यत्** (पाहिले) **स्थितान्** (उभे असलेले) **पार्थः** (पार्थ, अर्जुन) **पितॄन्** (पित्याच्या योग्यतेचे भूरीश्रवासारख्या चुलत्यांना) **अथ** (नंतर) **पितामहान्** (भीष्म सोमदत्तादि अजांना) **आचार्यान्** (द्रोणकृप इत्यादि गुरूंना) **मातुलान्** (शल्यशकुनि इत्यादि मामांना) **भ्रातॄन्** (दुर्योधनादि बंधूंना) **पुत्रान्** (दुर्योधनाचा पुत्र लक्ष्मण इत्यादि मुलांसारख्यांना) **पौत्रान्**

( पुतण्यांच्या मुलांना, नातवांना ) सखीन् ( स्नेह्यांना ) तथा ( तसेंच ).

अथ तत्र स्थितान् पितॄन्, पितामहान्, आचार्यान्, मातुलान्, भ्रातॄन्, पुत्रान्, पौत्रान्, सखीन् पार्थः अपश्यत् तथा,

नंतर तेथें उभे असलेले चुलते, आजे, गुरु, मामे, भाऊबंद, मुलगे, नातू, मित्र यांना पार्थानें पाहिलें; तसेंच ॥२६॥

श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।
तान्समीक्ष्य स कौंतेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥२७॥

श्वशुरान् ( सासऱ्यांना ) सुहृदः ( इष्टमित्र, आप्त ) च ( आणि ) एव ( देखील ) सेनयोः ( सैन्यांत ) उभयोः ( दोघांच्या ) अपि ( सुद्धां ) तान् ( त्यांना ) समीक्ष्य ( पाहून ) सः ( तो ) कौंतेयः ( कुंतिपुत्र, अर्जुन ) सर्वान् ( सर्वांना ) बंधून् ( बांधवांना, भाऊबंदांना ) अवस्थितान् ( आपापल्या जागीं उभे राहिलेल्यांना )

उभयोः सेनयोः अपि श्वशुरान् च सुहृदः एव; तान् सर्वान् अवस्थितान् बंधून् समीक्ष्य सः कौंतेयः,

दोन्ही सैन्यांत सासरे आणि इष्टमित्र देखील ( पाहिले ); त्या सर्वांना उभे राहिलेल्या बांधवांना पाहून तो अर्जुन, ॥२७॥

कृपया परयाऽऽविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।
अर्जुन उवाच—दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥२८॥

कृपया ( करुणेनें ) परया ( अत्यंत ) आविष्टः ( पूर्ण भरला जाऊन ) विषीदन् ( खिन्न होत्साता ) इदं ( हें ) अब्रवीत् ( बोलला ) अर्जुन उवाच ( अर्जुन म्हणाला ) दृष्ट्वा ( पाहून ) इमं ( याला ) स्वजनं = स्वस्य जनं ( स्वजनांला, बांधववर्गाला ) कृष्ण ( हे कृष्णा ) युयुत्सुं ( युद्ध करण्याची इच्छा असलेले यांना ) समुपस्थितम् (एकत्र उभे राहिलेल्यांना ).

परया कृपया आविष्टः विषीदन् इदं अब्रवीत्, अर्जुनः उवाच; कृष्ण, इमं युयुत्सुं समुपस्थितं स्वजनं दृष्ट्वा;

अत्यंत करुणेनें व्याप्त होऊन, खिन्न होतसाता असें बोलूं लागला. अर्जुन म्हणाला:—हे कृष्णा! युद्धाची इच्छा धारण करून एकत्र जमलेल्या या बांधववर्गाला पाहून; ॥ २८ ॥

**सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।**
**वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥**

**सीदंति** ( विकल होतात ) **मम** ( माझीं ) **गात्राणि** ( गात्रें, अवयव ) **मुखं** ( तोंड ) **च** ( आणि ) **परिशुष्यति** ( सुकून जातें ) **वेपथुः** ( कांपरें ) **च** ( आणि ) **शरीरे** ( शरिरांत ) **मे** ( माझ्या ) **रोमहर्षः** = रोम्णाम् हर्षः ( रोमांच, कांटा ) **च** ( आणि ) **जायते** ( उत्पन्न होतात ).

मम गात्राणि सीदंति च मुखं परिशुष्यति च मे शरीरे वेपथुः च रोमहर्षः जायते.

माझीं गात्रें विकल होतात, आणि तोंड सुकून जात आहे, आणि माझ्या अंगांत कांपरें भरतें व शरिरावर कांटा उभा राहतो ॥ २९ ॥

**गांडीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ।**
**न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥३०॥**

**गांडीवं** ( 'गांडीव' नांवाचें अग्नीनें दिलेलें धनुष्य ) **स्रंसते** ( गळून पडतें ) **हस्तात्** ( हातांपासून, हातांतून ) **त्वक्** ( शरिरावरील त्वचा, अंग ) **च** (आणि) **एव** ( देखील ) **परिदह्यते** ( सर्वत्र भाजत आहे, दाह होत आहे ) **न** ( नाहीं ) **च** ( आणि ) **शक्नोमि** ( शकतों ) **अवस्थातुं** ( उभा राहण्याला ) **भ्रमति** ( फिरतें, भ्रमण करतें ) **इव** ( जणुं ) **च** ( आणि ) **मे** ( माझें ) **मनः** ( मन).

गांडीवं हस्तात् स्रंसते च त्वक् एव परिदह्यते च अवस्थातुं न शक्नोमि च मे मनः भ्रमति एव.

माझ्या हातांतून गांडीव धनुष्य गळून खालीं पडत आहे आणि सर्व अंगाची लाही होते, मला उभें राहवत नाहीं आणि माझें मन भ्रमल्यासारखें झालें आहे ( भांबावून गेलें आहे ). ॥ ३० ॥

**निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।**
**न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥**

**निमित्तानि** ( चिन्हें, शकुन ) **च** (आणि) **पश्यामि** ( मी पाहतों ) **विपरीतानि** ( अमंगळ ) **केशव** ( हे कृष्ण ) **न** ( नाहीं ) **च** (आणि) **श्रेयः** ( कल्याण ) **अनुपश्यामि** ( मला दिसतें ) **हत्वा** ( मारून ) **स्वजनं** ( स्वजनांस, इष्टमित्रांस ) **आहवे** ( युद्धांत ).

च, केशव ! विपरीतानि निमित्तानि पश्यामि च स्वजनं आहवे हत्वा श्रेयः न अनुपश्यामि.

आणि हे केशवा[1] ! मला अमंगळ शकून होत आहेत व आपल्या इष्टमित्रांस युद्धामध्यें ठार मारून कल्याण होईल असें मला वाटत नाहीं. ॥ ३१ ॥

**न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ॥**
**किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥ ३२॥**

**न** ( नाहीं ) **कांक्षे** ( मी इच्छा करतों ) **विजयं** (जयप्राप्ति) **कृष्ण** ( हे कृष्णा ) **न** ( नाहीं ) **च** ( आणि ) **राज्यं** ( राज्य ).
**सुखानि** ( सुखोपभोग ) **च** ( आणि ) **किं** ( काय ) **नः** ( आम्हाला ) **राज्येन** ( राज्य मिळाल्यानें ) **गोविंद** ( हे गोविंद ! **किं** ( काय ) **भोगैः** ( उपभोगांनीं ) **जीवितेन** ( जगल्यानें ) **वा** ( अथवा ).

---

१ केशव या शब्दाचे " केशिनं वधति इति ( केशी राक्षसास मारणारा ); केशाः प्रशस्ताः संति यस्य सः ( लांब अथवा कुरळे केस असणारा ); के शेते इति ( जलसागरावर शयन करणारा ) " असे निरनिराळे अर्थ करतात.

कृष्ण ! न विजयं न राज्यं च, न सुखानि च कांक्षे; गोविंद ! न राज्येन किं वा भोगैः जीवितेन किं ! ।

हे कृष्ण[1] ! मी जयाची, राज्याची आणि सुखोपभोगाची इच्छा करीत नाहीं; हे गोविंदा ! आम्हांला राज्य मिळवून अथवा सुखोपभोग घेऊन अथवा जिवंत राहून तरी त्याचा काय उपयोग होणार आहे ! ! ॥ ३२॥

**येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ॥**
**त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥३३॥**

**येषां** ( ज्यांच्या ) **अर्थे** ( करितां ) **कांक्षितं** ( इच्छा केलेली असते) **नः** ( आम्हाला ) **राज्यं** ( राज्य ) **भोगाः** ( उपभोग ) **सुखानि** ( सुखें ) **च** ( आणि ) **ते** ( ते ) **इमे** ( हे )**अवस्थिताः** (उभे आहेत) **युद्धे** ( युद्धांत ) **प्राणान्** ( प्राण ) **त्यक्त्वा** (सोडून देऊन ) **धनानि** ( धन, संपत्ति ) **च** ( आणि ).

येषां अर्थे नः राज्यं भोगाः सुखानि च कांक्षितं ते इमे प्राणान् धनानि च त्यक्त्वा युद्धे अवस्थिताः.

ज्यांच्याकरितां आम्हाला राज्य, उपभोग व सुखें हवीं असीं वाटतात, ते हे ( सर्व आप्त इष्ट मित्र ) आपले प्राण व धन ( याची आशा ) सोडून देऊन समरांगणांत उभे राहिले आहेत ॥ ३३ ॥

**आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।**
**मातुलाः श्वशुराः पौत्राः शालाः संबंधिनस्तथा ॥ ३४ ॥**

**आचार्याः** ( गुरु ) **पितरः** ( वडील पुरुष ) **पुत्राः** ( मुलगे ) **तथा** ( त्याप्रमाणें ) **एव** ( सुद्धा ) **च** ( आणि ) **पितामहाः** (आजे) **मातुलाः** ( मामे ) **श्वशुराः** ( सासरे ) **पौत्राः** ( नातू ) **शालाः** ( मेव्हणे ) **संबंधिनः** ( आप्त इष्ट मित्र ) **तथा** ( सुद्धां ).

---

१ कृष्ण या शब्दाचा 'भक्तान् कर्षति इति' म्हणजे भक्तांस आकर्षणारा असा कोणी अर्थ करतात.

आचार्याः पितरः पुत्राः च तथा एव पितामहाः मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनः तथा.

गुरु, वाडवडील, मुलगे आणि त्याचप्रमाणें आजे, मामे, सासरे, नातू, मेव्हणे आणि इतर आप्तइष्ट मित्र ही ( उभे आहेत ) ॥ ३४ ॥

**एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।**
**अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥**

एतान् ( यांस ) न ( नाहीं ) हंतुं ( मारावयाला ) इच्छामि ( मी इच्छितों ) घ्नतः ( मेलों गेलों ) अपि ( तरी ) मधुसूदन = मधुं सूदयति इति त्वं ( हे मधु राक्षसास मारणाऱ्या ) अपि ( तरी ) त्रैलोक्यराज्यस्य = त्रैलोकस्य राज्यस्य ( तिन्ही लोकांच्या राज्याच्या ) हेतोः ( हेतूसाठीं ) किं ( काय ) नु ( मग ) महीकृते = मह्याः कृते ( पृथ्वीच्या राज्याकरितां ).

मधुसूदन घ्नतः अपि एतान् त्रैलोक्यराजस्य हेतोः अपि हंतुं न इच्छामि महीकृते किं नु.

हे मधुसूदना ! मी यांच्याकडून मारलों गेलों तरी पुरवलें, पण मी तिन्ही लोकांचें राज्य मिळावयाचें असलें तरी यांस मारूं इच्छित नाहीं; मग पृथ्वीच्या राज्याचा काय पाड ! सारांश, पृथ्वीच्या राज्यासाठीं तर मी यांना मारणारच नाहीं ॥ ३५ ॥

**निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।**
**पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥**

**निहत्य** ( ठार मारून ) **धार्तराष्ट्रान्** ( धृतराष्ट्राच्या पुत्रांस ) **नः** ( आम्हांला ) **का** ( कोणती ) **प्रीतिः** ( समाधान, आनंद ) **स्यात्** ( होईल ) **जनार्दन** ( हे जनार्दना ) **पापं** ( पाप ) **एवं** ( मात्र ) **आश्रयेत्** ( लागेल ) **अस्मान्** ( आम्हाला ) **हत्वा** ( ठार मारून ) **एतान्** ( यांना ) **आततायिनः** ( अघोर व समाजविध्वंसक कर्मे करणारांना ).

जनार्दन, धार्तराष्ट्रान् निहत्य नः का प्रीति स्यात्, एतान् आततायिनः हत्वा अस्मान् पापं एव आश्रयेत्.

हे जनार्दना ! धृतराष्ट्राच्या पुत्रांस ठार मारून आम्हाला काय समाधान होईल ? या अघोर कर्मे करणारांना मारून आम्हाला पाप मात्र लागेल ॥ ३६ ॥

**तस्मान्नार्हा वयं हंतुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान् ।**
**स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥**

**तस्मात्** ( म्हणून ) **न** ( नाहीं ) **अर्हाः** ( पात्र, योग्य ) **वयं** ( आम्ही ) **हंतुं** ( मारावयाला ) **धार्तराष्ट्रान्** ( धृतराष्ट्राच्या पुत्रांना ) **स्वबांधवान्** ( आमच्या बांधवांना ) **स्वजनं** ( आपल्या इष्टमित्रांना ) **हि** ( कारण ) **कथं** ( कसें ) **हत्वा** ( ठार मारून ) **सुखिनः** (सुखी) **स्याम** ( आम्ही होऊं ) **माधव** ( हे माधवा ).

तस्मात् स्वबांधवान् धार्तराष्ट्रान् हंतुं वयं अर्हाः न, माधव, हि स्वजनं हत्वा सुखिनः कथं स्याम ?

म्हणून आमचेच बांधव जे धृतराष्ट्रपुत्र त्यांना आम्हीं मारणें हें योग्य नाहीं. कारण हे माधवा ! आपल्या इष्टमित्रांना मारून आम्ही सुखी कसें होऊं बरें ? ॥ ३७ ॥

**यद्यप्येते न पश्यंति लोभोपहतचेतसः ।**
**कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥**

**यदि** ( जरी ) **अपि** ( सुद्धां ) **एते** ( हे ) **न** ( नाहीं ) **पश्यंति** ( पाहतात ) **लोभोपहतचेतसः** = लोभेन उपहतं चेतः येषां ते ( लोभापुढें नष्ट झाली आहे विवेकबुद्धि ज्यांची ते ) **कुलक्षयकृतं** = कुलस्य क्षयेन कृतं ( कुलाच्या क्षयानें उत्पन्न होणारा ) **दोषं** ( दोष, पाप ) **मित्रद्रोहे** = मित्राणां द्रोहे ( मित्रांचा द्वेष केल्यानें ) **च** ( आणि ) **पातकं** ( पातक ).

यदि अपि एते लोभोपहतचेतसः कुलक्षयकृतं दोषं च मित्रद्रोहे पातकं पश्यंति न.

जरी लोभामुळें विवेकबुद्धि नष्ट झालेले, हे कुलाच्या क्षयापासून घडणारा दोष आणि मित्रांचा द्वेष केल्यानें ओढवणारें पातक जाणत नाहींत तरी ॥ ३८ ॥

कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।
कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥

कथं ( कसें ) न ( नाहीं ) ज्ञेयं ( जाणावयाचें ) अस्माभिः ( आमच्यानें ) पापात् ( पापापासून ) अस्मात् ( यापासून ) निवर्तितुं ( परत फिरावयाला ) कुलक्षयकृतं = कुलस्य क्षयेन कृतं ( कुलाच्या नाशापासून लागणारा ) दोषं ( दोष, पाप ) प्रपश्यद्भिः ( जाणणारांनीं ) जनार्दन ( हे जनार्दना ).

जनार्दन, कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिः अस्माभिः अस्मात् पापात् निवर्तितुं कथं न ज्ञेयं ?

हे जनार्दना ! कुलाचा नाश केल्यानें लागणाऱ्या दोषाची जाणीव असणारे जे आम्ही त्यांनीं या पापापासून परावृत्त व्हावयाचें हें कसें बरें समजूं नये ? ( मनांत आल्यावांचून कसें राहणार ? ) ॥ ३९ ॥

कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः ।
धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥

कुलक्षये = कुलस्य क्षये ( कुलाचा नाश झाला असतां ) प्रणश्यंति ( नाश पावतात ) कुलधर्माः = कुलस्य धर्माः ( कुलाचे आचार ) सनातनाः ( पुरातन, पुराण कालापासून चालत आलेले ) धर्मे ( धर्म ) नष्टे ( नाहींसा झाल्यावर ) कुलं ( कुलाला ) कृत्स्नं ( सर्व ) अधर्मः ( अनीति ) अभिभवति ( पगडा बसवितो ) उत ( खरोखर ).

कुलक्षये सनातनाः कुलधर्माः प्रणश्यंति, धर्मे नष्टे अधर्मः उत कृत्स्नं कुलं अभिभवति.

कुलाचा क्षय झाला असतां सनातन कुलधर्म कुलाचार नाश पावतात, धर्म नष्ट झाल्यावर सर्व कुळावर अधर्म आपला पगडा बसवितो ॥ ४० ॥

**अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यंति कुलस्त्रियः ।**
**स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥**

**अधर्माभिभवात्** = अधर्मस्य अभिभवात् ( अधर्म माजला असतां ) **कृष्ण** ( हे कृष्णा ) **प्रदुष्यंति** ( दुष्ट आचरण करूं लागतात ) **कुलस्त्रियः** = कुलस्य स्त्रियः ( कुलीन स्त्रिया ) **स्त्रीषु** ( स्त्रियांच्या ठायीं ) **दुष्टासु** ( विघडल्या असतां ) **वार्ष्णेय** ( हे वृष्णिकुलोत्पन्ना ) **जायते** ( उत्पन्न होतो ) **वर्णसंकरः** = वर्णस्य संकरः ( जातींची भेसळ ).

कृष्ण, अधर्माभिभवात् कुलस्त्रियः प्रदुष्यंति, दुष्टासु स्त्रीषु वार्ष्णेय, वर्णसंकरः जायते.

हे कृष्णा, अधर्म माजला असतां कुलीन स्त्रिया बिघडतात, स्त्रिया बिघडल्या म्हणजे, हे वृष्णिकुलोत्पन्ना कृष्णा, वर्ण-संकर होतो ॥ ४१ ॥

**संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।**
**पतंति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥ ४२ ॥**

**संकरः** ( भसळ, कालवाकालव ) **नरकाय** ( नरकाकडे ) **एव** ( सुद्धां ) **कुलघ्नानां** ( कुलाचा संहार करणारांचा ) **कुलस्य** ( कुळाचा ) **च** ( आणि ) **पतंति** ( अधोगतीला जातात) **पितरः** ( मेलेले पूर्वज ) **हि** ( कारण ) **एषां** ( त्यांचे ) **लुप्तपिंडोदकक्रियाः**= लुप्ता पिंडस्य च उदकस्य, च क्रिया येषां ते ( ज्यांच्या संबंधानें पिंडदान व तर्पण इत्यादि क्रिया नष्ट झाल्या आहेत ते ).

संकरः कुलघ्नानां च कुलस्य नरकाय एव, हि एषां लुप्तपिंडोदकक्रियाः पितरः पतंति.

वर्णसंकर हा कुलाचा क्षय करणारांना आणि त्या कुलालाही नरकाकडे खेंचून नेतो; कारण त्यांच्या पितरांना, पिंडदान व तर्पणादिकांचें फल, त्या क्रिया न घडल्यामुळें मिळत नाहीं आणि मग ते अधोगतीला जातात ॥ ४२ ॥

दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।
उत्साद्यंते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥

**दोषैः** ( दोषांनीं ) **एतैः** ( यांनीं ) **कुलघ्नानां** ( कुलविनाशकांच्या ) **वर्णसंकरकारकैः**=वर्णस्य संकरस्य कारकैः ( वर्णसंकरोत्पादक अशा ) **उत्साद्यंते** ( नाहींसे होतात ) **जातिधर्माः**= जातेः धर्माः ( जातीचे धर्म ) **कुलधर्माः**= कुलस्य धर्माः (कुळाचे धर्म) **च** (आणि) **शाश्वताः** ( सनातन चालत आलेले ).

वर्णसंकरकारकैः एतैः कुलघ्नानां दोषैः शाश्वताः जातिधर्माः च कुलधर्माः उत्साद्यंते.

वर्णसंकार उत्पन्न करणाऱ्या या कुलघातक्यांच्या दोषांनीं सनातन चालत आलेले जातींचे व कुलाचे धर्म नाहींसे होतात ।। ४३ ।।

उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।
नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥

**उत्सन्नकुलधर्माणां** = उत्सन्नाः कुलस्य धर्माः येषां तेषां ( ज्यांच्या कुलांचे धर्म नष्ट झालेले आहेत त्यांचें ) **मनुष्याणां** ( मनुष्यांचें ) **जनार्दन** ( हे जनार्दना ) **नरके** ( नरकामध्यें ) **नियतं** ( निश्चयानें ) **वासः** ( वास्तव्य, राहणें ) **भवति** ( होतें ) **इति** (असें ) **अनुशुश्रुम** ( आम्हीं ऐकिलें आहे ).

जनार्दन, उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां वासः नरके नियतं भवति इति अनुशुश्रुम.

हे जनार्दना ! ज्यांचे कुलधर्म नष्ट झालेले आहेत अशा मनुष्यांचें वास्तव्य नरकांत व्हावयाचें ठरलेलें आहे असें आम्हीं ऐकिलें आहे ॥४४॥

अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम्
यद्राज्यसुखलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥

**अहो** ( अरेरे ! ) **बत** ( पहा ) **महत्** ( मोठें ) **पापं** ( पाप ) **कर्तुं** ( करावयाला ) **व्यवसिताः** ( प्रवृत्त झालों आहोंत ) **वयं**

( आम्ही ) यत् ( जेव्हां ) राज्यसुखलोभेन = राज्यस्य सुखस्य लोभेन ( राज्य मिळाल्यावर जें सुख मिळावयाचें त्याच्या लोभानें ) हंतुं ( मारावयाला ) स्वजनं ( आपल्या आप्तेष्टांना ) उद्यताः ( तयार झालों आहोंत ).

अहो बत वयं महत् पापं कर्तुं व्यवसिताः यत् राज्यसुखलोभेन स्वजनं हंतुं उद्यताः.

अहो पहा ! आम्ही मोठें पापकर्म करावयाला प्रवृत्त झालों आहोंत, म्हणजे राज्य मिळाल्यावर जें सुख मिळेल त्याच्या आशेनें आपल्या आप्तेष्टांना मारावयाला तयार झालों आहोंत ॥ ४५ ॥

**यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ।**
**धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥४६॥**

**यदि** ( जरी ) **मां** ( मला ) **अप्रतिकारं** ( निवारण केल्याशिवाय ) **अशस्त्रं** ( शस्त्र नसतांना ) **शस्त्रपाणयः**= शस्त्राणि पाणिषु येषां ते (शस्त्रें आहेत ज्यांच्या हातांत ते) **धार्तराष्ट्राः** ( धृतराष्ट्राचे पुत्र ) **रणे** ( रणामध्यें ) **हन्युः** ( मारतील ) **तत्** ( तें ) **मे** ( माझें ) **क्षेमतरं** ( अधिक कल्याणकारक ) **भवेत्** ( होईल ).

यदि शस्त्रपाणयः धार्तराष्ट्राः अप्रतिकारं अशस्त्रं मां रणे हन्युः तत् मे क्षेमतरं भवेत्.

जर हातांत शस्त्रें धारण करणारे धृतराष्ट्राचे पुत्र, मी निःशस्त्र असून त्यांचें निवारण करित नसतांना, मला या समरभूमीवर ठार मारतील तर त्यापासून माझें अधिकच कल्याण होईल. सारांश, मी आतां हतांत शस्त्र धरणार नाहीं किंवा धृतराष्ट्राच्या पुत्रांवर उलट उगारणार नाहीं. मी कोणत्याही प्रकारें स्वतःला वांचविण्याची खटपट करणार नाहीं. अशा स्थितींत मला दुर्योधनादिकांनीं ठार मारलें तरी उत्तमच होईल ॥ ४६ ॥

**संजय उवाच-एवमुक्त्वाऽर्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ।**
**विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥४७॥**

एवं ( याप्रमाणें ) उक्त्वा ( बोलून ) अर्जुनः ( अर्जुन ) संख्ये ( रणभूमीवर ) रथोपस्थे = रथस्य उपस्थे ( रथांतील मध्यभागावर ) उपाविशत् ( खालीं बसला ) विसृज्य ( टाकून देऊन ) सशरं = शरेण सह ( बाणांसहित ) चापं ( धनुष्य ) शोकसंविग्नमानसः शोकेन संविग्नं मानसं यस्य सः ( शोकानें ज्याचें मन व्याकूळ झालें आहे असा ).

एवं संख्ये उक्त्वा सशरं चापं विसृज्य शोकसंविग्नमानसः अर्जुनः रथोपस्थे उपाविशत्.

संजय म्हणाला:—याप्रमाणें युद्धामध्यें ( युद्धाच्या वेळीं ) बोलून अर्जुनानें आपल्या हातांतील बाण लावून सज्ज केलेलें धनुष्य टाकून दिलें आणि शोकाकुल होत्साता रथांतील मध्यासनावर बसला ॥ ४७ ॥

इति श्रीमद्भगद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अर्जुनविषादयोगो–नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

---



# अध्याय दुसरा.

संजय उवाच—तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।
विषीदंतमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥

**तं** ( त्याला ) **तथा** ( याप्रमाणें ) **कृपया** ( करुणेनें ) **आविष्टम्** ( व्याकूळ झालेला ) **अश्रुपूर्णाकुलेक्षणम्** = अश्रुभिः पूर्णे च आकुले च ईक्षणे यस्य तं ( ज्याचे दोन्ही डोळे अश्रूंनीं भरले असून व्याकूळ झालेला आहे त्याला ) **विषीदंतं** ( खिन्न अंतःकरण झालेल्याला ) **इदं** ( हें ) **वाक्यं** ( भाषण ) **उवाच** ( म्हणाला ) **मधुसूदनः** ( मधु राक्षसास मारणारा श्रीकृष्ण ).

तया कृपया आविष्टं अश्रुपूर्णाकुलेक्षणं विषीदंतं तं ( अर्जुनं ) मधुसूदनः इदं वाक्यं उवाच.

संजय म्हणालाः—याप्रमाणें ( मागील अध्यायांत सांगितल्याप्रमाणें ) दयार्द्र व खिन्न अंतःकरण झालेल्या आणि आंसवांनीं डोळे भरून आलेल्या त्या अर्जुनाला, श्रीकृष्ण भगवान् हें ( पुढील ) भाषण बोलले ॥ १ ॥

श्रीभगवानुवाच—कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।
अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥

**कुतः** ( कोठून ) **त्वा** ( तुला ) **कश्मलं** ( काळेंबेरें ) **इदं** ( हें ) **विषमे** ( विषमकाळीं, संकटसमयीं ) **समुपस्थितं** ( उत्पन्न झालें ) **अनार्यजुष्टं** = अनार्यैः जुष्टं (आर्यांनीं न आचरलेलें) **अस्वर्ग्यं** (स्वर्गाला मुकविणारें ) **अकीर्तिकरं** ( अपकीर्तिकारक ) **अर्जुन** ( हे अर्जुना ).

अर्जुन, अनार्यजुष्टं, अस्वर्ग्यं, अकीर्तिकरं इदं कश्मलं त्वा विषमे कुतः समुपस्थितं.

श्रीभगवान् म्हणाले:—अर्जुना, आर्यजनाला न रुचणारें, स्वर्गाला मुकविणारें, मानहानी करणारें असें हें काळेंबेरें तुझ्या मनांत, या संकटसमयीं ( ऐन युद्धाच्यावेळीं ), कोठून आलें ? ॥ २ ॥

क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।
क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३ ॥

क्लैब्यं ( नामर्दपणा ) मा ( नको ) स्म ( उपपद ) गमः ( जाऊं ) पार्थ ( अर्जुना ) न ( नाहीं ) एतत् ( हें ) त्वयि ( तुझ्या ठिकाणीं ) उपपद्यते ( योग्य होतें, शोभतें ) क्षुद्रं ( हलकी ) हृदयदौर्बल्यं = हृदयस्य दौर्बल्यं ( अंत:करणाची दुर्बलता ) त्यक्त्वा ( टाकून देऊन ) उत्तिष्ठ ( ऊठ ) परंतप = परान् तपति ( दुसऱ्याला म्ह० शत्रूला जर्जर करून ताप देणाऱ्या, अर्जुना )

पार्थ, क्लैब्यं मा स्म गमः एतत् त्वयि न उपपद्यते; क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वा, परंतप, उत्तिष्ठ.

अर्जुना, नामर्दपणा सोडून दे, हें तुला शोभत नाहीं; हे शत्रूला ताप देणाऱ्या अर्जुना, ही अंत:करणाची दुर्बलता सोडून देऊन ( युद्धास ) उभा रहा ॥ ३ ॥

अर्जुन उवाच—कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ।
इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥४॥

कथं ( कसें ) भीष्मं ( भीष्माचार्याला ) अहं ( मी ) संख्ये ( युद्धांत ) द्रोणं ( द्रोणाचार्याला ) च ( आणि ) मधुसूदन ( कृष्णा ) इषुभिः ( बाणांनीं ) प्रतियोत्स्यामि ( उलट युद्ध करूं ) पूजार्हौ ( दोघेही पूजा करावयास योग्य असे ) अरिसूदन = अरीणां सूदन ( शत्रूंस मारणाऱ्या, कृष्णा ! )

मधुसूदन, कथं भीष्मं च द्रोणं ( च ) अहं संख्ये इषुभिः प्रतियोत्स्यामि, अरिसूदन तौ पूजार्हौ.

अर्जुन म्हणाला:—हे मधूसूदना, भीष्म आणि द्रोण यांच्यावर युद्धांत उलट बाण टाकून कसें लढावें ? हे शत्रुनाशना, हे दोघेही यांची पूजा करावी अशा योग्यतेचे आहेत ॥ ४ ॥

**गुरूनहत्वा हि महानुभावान् श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।**
**हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुंजीय भोगान् रुधिरप्रदिग्धान् ॥५॥**

गुरून् ( गुरूंला, आचार्यांना, श्रेष्ठ पुरुषांना ) अहत्वा ( न मारतां ) हि ( कारण ) महानुभावान् = महान् अनुभावो येषां तान् ( ज्याची मोठी योग्यता आहे त्यांना, मोठ्या सन्मान्य पुरुषांना ) श्रेयः ( चांगलें, बरें ) भोक्तुं ( खाणें, भोगणें ) भैक्ष्यं ( भिक्षेचें अन्न ) अपि ( सुद्धां ) इह ( येथें ) लोके ( लोकांत ) हत्वा ( मारून ) अर्थकामान् =अर्थं कामयंति इति तान् ( धनाचा लोभ धरणारे ) तु ( परंतु ) गुरून् ( गुरूंला ) इह ( येथें, या भूलोकीं ) एव ( देखील ) भुंजीय (मी खावें, उपभोगावें ) भोगान् ( भोग, सुखें ) रुधिरप्रदिग्धान् = रुधिरेण प्रदिग्धान् ( रक्तानें माखलेलें ).

हि महानुभावान् गुरून् अहत्वा इहलोके भैक्ष्यं भोक्तुं अपि श्रेय; तु अर्थकामान् गुरून् हत्वा इह एव रुधिरप्रादिग्धान् भोगान् भुंजीय.

महात्मे गुरु यांस ( वडील माणसांस ) न मारतां भिक्षा मागून निर्वाह करावा लागला तरी तें फार चांगलें; परंतु धनाचा[१] लोभ धरणारे ( असले तरी ) या गुरूंना मारून या लोकींच त्यांच्या रक्तानें भरलेले भोग (त्यांच्या घावापासून मिळालेलीं सुखें ) मला भोगावे लागतील ॥ ५ ॥

**न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।**
**यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ६**

न ( नाहीं ) च ( आणि ) एतत् ( हें ) विद्मः ( आम्ही जाणतों ) कतरत् ( कोणतें ) नः ( आम्हांला ) गरीयः ( जास्त महत्वाचें )

---

१ भीष्म, द्रोण वगैरे महात्मे दुर्योधनाच्या आश्रयानें राहिले असल्यामुळें त्याचे मित्र होते, धनाचा लोभ धरणारे होते व तसे असले तरी.

यत् ( कीं ) वा ( किंवा ) जयेम ( आम्ही जय मिळवूं ) यदि ( कीं ) वा ( किंवा ) नः ( आम्हाला ) जयेयुः ( शत्रू जिंकतील ) यान् ( ज्यांना ) एव ( देखील ) हत्वा ( ठार मारून ) न ( नाहीं ) जिजीविषामः ( आम्ही जिवंत राहण्याची इच्छा करतों ) ते ( ते ) अवस्थिताः ( उभे आहेत, सिद्ध आहेत ) प्रमुखे (समोर) धार्तराष्ट्राः ( दुर्योधन वगैरे धृतराष्ट्राचे पुत्र ).

च नः कतरत् गरीयः एतत् न विद्मः, यत् वा जयेम यदि वा नः जयेयुः, यान् हत्वा न जिजीविषामः ते धार्तराष्ट्राः एव प्रमुखे अवस्थिताः.

आणि ( भिक्षावृत्ति किंवा युद्ध या दोहोंपैकीं ) आम्हांला जास्त महत्वाचें ( श्रेयस्कर ) कोणतें आहे तें समजत नाहीं; तसेंच आम्ही जिंकूं ( आम्हांला जय मिळेल) किंवा ते आम्हांला जिंकतील ( त्यांचा जय होईल ) हेंही आम्हांस समजत नाहीं; ज्यांना ठार मारून ज्यांच्या मागें जिवंत राहण्याची आमची इच्छा नाहीं तेच धृतराष्ट्राचे दुर्योधनादिक पुत्र आमच्या समोर ( युद्ध करावयाकरतां ) उभे आहेत ॥ ६ ॥

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।**
**यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥ ७ ॥**

कार्पण्यदोषोपहतस्वभावः= कार्पणस्य दोषेण उपहतः स्वभावः यस्य सः ( ज्याच्या स्वभावावर स्वजनांविषयीं करुणा या दोषाचें वजन पडलें आहे तो ), प्रच्छामि ( मी विचारतों ) त्वां ( तुला ) धर्मसंमूढचेताः=धर्मे संमूढं चेतः यस्य सः ( कर्तव्याविषयीं ज्याच्या मनाचा घोंटाळा झालेला आहे तो ) यत् ( जें ) श्रेयः ( विशेष चांगलें ) स्यात् ( असेल ) निश्चितं ( निश्चयेंकरून ) ब्रूहि ( सांग ) तत् ( तें ) मे ( मला ) शिष्यः ( शिष्य ) ते ( तुझा ) अहं ( मी ) शाधि ( शिकीव ) मां ( मला ) त्वां ( तुला ) प्रपन्नम् ( शरण आलेल्याला ).

कार्पण्यदोषोपहतस्वभावः धर्मसंमूढचेताः (अहं) त्वां पृच्छामि यत् श्रेयः स्यात् तत् मे निश्चितं ब्रूहि, ते अहं शिष्यः त्वां प्रपन्नं मां शाधि.

स्वजनांविषयीं करुणा उत्पन्न झाल्यामुळें माझें मन घोंटाळलें आहे, कर्तव्य कोणतें याविषयीं माझी मति चालेनाशी झाली आहे, म्हणून मी तुम्हांला विचारतों, कीं जें श्रेयकर असेल तें निश्चयेंकरून मला सांगा. मी तुमचा शिष्य, तुम्हांला शरण आलों आहें, कृपा करून मला बोध करा ॥ ७ ॥

**न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणाम् ।**
**अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥८॥**

न (नाहीं) हि (कारण) प्रपश्यामि (मी पाहतों) मम (माझा) अपनुद्यात् (नाहींसा करील) यत् (जें) शोकं (शोक) उच्छोषणम् (शोषणारा) इंद्रियाणाम् (इंद्रियांचा) अवाप्य (मिळाल्यावर) भूमौ (पृथ्वीवर) असपत्नं (निर्वैर) ऋद्धं (संपन्न) राज्यं (राज्य) सुराणां (देवांचें) अपि (सुद्धां) च (आणि) आधिपत्यम् (स्वामित्व).

हि भूमौ असपत्नं ऋद्धं राज्यं च सुराणां आधिपत्यं अपि अवाप्य, यत् मम इंद्रियाणां उच्छोषणं शोकं अपनुद्यात् (तत्) न पश्यामि.

कारण पृथ्वीवरील निर्वैर व संपन्न राज्य आणि देवांचें स्वामित्वहि मिळालें तरी माझीं इंद्रियें शोषणारा शोक ज्यापासून नाहींसा होईल असें कांहीं मला दिसून येत नाहीं ॥ ८ ॥

**संजय उवाच—एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतपः ।**
**न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥९॥**

एवं (याप्रमाणें) उक्त्वा (बोलून) हृषीकेशं (हृषी केशाला, श्रीकृष्णाला) गुडाकेशः = गुडाकायाः ईशः (निद्रेचा स्वामी, निरलस अर्जुन) परंतपः = परान् तपति (शत्रूंना ताप देणारा अर्जुन) न योत्स्ये (युद्ध करणार नाहीं) इति (याप्रमाणें) गोविंदं (श्रीकृ-

णाला ) उक्त्वा ( सांगून ) तूष्णीं ( स्तब्ध ) बभूव ( झाला ) ह ( खरोखर ).

परंतपः गुडाकेशः हृषीकेशं एवं उक्त्वा ' न योत्स्ये ' इति गोविंदं उक्त्वा तूष्णीं बभूव ह.

शत्रूंला ताप देणारा गुडाकेश म्हणजे अर्जुन श्रीकृष्णाला असें बोलून ' मी युद्ध करणार नाहीं ' असें गोविंदाला ( म्हणजे श्रीकृष्णाला ) सांगून मुकाट्यानें बसला ॥ ९ ॥

तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ॥
सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः ॥ १० ॥

तं ( त्याला, अर्जुनाला ) उवाच ( म्हणाला ) हृषीकेशः ( श्रीकृष्ण ) प्रहसन् ( हंसत हंसत ) इव ( जणूं ) भारत ( धृतराष्ट्रा ) सेनयोः ( दोन सैन्यांच्या ) उभयोः ( दोहोंच्या ) मध्ये ( मध्यें ) विषीदंतं ( खिन्न झालेल्याला ) इदं ( हें ) वचः ( भाषण ).

भारत, उभयोः सेनयोः मध्ये विषीदंत तं प्रहसन् इव हृषीकेशः इदं वचः उवाच.

हे धृतराष्ट्रा ! दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं खिन्नांतःकरण होऊन बसलेल्या अर्जुनाला श्रीकृष्णानीं हंसल्यासारखें करून हें ( पुढील ) भाषण केलें.

श्रीभगवानुवाच—अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।
गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पंडिताः ॥११॥

अशोच्यान् ( शोक करावयास योग्य नाहींत अशांविषयीं ) अन्वशोचः ( शोक करीत आहेस ) त्वं ( तूं ) प्रज्ञावादान् = प्रज्ञायाः वादान् ( शहाणपणाच्या गोष्टी ) च ( आणि ) भाषसे (सांगत आहेस) गतासून् = गताः आसवः येषां तान् ( गेले आहेत प्राण ज्यांचे अशांविषयीं ) अगतासून् = न गताः आसवः येषां तान् ( गेले नाहींत प्राण ज्यांचे ते ) च ( आणि ) न अनुशोचंति ( शोक करीत नाहींत ) पंडिताः ( शहाणे लोक )

त्वं अशोच्यान् अन्वशोचः च प्रज्ञावादान् भाषसे, पंडिताः गतासून् च अगतासून् च शोचंति.

श्रीभगवान् म्हणालेः—ज्यांच्याविषयीं शोक करूं नये त्यांकरितां शोक करतोस आणि वर शहाणपणाच्या गोष्टी सांगतोस ! शहाणे पुरुष मेलेल्या किंवा जिवंत माणसांबद्दल रडत बसत नाहींत (पर्वा करीत नाहींत) ॥ ११ ॥

न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ।
न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥ १२ ॥

न ( नाहीं ) तु ( खरोखर ) एव ( देखील ) अहं ( मी ) जातु ( कधीं ) न आसं ( नव्हतों ) न ( नाहीं ) त्वं ( तूं ) न ( नाहीं ) इमे ( हे ) जनाधिपाः = जनानां अधिपाः ( लोकांचे स्वामी, राजे ) न ( नाहीं ) च ( आणि ) एव ( देखील ) न ( नाहीं ) भविष्यामः ( होणार ) सर्वे ( सर्व ) वयम् ( आम्ही, आपण ) अतः ( या वेळे-पासून ) परं ( नंतर, पुढें ).

अहं तु एव जातु न आसं न, न त्वं, इमे जनाधिपाः न, सर्वे वयं अतः परं न भविष्यामः ( इति ) न च एव.

मी कधीं देखील नव्हतों असें नाहीं, तूं व राजे नव्हते असें नाहीं आणि आपण सर्व यापुढें असणार नाहीं असेंही नाहीं. सारांश, आपण सर्व यापूर्वी कधीं नव्हतों असेंही नाहीं आणि यापूर्वी असणार नाहीं असेंही नाहीं. आपण अनादि व अनंत आहोंत ॥ १२ ॥

देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।
तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥

देहिनः ( देहांत राहण्याचे, जीवात्म्याचें ) अस्मिन् ( यामध्यें ) यथा ( ज्याप्रमाणें ) देहे ( देहांत ) कौमारं ( बाळपण ) यौवनं ( तरुणपण ) जरा (म्हातारपण) तथा ( त्याप्रमाणें ) देहांतरप्राप्तिः = देहांतरस्य प्राप्तिः ( दुसऱ्या देहाची प्राप्ति, बदललेला देह मिळणें ) धीरः ( शहाणा मनुष्य ) तत्र ( तेथें ) न मुह्यति ( मोह पावत नाहीं, दुःख करीत नाहीं ).

अस्मिन् देहे देहिनः कौमारं, यौवनं, जरा यथा ( दृष्टा ) तथा देहांतर-प्राप्तिः ( अपि दृष्टव्या ) तत्र धीरः न मुह्यति.

या देहांत वास करणाऱ्या जीवात्म्याला ज्याप्रमाणें बालपण, तरुणपण व म्हातारपण अनुभवावें लागतें, त्याप्रमाणेंच दुसऱ्या देहाची प्राप्ति समजावी. तसें झालें ( दुसरा देह धारण करावा लागला ) म्हणून शहाणा मनुष्य मोह पावत नाहीं ॥ १३ ॥

**मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदुःखदाः ।**
**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ १४ ॥**

**मात्रास्पर्शाः** = मात्रायाः स्पर्शाः ( मोजले जाणारे म्ह० शब्दादि विषय जे इंद्रियांनीं अनुभविले जातात ते बाह्य विषय मात्रा होत, त्यांचा इंद्रियांशीं संयोग ) तु (खरोखर) **कौन्तेय** ( कुंतिपुत्रा अर्जुना ) **शीतोष्णसुखदुःखदाः** = शीतं च उष्णं च सुखं च दुःखं च ददति इति ( थंडी, उष्ण, सुख, दुःख देणारे ) **आगमापायिनः**= आगमः च अपायः च येषां ते ( येणें व जाणें ज्यांमध्यें आहे ते ) **अनित्याः** ( अशाश्वत ) **तान्** ( त्यांना ) **तितिक्षस्व** ( तूं सहन कर ) **भारत** ( अर्जुना ).

कौंतेय, मात्रास्पर्शाः शीतोष्णसुखदुःखदाः तु आगमापायिनः अनित्याः भारत; तान् तितिक्षस्व.

हे कुंतिपुत्रा अर्जुना ! इंद्रियांशीं शब्दादि विषयांचे होणारे संयोग हे शीतोष्णसुखदुःख देणारे होत; ते उत्पन्न होऊन विनाश पावणारें म्हणजे क्षणभंगूर आहेत. हे भारता ! ते तूं ( शोक न करितां ) सहन कर ॥१४॥

**यं हि न व्यथयंत्येते पुरुषं पुरुषर्षभ ।**
**समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥**

यं ( ज्याला ) हि ( कारण ) न ( नाहीं ) व्यथयांति ( पीडा देतात ) एते ( हे ) पुरुषं ( पुरुषाला ) **पुरुषर्षभ** = पुरुषाणां ऋषभ ( हे पुरुषश्रेष्ठा ) **समदुःखसुखं** = समं दुःखं च सुखं च यस्य तं ( दुःख व सुख हीं ज्याला सारखीं, त्याला ) **धीरं** ( स्थिर बुद्धीच्या पुरुषाला )

सः ( तो ) अमृतत्वाय ( ब्रह्मस्थिति प्राप्त करून घेण्याला ) कल्पते ( योग्य होतो ).

पुरुषर्षभ, समदुःखसुखं यं धीरं पुरुषं एते न व्यथयंति सः अमृतत्वाय कल्पते.

हे श्रेष्ठ पुरुषा अर्जुना ! सुखदुःख हीं सारखीं मानणाऱ्या स्थिरचित्ताच्या पुरुषाला त्यांची व्यथा होत नाहीं, तोच ब्रह्मस्थिति प्राप्त करून घेण्याला योग्य होतो ॥ १५ ॥

नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।
उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥ १६ ॥

न ( नाहीं ) असतः ( ज्यास अस्तित्व नाहीं तो ) विद्यते ( आहे ) भावः ( अस्तित्व ) न ( नाहीं ) अभावः ( नास्तित्व ) विद्यते ( आहे ) सतः ( अस्तित्वाचा ) उभयोः ( दोहोंचा ) अपि ( सुद्धां ) दृष्टः ( पाहिलेला आहे ) अंतः ( शेवट, सत्यसिद्धान्त ) तु ( खरोखर ) अनयोः ( या दोहोंचा ) तत्वदर्शिभिः ( सत्य पाहणारांनीं ).

असतः भावः न विद्यते; सतः अभावः न विद्यते; अनयोः उभयोः अपि अंतः तत्वदर्शिभिः दृष्टः.

जें मुळींच नाहीं ( असत्, खोटें ) त्याला अस्तित्व येत नाहीं; जें आहे ( सत = सत्य ) तें नाहीं असें होत नाहीं, " आहे " " नाहीं " सत् आणि असत् या दोहोंचा तत्ववेत्त्यांनीं शेवट म्हणजे सत्यसिद्धांत पाहिलेला आहे ( जाणला आहे. ) ॥१६॥

अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।
विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ १७ ॥

अविनाशि ( नाश न पावणारें ) तु (खरोखर) तत् ( तें ) विद्धि ( जाण ) येन ( ज्यानें ) सर्वं ( सर्व ) इदं ( हें ) ततं ( व्यापलेलें आहे ) विनाशं ( नाश ) अव्ययस्य ( विकार न पावणाराचा, आत्म्याचा ) अस्य ( याचा ) न ( नाहीं ) कश्चित् ( कोणीही ) कर्तुं ( करावयाला ) अर्हति ( समर्थ आहे ).

येन इदं सर्वं ततं तत् तु अविनाशि ( इति ) विद्धि, अस्य अव्ययस्य विनाशं कर्तुं कश्चित् न अर्हति.

ज्यानें हें सर्व ( विश्व ) व्यापलें आहे तें ( आत्मतत्व ) तर चिरकाल टिकणारें आहे असें समज. या ' अव्ययाचा ' म्हणजे निर्विकारी आत्म्याचा नाश करावयाला कोणीहि समर्थ नाहीं ॥ १७ ॥

**अंतवंत इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ।**
**अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥ १८ ॥**

**अंतवंतः** ( नाशवंत ) **इमे** ( हे ) **देहाः** ( शरीरें ) **नित्यस्य** ( शाश्वताचे ) **उक्ताः** ( म्हटलें आहे ) **शरीरिणः** ( शरीर धारण करणाराचे ) **अनाशिनः** ( नाश न पावणाराचे ) **अप्रमेयस्य** ( ज्याची गणना करतां येत नाहीं अशाच ) **तस्मात्** ( याकरतां ) **युध्यस्व** ( युद्ध कर ) **भारत** ( अर्जुना ).

नित्यस्य अनाशिनः अप्रमेयस्य शरीरिणः इमे देहाः अंतवंतः ( इति ) उक्ताः, भारत, तस्मात् युध्यस्व.

शाश्वत, अविनाशी, अगण्य अशा या शरीर धारण करणाऱ्या आत्म्याचे देह नाश पावणारे आहेत. याकरितां हे अर्जुना ! तूं युद्ध कर ॥ १८ ॥

**य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतम् ।**
**उभौ तौ न विजानीतो नायं हंति न हन्यते ॥ १९ ॥**

**यः** ( जो ) **एनं** ( याला म्हणजे आत्म्याला ) **यः** ( जो ) **च** (आणि) **एनं** ( याला ) **मन्यते** ( समजतो ) **हतं** ( मेला आहे ) **उभौ** (दोघे) **तौ** ( ते दोघे ) **न विजानीतः** ( दोघे जाणीत नाहींत ) **न** ( नाहीं ) **अयं** ( हा ) **हंति** ( मारतो ) **न हन्यते** ( मारला जात नाहीं ).

यः एनं हंतारं वेत्ति च यः एनं हतं ( इति ) मन्यते, तौ उभौ न विजानीतः; अयं न हंति ( च ) न हन्यते.

जो ' हा आत्मा मारणारा आहे ' असें समजतो आणि जो ' हा आत्मा मारला जातो ' असें मानतो, त्या दोघांनाही त्याचें ( खरें ) ज्ञान नाहीं. हा मारीत नाहीं व मारलाही जात नाहीं ॥ १९ ॥

**न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वाऽभविता वा न भूयः।**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥२०॥**

**न** ( नाहीं ) **जायते** ( जन्मास येतो ) **म्रियते** ( मरतो ) **वा** ( अथवा ) **कदाचित्** ( कधींहि ) **न** ( नाहीं ) **अयं** ( हा ) **भूत्वा** ( असून ) **अभविता** ( नसणारा ) **वा** ( अथवा ) **न** ( नाहीं ) **भूयः** ( पुन्हा ) **अजः** ( जन्मरहित ) **नित्यः** ( सदोदित असणारा ) **शाश्वतः** ( सनातन ) **अयं** ( हा ) **पुराणः** ( अनादि ) **न** ( नाहीं ) **हन्यते** ( मारला जातो ) **हन्यमाने** ) मारलें जाणाऱ्यांत ) **शरीरे** ( शरिरांत ).

अयं कदाचित् न जायते वा न म्रियते, वा ( अयं कदाचित् ) भूत्वा भूयः अभविता न, अजः नित्यः शाश्वतः पुराणः अयं हन्यमाने शरीरे न हन्यते.

हा ( आत्मा ) कधींहि जन्म पावत नाहीं किंवा मरत नाहीं, आणि केव्हांहि असून पुनः ' नाहीं ' असा होत नाहीं. हा जन्मरहित, चिरकालीन, सनातन, अनादि आत्मा, शरिराचा नाश झाला तरी स्वतः मारला ज़ात नाहीं ( नाश पावत नाहीं ) ॥ २० ॥

**वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ।**
**कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हंति कम् ॥ २१ ॥**

**वेद** ( जाणतो ) **अविनाशिनं** ( नाश न पावणाराला ) **नित्यं** ( चिरकालिनाला ) **यः** ( जो ) **एनं** ( याला झ० आत्म्याला ) **अजं** ( जन्म नाहीं त्याला ) **अव्ययं** ( निर्विकारी त्याला ) **कथं** ( कसे ) **सः** ( तो ) **पुरुषः** ( पुरुष ) **पार्थ** ( अर्जुना ) **कं** ( कोणाला ) **घातयति** ( मारवितो ) **हंति** ( मारतो ) **कं** ( कोणाला ).

यः एनं अविनाशिनं, नित्यं, अजं, अव्ययं, ( इति ) वेद सः पुरुषः पार्थ ! कथं कं घातयति कं हंति ?

जो, हा आत्मा अविनाशी, नित्य, जन्म नाहीं असा आणि निर्विकारी आहे, असें जाणतो तो पुरुष, पार्था, कोणाला कसा मारवितो अगर कोणाला कसा मारतो ? ॥ २१ ॥

**वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।**
**तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही २२**

**वासांसि** ( वस्त्रें ) **जीर्णानि** ( वापरून निरुपयोगीं झालेलीं ) **यथा** ( ज्याप्रमाणें ) **विहाय** ( टाकून देऊन ) **नवानि** ( नवीं ) **गृह्णाति** ( धारण करतो ) **नरः** ( मनुष्य ) **अपराणि** ( दुसरीं ) **तथा** ( त्याप्रमाणें ) **शरीराणि** ( शरीरें ) **विहाय** ( टाकून देऊन ) **जीर्णानि** ( निरुपयोगी झालेलीं ) **अन्यानि** ( दुसरीं ) **संयाति** ( प्राप्त करून घेतो ) **नवानि** ( नवीं ) **देही** ( आत्मा ).

यथा जीर्णानि वासांसि विहाय नरः अपराणि नवानि गृह्णाति तथा जीर्णानि शरीराणि विहाय देही अन्यानि नवानि संयाति.

ज्याप्रमाणें जुनीं वस्त्रें टाकून देऊन मनुष्य दुसरीं नवीं वस्त्रें धारण करतो, त्याप्रमाणें देहधारी आत्मा निरुपयोगी झालेलीं शरीरें टाकून देऊन दुसऱ्या नवीन शरिरांत प्रवेश करतो ॥ २२ ॥

**नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।**
**न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः ॥ २३ ॥**

**न** ( नाहीं ) **एनं** ( याला ) **छिंदंति** ( तोडतात ) **शस्त्राणि** ( शस्त्रें ) **न** ( नाहीं ) **एनं** (याला) **दहति** (जाळतो) **पावकः** (अग्नि) **न** ( नाहीं ) **च** ( आणि ) **एनं** ( याला ) **क्लेदयंति** ( भिजवितात ) **आपः** ( पाणी ) **न** ( नाहीं ) **शोषयति** (सुकवितो) **मारुतः** (वायु).

एनं शस्त्राणि न छिंदंति; एनं पावकः न दहति; एनं आपः न क्लेदयंति; च मारुतः न शोषयति.

याला ( आत्म्याला ) शस्त्रें तोडीत नाहींत, याला अग्नि जाळीत नाहीं, याला पाणी भिजवीत नाहीं, आणि वारा सुकवीत नाहीं ॥ २३ ॥

**अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।**
**नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥ २४ ॥**

**अच्छेद्यः** ( तोडला न जाणारा ) **अयं** ( हा ) **अदाह्यः** ( जाळला न जाणारा ) **अयं** ( हा ) **अक्लेद्यः** ( न भिजणारा ) **अशोष्यः** ( सुक-

विला न जाणारा ) एव ( देखील ) च ( आणि ) नित्यः ( चिरकाल असणारा ) सर्वगतः = सर्वस्मिन् गतः ( सर्वव्यापी ) स्थाणुः ( स्थिर राहणारा ) अचलः ( न हलणारा ) अयं ( हा ) सनातनः (पुरातन).

अयं अच्छेद्यः अयं अदाह्यः अयं अक्लेद्यः च अशोष्यः एव अयं नित्यः सर्वगतः स्थाणुः अचलः सनातनः

हा ( आत्मा ) तोडला न जाणारा, हा जाळला न जाणारा, हा न भिजणारा आणि सुकला न जाणाराही आहे; हा नित्य ( अविनाशी ), सर्वव्यापी, स्थिर राहणारा, निश्चल ( गतिशून्य ) व सनातन ( सर्वकाळ राहणारा ) आहे ॥ २४ ॥

अव्यक्तोऽयमचिंत्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।
तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥ २५ ॥

अव्यक्तः ( अदृश्य ) अयं (हा) अचिंत्यः (कल्पनेच्या पलीकडला) अयं ( हा ) अविकार्यः ( विकार न पावणारा ) अयं ( हा ) उच्यते ( म्हटलें आहे ) तस्मात् ( म्हणून ) एवं ( त्याप्रमाणें ) विदित्वा ( जाणून ) एनं ( याला ) न ( नाहीं ) अनुशोचितुं ( शोक करावयास ) अर्हसि ( योग्य आहेस ).

अयं अव्यक्तः, अयं अचिंत्यः, अयं अविकार्यः उच्यते, तस्मात् एनं एवं विदित्वा ( त्वं ) अनुशोचितुं न अर्हसि.

हा अव्यक्त, हा कल्पनातीत, हा निर्विकारी असें म्हटलें आहे; म्हणून हा याप्रमाणें आहे असें जाणून (याबद्दल) शोक करणें तुला उचित नाहीं २५

अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।
तथापि त्वं महाबाहो नैनं शोचितुमर्हसि ॥ २६ ॥

अथ ( जर ) च ( आणि ) एनं ( याला ) नित्यजातं = नित्यं जातं ( नेहमीं उत्पन्न होतो असा ) नित्यं ( सदोदित ) वा ( अथवा ) मन्यसे ( मानतोस ) मृतम् ( मरतो असा ) तथा ( तरी ) अपि ( सुद्धां ) त्वं ( तूं ) महाबाहो = महांतो बाहू यस्य ( ज्याचे बाहू मोठे

आहेत असा ) न ( नाहीं ) एवं ( याला ) शोचितुं ( शोक करा-वयाला ) अर्हसि ( पात्र आहेस ).

अथ च एनं नित्यजातं वा नित्यं मृतं मन्यसे, तथा अपि महाबाहो, त्वं एनं शोचितुं अर्हसि न.

आणि जरी हा आत्मा नेहमीं जन्मास येणारा अथवा नेहमीं मरणारा असें मानलेंस तरी, हे अजानुबाहो अर्जुना ! त्याविषयीं, तुला शोक करणें उचित नाहीं ॥ २६ ॥

जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।
तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥

जातस्य ( जन्मास आलेल्याचा ) हि ( कारण ) ध्रुवः ( खरा ) मृत्युः ( मरण ) ध्रुवं ( खरें ) जन्म ( जनन ) मृतस्य ( मेलेल्याचा ) च ( आणि ) तस्मात् ( याकरितां ) अपरिहार्ये ( टाळतां न येणाऱ्या ) अर्थे ( गोष्टीसाठीं ) न ( नाहीं ) त्वं ( तूं ) शोचितुं ( शोक करणें ) अर्हसि ( पात्र आहेस ).

हि जातस्य मृत्युः ध्रुवः च मृतस्य जन्म ध्रुवं, तस्मात् अपरिहार्ये अर्थे त्वं शोचितुं न अर्हसि.

कारण जन्मलेल्याला मृत्यु यावयाचा आणि मेलेल्याला पुनः जन्मास यावयाचें हें निश्चित आहे; म्हणून जी गोष्ट टाळतां येण्यासारखी नाहीं, तिजविषयीं शोक करणे तुला उचित नाहीं. ॥२७॥

अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।
अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ २८ ॥

अव्यक्तादीनि = अव्यक्तं आदिः येषां तानि ( जे आरंभीं अदृश्य ) भूतानि ( प्राणिमात्र ) व्यक्तमध्यानि = व्यक्तं मध्यः येषां तानि ( ज्यांची मध्य अवस्था दृष्टीगोचर ते ) भारत ( अर्जुना ) अव्यक्त-निधनानि = अव्यक्तं निधनं येषां तानि ( ज्याचा अंतहि अदृश्य होण्यांत ते ) एव ( देखील ) तत्र ( तेथें अशा परिस्थितींत ) का ( कसला ) परिदेवना ( शोक ).

भूतानि अव्यक्तादीनि, व्यक्तमध्यानि, ( च ) अव्यक्तनिधनानि एव, भारत, तत्र का परिदेवना.

प्राणिमात्रांचा मूळ उद्भव अदृश्यापासून आहे, मधली स्थिति दृष्टिगोचर आहे आणि शेवटीं त्याचा मृत्यु ( लय ) हि अदृश्यांत होतो; मग हे अर्जुना, ( अशी जर सर्वांचीच स्थिति आहे तर ) अशांविषयीं शोक कां करावा ? ॥ २८ ॥

**आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।**
**आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् २९**

**आश्चर्यवत्** ( आश्चर्ययुक्त ) **पश्यति** ( पहातो ) **कश्चित्** ( कोणी एक ) **एनं** ( याला, आत्म्याला ) **आश्चर्यवत्** ( आश्चर्य वाटण्याजोगें ) **वदति** ( बोलतो ) **तथा** ( त्याप्रमाणें ) **एव** ( देखील ) **च** ( आणि ) **अन्यः** ( दुसरा ) **आश्चर्यवत्** ( आश्चर्यानें ) **च** ( आणि ) **एनं** ( याला ) **अन्यः** ( दुसरा ) **शृणोति** ( ऐकतो ) **श्रुत्वा** ( ऐकून ) **अपि** ( सुद्धां ) **एनं** ( याला ) **वेद** ( जाणतो ) **न** ( नाहीं ) **च** (आणि) **एव** ( देखील ) **कश्चित्** ( कोणी ).

कश्चित् एनं आश्चर्यवत् पश्यति च तथा एव अन्यः आश्चर्यवत् वदति च अन्यः आश्चर्यवत् एनं शृणोति च श्रुत्वा अपि कश्चित् एव एनं न वेद.

कोणी या आत्म्याकडे आश्चर्यानें पहातो, तर दुसरा त्याविषयीं आश्चर्य वाटण्यासारखें वर्णन करतो, आणखी दुसरा त्याविषयीं ऐकून आश्चर्य करतो; पण ( याप्रमाणें पाहून वर्णन करून ) ऐकूनहि कोणी ( तत्वतः ) जाणीत नाहीं ॥ २९ ॥

**देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।**
**तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥ ३० ॥**

**देहि** ( देह धारण करणारा, आत्मा ) **नित्यं** ( चिरकाल ) **अवध्यः** ( वध न पावणारा ) **अयं** ( हा ) **देहे** ( देहामध्यें ) **सर्वस्य** ( सर्वांच्या ) **भारत** ( अर्जुना ) **तस्मात्** ( यास्तव ) **सर्वाणि** ( सर्व )

भूतानि ( प्राणिमात्र ) न ( नाहीं ) त्वं ( तूं ) शोचितुं ( शोक करावयाला ) अर्हसि ( पात्र आहेस ).

भारत, अयं देही सर्वस्य देहे नित्यं अवध्यः, तस्मात् त्वं सर्वाणि भूतानि शोचितुं न अर्हसि.

अर्जुना ! सर्व प्राणिमात्रांच्या शरिरांत हा आत्मा सदोदित अमर असतो, म्हणून सर्व प्राणिमात्रांविषयीं तुला शोक करणें योग्य नाहीं ॥३०॥

स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि ।
धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥३१॥

स्वधर्मं = स्वस्य धर्मं ( स्वतःच्या धर्माविषयीं ) अपि ( सुद्धां ) च ( आणि ) आवेक्ष्य ( पाहून ) न ( नाहीं ) विकंपितुं ( कचरण्याला ) अर्हसि ( पात्र आहेस ) धर्म्यात् ( धर्मविहीत) हि (कारण) युद्धात् ( युद्धापेक्षां ) श्रेयः ( जास्त चागलें ) अन्यत् ( दुसरें कांहीं) क्षत्रियस्य (क्षत्रियाचें) न ( नाहीं ) विद्यते ( असतें, राहतें ).

च स्वधर्मं अपि आवेक्ष्य विकंपितुं न अर्हसि, हि धर्म्यात् युद्धात् क्षत्रियस्य अन्यत् श्रेयः न विद्यते.

आणि स्वधर्माविषयीं विचार केला तरी कचरण्याचें प्रयोजन नाहीं; कारण क्षत्रियाला आपल्या धर्माप्रमाणें युद्ध करण्यापेक्षां श्रेयकर अशी दुसरी कोणतीहि गोष्ट नाहीं ॥ ३१ ॥

यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।
सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभंते युद्धमीदृशम् ॥ ३२ ॥

यदृच्छया ( प्रसंगानें ) च ( आणि ) उपपन्नं ( प्राप्त झालेलें ) स्वर्गद्वारं = स्वर्गस्य द्वारं (स्वर्गाचें द्वार) अपावृतं (उघडलेलें) सुखिनः ( आनंदित ) क्षत्रियाः ( क्षत्रिय लोक ) पार्थ ( अर्जुना ) लभंते ( मिळवितात ) युद्धं ( युद्ध ) ईदृशं ( यासारखें ).

( इदं युद्धं ) यदृच्छया उपपन्नं च ( अनेन ) स्वर्गद्वारं अपावृतं (इव), पार्थ ! सुखिनः क्षत्रियाः ईदृशं युद्धं लभंते.

हे अर्जुना ! आपोआप प्राप्त झालेलें आणि ज्यानें स्वर्गाचें दार उघडें केलें आहे असें हें युद्ध सुदैवी क्षत्रियांनाच लाभतें ॥ ३२ ॥

**अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ।**
**ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥ ३३॥**

**अथ** ( आतां ) **चेत्** ( जर ) **त्वं** ( तूं ) **इमं** ( हें ) **धर्म्यं** (धर्माला अनुकूल ) **संग्रामं** ( युद्ध ) **न करिष्यसि** ( न करशील ) **ततः** ( तर) **स्वधर्मं** ( आपला धर्म, आपलें कर्तव्य ) **कीर्तिं** ( कीर्ति ) **च** (आणि) **हित्वा** ( गमावून ) **पापं** ( पाप ) **अवाप्स्यसि** ( मिळविशील ).

अथ चेत् त्वं इमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ततः स्वधर्मं च कीर्तिं (च) हित्वा पापं अवाप्स्यसि.

आतां जर तूं क्षत्रियधर्माला अनुकूल असें हें युद्ध करणार नाहींस तर तूं आपला धर्म व आपली कीर्ति गमावून पापाची जोड करून घेशील ॥३३॥

**अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यंति तेऽव्ययाम् ।**
**संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ ३४ ॥**

**अकीर्तिं** ( अपकीर्ति ) **च** ( आणि ) **अपि** ( सुद्धां ) **भूतानि** ( प्राणिमात्र ) **कथयिष्यंति** (सांगतील, गातील) **ते** (तुझी) **अव्ययाम्** ( निरंतर ) **संभावितस्य** ( श्रेष्ठ पुरुषाची ) **च** ( आणि ) **अकीर्तिः** ( अपकीर्ति ) **मरणात्** (मरणापेक्षां) **अतिरिच्यते** ( जास्त असते )

च ते अव्ययां अकीर्तिं भूतानि कथयिष्यंति च संभावितस्य अकीर्तिः मरणात् अतिरिच्यते.

आणि तुझी अपकीर्ति प्राणीमात्र गात राहतील, आणि संभावित पुरुषाला अपकीर्ति ही मरणाहून जास्त दुखःदायक होय ॥ ३४ ॥

**भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः ।**
**येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥ ३५ ॥**

**भयात्** ( भयापासून ) **रणात्** ( रणापासून ) **उपरतं** ( परत आलेला ) **मंस्यन्ते** ( समजतील ) **त्वां** ( तुला ) **महारथाः** ( मोठे

योद्धे ) येषां ( ज्यांचा ) च ( आणि ) त्वं ( तूं ) बहुमतः ( सन्मान· नीय ) भूत्वा ( होऊन ) यास्यसि ( पावशील ) लाघवं ( हलके )

महारथाः त्वां भयात् रणात् उपरतं मंस्यंते च येषां त्वं बहुमतः भूत्वा ( स्थितः तेषां ) लाघवं यास्यसि.

मोठेमोठे योद्धे तूं रणांतून भिऊन परत फिरलास असें समजतील; आणि ज्यांना तूं आतांपर्यंत सन्माननीय होतास, ते तुला तुच्छ मानतील ॥ ३५ ॥

**अवाच्यवादांश्च बहून्वदिष्यंति तवाहिताः।**
**निंदंतस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥ ३६ ॥**

**अवाच्यवादान्**=अवाच्यान् वादान् ( बोलूं नयेत असे शब्द ) च ( आणि ) **बहून्** ( पुष्कळ ) **वदिष्यंति** ( बोलतील ) **तव** ( तुझें ) **अहिताः** ( अकल्याण चिंतणारे ) **निंदंतः** ( निंदा करणारे ) **तव** (तुझें) **सामर्थ्यं** ( पराक्रम ) **ततः** ( त्यापेक्षां ) **दुःखतरं** (जास्त दुःखकारक) **नु** ( खरोखर ) **किं** ( कोणतें ).

च तव सामर्थ्यं निन्दंतः तव अहिताः बहून् अवाच्यवादान् वदिष्यंति ततः दुःखतरं नु किं ?

तुझे शत्रू बोलूं नयेत ते शब्द ( तुझ्याबद्दल ) बोलतील आणि तुझ्या पराक्रमाची निंदा करतील; खरोखर याहून जास्त दुःखकारक कोणतें बरें? ३६

**हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महिम् ।**
**तस्मादुत्तिष्ठ कौंतय युद्धाय कृतनिश्चयः ॥ ३७ ॥**

**हतः** ( मारला गेलास ) **वा** ( अथवा ) **प्राप्स्यसि** (मिळविशील) **स्वर्गं** ( स्वर्गलोक ) **जित्वा** ( जिंकून ) **वा** ( अथवा ) **भोक्ष्यसे** ( भोगशील ) **महीं** ( पृथ्वीचें राज्य ) **तस्मात्** ( म्हणून ) **उत्तिष्ठ** (उठ) **कौंतेय** ( अर्जुना ) **युद्धाय** ( युद्धाकरितां ) **कृतनिश्चयः** =कृतः निश्चयः येन सः ( निश्चय केलेला आहे ज्यानें तो )

हतः वा स्वर्गं प्राप्स्यसि, वा जित्वा महीं भोक्ष्यसे, तस्मात् हे कौंतेय, युद्धाय कृतनिश्चयः उत्तिष्ठ.

( युद्धांत ) मारला गेलास तर तुला स्वर्गलोक प्राप्त होईल; बरें, शत्रूला

जिंकलेस तर पृथ्वीचें राज्य भोगशील; याकरितां कुंतिपुत्रा अर्जुना! युद्ध करावयाचा ठाम निश्चय करून उठ, तयार हो ॥ ३७ ॥

**सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।**
**ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ ३८ ॥**

**सुखदुःखे** = सुखं च दुःखं च (सुख व दुःख) **समे** (सारखीं) **कृत्वा** (करून) **लाभालाभौ** = लाभः च अलाभः च (नफा व तोटा) **जयाजयौ** = जयः च अजयः च (जय व अपजय) **ततः** (नंतर) **युद्धाय** (युद्धाला) **युज्यस्व** (लाग, झुंप) **न** (नाहीं) **एवं** (याप्रमाणें) **पापं** (पाप) **अवाप्स्यसि** (मिळविशील).

सुखदुःखे, लाभालाभौ, जयाजयौ समे कृत्वाः ततः युद्धाय युज्यस्व, एवं पापं न अवाप्स्यसि.

सुखदुःख, लाभहानि, जय व अपजय हीं द्वंद्वें सारखींच मानून मग युद्धाला लाग, म्हणजे तुला पाप लागणार नाहीं ॥ ३८ ॥

**एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ।**
**बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि ॥ ३९ ॥**

**एषा** (ही) **ते** (तुला) **अभिहिता** (सांगितली) **सांख्ये** (सांख्यशास्त्रांतील) **बुद्धिः** (बुद्धि, ज्ञान) **योगे** (योगशास्त्रांतील) **तु** (आतां) **इमां** (ही, पुढें सांगावयाची ती) **शृणु** (ऐक) **बुध्द्या** (बुद्धीनें, ज्ञानानें) **युक्तः** (युक्त होऊन, मिळवून) **यया** (जिनें) **पार्थ** (हे अर्जुना) **कर्मबंधं** = कर्मणः बंधं (कर्माचें बंधन) **प्रहास्यसि** (सोडून देशील).

एषा सांख्ये बुद्धिः ते अभिहिता तु योगे इमां (बुद्धिं) शृणु; पार्थ, यया बुद्ध्या युक्तः कर्मबंधं प्रहास्यसि.

ही आतांपर्यंत तुला सांगितलेली ती सांख्यबुद्धि, म्हणजे सांख्यशास्त्रांतील ज्ञान होय; पण आतां पुढें (कर्म) योगशास्त्रांतील ज्ञान सांगतों तें ऐक; अर्जुना! तें ज्ञान आल्यानें कर्माचा बंध (तुला) तोडून टाकतां येईल ॥ ३९ ॥

**नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।**
**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ४० ॥**

**न** ( नाहीं ) **इह** ( येथें, या योगामध्यें ) **अभिक्रमनाशः** = अभिक्रमस्य नाशः ( आरंभ झालेल्या क्रमाचा नाश, प्रयत्नाचा नाश ) **अस्ति** ( असतो ) **प्रत्यवायः** ( अडचण, विघ्न ) **न** ( नाहीं ) **विद्यते** ( असतो, होतो ) **स्वल्पं** ( थोडेंसें ) **अपि** ( सुद्धां ) **अस्य** ( याच्या ) **धर्मस्य** ( धर्माचा ) **त्रायते** ( रक्षण करतो ) **महतः** ( मोठ्यापासून ) **भयात्** ( भयापासून ).

इह अभिक्रमनाशः न अस्ति ( च ) प्रत्यवायः न विद्यते; अस्य धर्मस्य स्वल्पं अपि महतः भयात् त्रायते.

या योगमार्गामध्यें आरंभिलेल्या कर्माचा नाश होत नाहीं आणि कसलीही अडचण येत नाहीं. या योगमार्गाचें थोडेंसें देखील आचरण मोठ्या भयापासून रक्षण करतें ॥ ४० ॥

**व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन ।**
**बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ ४१ ॥**

**व्यवसायात्मिका** = व्यवसायः आत्मा यस्याः सा ( निश्चय आहे आत्मा जिचा ती, कार्याकार्याचा निश्चय करणारी ) **बुद्धिः** ( बुद्धि ) **एका** ( एक, एकाग्र ) **इह** ( येथें, त्या योगामध्यें ) **कुरुनंदन**=कुरूणां नंदन ( कुरुकुलाला आनंद देणाऱ्या अर्जुना ) **बहुशाखा** = बह्वः शाखाः यासां ताः ( ज्यांना पुष्कळ फांद्या असतात त्या ) **हि** ( खरोखर ) **अनंताः** ( अगणित ) **च** ( आणि ) **बुद्धयः** ( बुद्धि ) **अव्यवसायिनां** ( अनिश्चितांच्या ).

कुरुनंदन, इह व्यवसायात्मिका बुद्धिः एका च, अव्यवसायिनां बुद्धयः हि अनंताः बहुशाखाः ( संति ).

हे कुरुकुलनंदना, अर्जुना ! या ( कर्म ) योगामध्यें मनुष्याची कार्याकार्याचा निश्चय करणारी बुद्धि ( विचारशक्ति ) एकाग्र असावी लागते, एकाच ध्येयाकडे तल्लीन असावी लागते आणि अनिश्चितांच्या बुद्धि अगणित असून त्यांना फाटे फार फुटतात ॥ ४१ ॥

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदंत्यविपश्चितः ।**
**वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥ ४२ ॥**

**यां** ( जी ) **इमां** ( ही ) **पुष्पितां** ( फुलवून मोहक केलेली ) **वाचं** ( वाणी ) **प्रवदंति** ( बोलतात ) **अविपश्चितः** ( अज्ञानी लोक ) **वेदवादरताः** = वेदस्य–कर्मकांडात्मकस्य वादेषु–फलदर्शकेषु–रताः ( कर्मकांडात्मक वेदांतील फलश्रुतीस भुलणारें ) **पार्थ** ( अर्जुना ) **न** ( नाहीं ) **अन्यत्** ( दुसरें कांहीं ) **अस्ति** ( आहे ) **इति** ( याप्रमाणें ) **वादिनः** ( सांगणारे ). ॥ ४२ ॥

**कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।**
**क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥**

**कामात्मानः** = कामः आत्मा येषां ते ( काम हा ज्यांचा जीव ते = कामनीक ) **स्वर्गपराः** = स्वर्गः परः येषां ते ( स्वर्ग ज्यांना श्रेष्ठ वाटतो ते ) **जन्मकर्मफलप्रदां** = जन्म च कर्मफलं प्रददाति तां ( कर्माचें फळ व 'जन्म' देणारी ) **क्रियाविशेषबहुलां** = क्रियाणां विशेषाः बहुलाः यास्यां तां ( जिच्या–वाणीच्या–मध्यें विशेषेंकरून पुष्कळशा क्रिया करावयास सांगितलेल्या असतात तिला ) **भोगैश्वर्यगतिं** = भोगस्य च ऐश्वर्यस्य च गतिं ( भोग व ऐश्वर्य यांची प्राप्ति ) **प्रति** ( करितां ).

**भोगैश्वर्यप्रसक्तानां तयाऽपहृतचेतसाम् ।**
**व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥**

**भोगैश्वर्यप्रसक्तानां** = भोगे च ऐश्वर्यें च प्रसक्तानां ( भोग व ऐश्वर्य यांमध्यें गढलेल्यांची ) **तया** ( त्या, वाणीनें ) **अपहृतचेतसां** = अपहृतं चेतः येषां तेषां ( ज्यांचें चित्त आकर्षिलेलें आहे त्यांची ) **व्यव-**

---

**टीपः**—श्लोक ४२, ४३ व ४४ यांपैकीं कोणत्याहि एका श्लोकांत स्वतंत्र रीतीनें वाक्य पुरें न होतां त्या प्रत्येकांतील पदांचा संबंध दुसऱ्या दोन श्लोकांतील पदांकडे असल्यामुळें हे तिन्ही श्लोक लिहून त्यांचा अन्वय व अर्थ एके ठिकाणीं दिल्यानें सर्व श्लोकांतील अर्थ संगतवार समजण्यास सोयीचें होतें. या करितां खालीं दिल्याप्रमाणें हे श्लोक एकदम लिहिले आहेत

सायात्मिका ( कार्याकार्याचा निश्चय करणारी ) बुद्धिः ( विचारशक्ति ) समाधौ ( समाधीमध्यें ) न विधीयते ( स्थिर रहात नाहीं. )

अन्वय—४२-४३ व ४४:—पार्थ, वेदवादरताः न अन्यत् अस्ति इति वादिनः अविपश्चितः कामात्मानः स्वर्गपराः भोगैश्वर्यगतिं प्रति क्रियाविशेषबहुलां जन्मकर्मफलप्रदां यां पुष्पितां वाचं प्रवदंति तया अपहृतचेतसां भोगैश्वर्यप्रसक्तानां समाधौ व्यवसायात्मिका बुद्धिः न विधीयते.

अर्थ—अर्जुना ! वेदांतील फलदायक कर्मप्रतिपादनास भुलणारे व फलदायक कर्मसाधनाशिवाय दुसरें कांहीं नाहीं असा वाद सांगणारे अविवेकी, विषयभोगाविषयीं तत्पर, स्वर्गप्राप्तीचा हेतु धरणारे असे लोक भोग व ऐश्वर्य मिळण्यासाठीं अनेक प्रकारच्या विशिष्ट क्रिया सांगणारी व कर्मफल आणि पुनर्जन्म देणारी अशी फुलवून मोहक वाणी बोलतात, त्या वाणीला ज्यांचें चित्त वश झालें आहे त्या, भोग व ऐश्वर्य ह्यांविषयीं तत्पर असलेल्या, लोकांची बुद्धि स्थिर व निश्चयात्मक अशी होत नाहीं ॥४२,४३,४४

त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।
निर्द्वंद्वो नित्यसत्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥ ४५ ॥

त्रैगुण्यविषयाः = त्रैगुण्यं विषयः येषां ते ( सत्व, रज आणि तम हे तीन गुण ज्यांच्या विवेचनाचा विषय आहेत ते ) वेदाः ( कर्मकांडात्मक वेद ) निस्त्रैगुण्यः ( त्रिगुणातीत ) भव (हो) अर्जुन (अर्जुना) निर्द्वंद्वः ( सुखदुःखादि द्वंद्वापासून अलिप्त असा ) नित्यसत्वस्थः = नित्यं सत्वे तिष्ठति इति ( सदोदित सात्विक गुणांचा आश्रय करणारा ) निर्योगक्षेमः = न अस्ति योगः च क्षेमः यस्य सः ( ज्याला ' योग ' म्हणजे जवळ नसलेली वस्तु मिळविण्याची इच्छा आणि क्षेम म्हणजे संपादित वस्तूचें संरक्षण करणें या दोन्ही गोष्टी करीत नाहीं तो ) आत्मवान् ( आत्मचिंतन करणारा, ब्रह्मनिष्ठ ).

वेदाः त्रैगुण्यविषयः ( संति, तथापि ) अर्जुन, त्वं निस्त्रैगुण्यः निर्द्वंद्वः नित्यसत्वस्थः निर्योगक्षेमः भव.

वेद हे त्रिगुणात्मक विषयांचें ( संसाराचें ) विवेचन करणारे असल्या-

मुळें, हे अर्जुना ! ( वेदाच्या प्रतिपादित कर्मकांडाकडे लक्ष न देतां ) तूं त्रिगुणातीत हो, सुखदुःखादि द्वंद्वांपासून अलिप्त व नेहमीं सात्विक वृत्तीनें राहणारा असा हो; तसेंच योगक्षेमाविषयीं उदासीन राहून आत्मचिंतनांत रत हो ॥ ४५ ॥

**यावानर्थउदपाने सर्वतः संप्लुतोदके ।**
**तावान् सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥**

**यावान्** (जेवढा) **अर्थः** (उपयोग) **उदपाने** ( लहान जलसंचयांत, विहीर वगैरे यांत ) **सर्वतः** ( चहूंकडे ) **संप्लुतोदके** = संप्लुते उदके ( जलमय झालें असतांना ) **तावान्** ( तेवढी ) **सर्वेषु** ( सर्वांमध्यें ) **वेदेषु** ( वेदांमध्यें ) **ब्राह्मणस्य** ( ब्रह्मवेत्त्याला ) **विजानतः** ( ज्ञान-प्राप्त झालेल्या ).

सर्वतः संप्लुतोदके ( सति ) यावान् उदपाने अर्थः तावान् सर्वेषु वेदेषु विजानतः ब्राह्मणस्य ( अर्थोऽस्ति ).

चोहोंकडे जलमय झालें ह्मणजे विहिरी, तळीं, वगैरे लहान संचयांचा जसा उपयोग नसतो, त्याप्रमाणेंच ज्ञानप्राप्ति झालेल्या ब्रह्मवेत्त्याला कर्म-कांडात्मक वेदांचा उपयोग होत नाहीं ॥ ४६ ॥

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।**
**मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥ ४७ ॥**

**कर्मणि** ( कर्म करण्यामध्यें ) **एव** ( फक्त ) **अधिकारः** (पात्रता) **ते** ( तुझा ) **मा** (नाहीं) **फलेषु** (फलाविषयीं, परिणामाविषयीं) **कदाचन** ( केव्हांहि, कधींही ) **मा** ( नको ) **कर्मफलहेतुः** = कर्मणः फलं हेतुः यस्य सः (कर्माचें फल मिळावें असा हेतु धारण करणारा) **भूः** ( हो ) **मा** (नको) **संगः** (आसक्ति) **अस्तु** (असो) **अकर्मणि** (कर्मशून्यतेमध्यें).

ते कर्मणि एव अधिकारः, कदाचन फलेषु मा, कर्मफलहेतुः मा भूः, अकर्मणि ते संगः मा अस्तु.



तुझा अधिकार कर्म करण्याचा मात्र आहे. कर्माच्या फलाविषयीं केव्हांही

नाहीं; याकरितां कर्माच्या फलाची इच्छा धारण करणारा होऊं नको, अथवा मुळींच कर्म करावयाचें नाहीं असा आग्रह धरूं नको ॥ ४७ ॥

**योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय ।**
**सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥४८॥**

**योगस्थः** = योगे स्थितः (योगनिष्ठ) **कुरु** (कर) **कर्माणि** (कर्में) **संगं** (आसक्ति) **त्यक्त्वा** (सोडून देऊन) **धनंजय** (अर्जुना) **सिद्ध्यसिद्ध्योः** = सिद्धौ च असिद्धौ च (सफळ अथवा निष्फळ झालें तरी) **समः** (सारखा) **भूत्वा** (होऊन) **समत्वं** (सारखेपणा ठेवणें) **योगः** (योग) **उच्यते** (म्हटलें आहे)

धनंजय, संगं त्यक्त्वा, सिद्ध्यसिद्ध्योः समः भूत्वा, योगस्थः कर्माणि कुरु, समत्वं योगः उच्यते.

हे अर्जुना! आसक्ति सोडून देऊन, कर्मांची सफलता किंवा निष्फळता यांविषयीं सारखी भावना ठेऊन योगनिष्ठ हो आणि कर्में कर; समभावना ठेवणें यालाच योग असें म्हटलें आहे ॥ ४८ ॥

**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ।**
**बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४९ ॥**

**दूरेण** (फारच) **हि** (कारण) **अवरं** (खालच्या प्रतीचें) **कर्म** (कर्म) **बुद्धियोगात्**=बुद्धेः योगात् (समभावनेच्या योगाहून) **धनंजय** (अर्जुना) **बुद्धौ** (समभावनेला) **शरणं** (आश्रय संपादणें) **अन्विच्छ** (इच्छा धारण कर) **कृपणाः** (दीन, पामर) **फलहेतवः** फलं हेतुः ऐषां ते (फळ ज्यांचा हेतु आहे ते, सकाम लोक).

हि धनंजय! बुद्धियोगात् कर्म दूरेण अवरं (अस्ति, बुद्धौ शरणं अन्विच्छ, फलहेतवः कृपणाः.

कारण, हे धनंजया! कर्म हें समबुद्धीच्या योगाहून फारच खालच्या प्रतीचें आहे, म्हणून समबुद्धीचा आश्रय कर. फलाशा धारण करणारे लोक कृपण म्हणजे दीन, पामर, कनिष्ठ प्रतीचे होत ॥ ४९ ॥

बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।
तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥ ५० ॥

**बुद्धियुक्तः** = बुद्ध्या युक्तः ( समत्वबुद्धि प्राप्त झालेला साधक ) **जहाति** ( त्याग करतो ) **इह** ( या लोकीं ) **उभे** ( दोन्हीं ) **सुकृत-दुष्कृते** = सुकृतं च दुष्कृतं ( पुण्य व पाप ) **तस्मात्** ( याकरतां ) **योगाय** ( बुद्धियोगाला ) **युज्यस्व** ( मिळवून घे ) **योगः** ( योग ) **कर्मसु** ( कर्मांमध्यें ) **कौशलम्** ( कुशलता असणें ).

बुद्धियुक्तः इह उभे सुकृत-दुष्कृते जहाति, तस्मात् योगाय युज्यस्व, कर्मसु कौशलं योगः ( अस्ति ).

समबुद्धि–योगाचें साधन करणारा पुरुष पाप व पुण्य या दोहोंचाहि त्याग करतो; याकरितां या बुद्धि –( समत्व ) योगाचाच आश्रय कर. कर्मांमध्यें, कुशलता–म्हणजे ' निष्काम समर्पणबुद्धि–असणें यालाच ' योग ' म्हणतात ॥ ५० ॥

कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ।
जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छंत्यनामयम् ॥ ५१ ॥

**कर्मजं** ( कर्मांपासून उत्पन्न झालेलें ) **बुद्धियुक्ताः** ( बुद्धियोग साध्य केलेले ) **हि** ( खरोखर ) **फलं** ( फळ ) **त्यक्त्वा** ( टाकून देऊन ) **मनीषिणः** ( ऋषि ) **जन्मबंधविनिर्मुक्ताः** = जन्मनः बंधनात् विनिर्मुक्ताः ( जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटलेले ) **पदं** ( पदाला, स्थानाला ) **गच्छंति** ( जातात ) **अनामयं** ( निर्बाधित ).

बुद्धियुक्ताः मनीषिणः कर्मजं फलं हि त्यक्त्वा जन्मबंधविनिर्मुक्ताः ( सन्तः ) अनामयं पदं गच्छंति.

बुद्धियोगी ऋषि कर्मांपासून उत्पन्न झालेल्या फळाचा खरोखर त्याग करून ( आणि त्यामुळें ) जन्मबंधनापासून मुक्त होत्साते निर्बाधित परमपदाला जातात ॥ ५१ ॥

यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।

तदा गंतासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥ ५२ ॥

**यदा** ( जेव्हां ) **ते** ( तुझा ) **मोहकलिलं** = मोहस्य कलिलं ( मोहाचा गोंधळ, भ्रम ) **बुद्धिः** ( बुद्धि ) **व्यतितरिष्यति** ( बाहेर येईल, पलीकडे जाईल ) **तदा** ( तेव्हां ) **गंतासि** ( जाशील ) **निर्वेदं** ( वैराग्याला ) **श्रोतव्यस्य** ( ऐकावयाचें आहे त्याच्या ) **श्रुतस्य** ( जें ऐकलें आहे त्याच्या ) **च** ( आणि ).

यदा ते बुद्धिः मोहकलिलं व्यतितरिष्यति तदा श्रोतव्यस्य च श्रुतस्य निर्वेदं गंतासि.

जेव्हां तुझी बुद्धि मोहाच्या घोंटाळ्यांतून बाहेर पडेल तेव्हां जें कांहीं ऐकावयाचें आहे व जें कांहीं ऐकलेलें आहे त्या दोहोंविषयीं तुला कंटाळा येईल ॥ ५२ ॥

**श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।**
**समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥ ५३ ॥**

**श्रुतिविप्रतिपन्ना** = श्रुतिभिः विप्रतिपन्ना ( अनेक श्रुति ऐकून गोंधळून गेलेली ) **ते** ( तुझी ) **यदा** ( जेव्हां ) **स्थास्यति** ( राहील ) **निश्चला** ( अढळ ) **समाधौ** ( समाधीमध्यें ) **अचला** (स्थिर) **बुद्धिः** ( बुद्धि, अंतःकरण ) **तदा** ( तेव्हां ) **योगं** ( साम्य योगाला ) **अवाप्स्यसि** ( मिळविशील ).

श्रुतिविप्रतिपन्ना ते बुद्धिः यदा निश्चला स्थास्यति ( च ) समाधौ अचला भविष्यति तदा योगं अवाप्स्यसि.

अनेक श्रुतिवचनें ऐकून तुझी घोंटाळलेली बुद्धि जेव्हां स्थिर होईल आणि समाधिवृत्तीमध्यें अढळ राहील तेव्हां तुला ( समत्व ) योगाची प्राप्ति होईल. ॥ ५३ ॥

**अर्जुन उवाच-स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।**
**स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥ ५४ ॥**

**स्थितप्रज्ञस्य** = स्थिता प्रज्ञा यस्य तस्य (ज्याची बुद्धि स्थिर झाली आहे त्याची ) **का** ( कोणती ) **भाषा** ( व्याख्या ) **समाधिस्थस्य** ( समाधीमध्यें लय लागलेल्याची ) **केशव** ( केशवा ) **स्थितधीः** = स्थिता

धीः यस्य सः ( ज्याची बुद्धि स्थिर झालेली आहे तो ) **किं** ( काय ) **प्रभाषेत** ( बोलावें ) **किं** ( कसें ) **आसीत** ( वसावें, असावें ) **व्रजेत** ( चालवें ) **किं** ( कसें ).

केशव ! समाधिस्थस्य स्थितप्रज्ञस्य का भाषा, स्थितधीः किं प्रभाषेत, किं आसीत, किं व्रजेत.

अर्जुन म्हणलाः—हे केशवा ! समाधिमध्यें लय लागलेला 'स्थितप्रज्ञ' याची व्याख्या काय ? 'स्थितधीः' म्हणजे स्थिर बुद्धीचा पुरुष काय बोलतो, कसा रहातो व कसा चालतो ( वागतो ) ? ॥ ५४ ॥

श्रीभगवानुवाच—**प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ।**
**आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥५५॥**

**प्रजहाति** ( टाकून देतो ) **यदा** ( जेव्हां ) **कामान्** ( वासना ) **सर्वान्** ( सर्व ) **पार्थ** ( पार्था ) **मनोगतान्** = मनसि गतान् ( मनांत शिरलेल्या ) **आत्मनि** ( आत्मस्वरूपामध्यें ) **एव** ( केवळ ) **आत्मना** ( आत्मस्वरूपानें ) **तुष्टः** ( संतुष्ट ) **स्थितप्रज्ञः** ( स्थितप्रज्ञ ) **तदा** ( तेव्हां ) **उच्यते** ( म्हणतात ).

पार्थ, यदा मनोगतान् सर्वान् कामा न् ( पुरुषः ) प्रजहाति (च) आत्मनि एव आत्मना तुष्टः तदा ( सः ) स्थितप्रज्ञः उच्यते.

श्रीभगवान् म्हणालेः—पार्था ! जेव्हां मनुष्य आपल्या मनांतील सर्व वासनांचा पूर्णपणें त्याग करतो आणि आपल्या ठिकाणीं आपण होऊनच संतुष्ट असतो तेव्हां त्याला 'स्थित-प्रज्ञ' असें म्हणतात ॥ ५५ ॥

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।**
**वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥**

**दुःखेषु** ( दुःखांमध्यें ) **अनुद्विग्नमनाः** = न उद्विग्नं मनः यस्य सः ( ज्याचे मनाला खेद होत नाहीं तो ) **सुखेषु** ( सुखें प्राप्त झालीं असतां ) **विगतस्पृहः** = विगता स्पृहा यस्य सः ( ज्याची वासना नष्ट झाली आहे तो ) **वीतरागभयक्रोधः** = वीतः रागः च भयं च क्रोधः च यस्य सः ( ज्याचे

लोभ, भय व संताप नष्ट झाले आहेत तो ) **स्थितधीः** ( स्थिर बुद्धीचा ) **मुनिः** ( तपस्वी ) **उच्यते** ( म्हटलें आहे ).

दुःखेषु अनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः वीतरागभयक्रोधः मुनिः स्थितधीः उच्यते.

संकटें ओढवलीं असतां ज्याच्या मनांत खेद उत्पन्न होत नाहीं आणि सुखें प्राप्त झालीं असतां त्यांविषयींची आसक्तिहि ज्याला नसते; लोभ, भय व संताप हीं ज्याचीं नष्ट झालीं आहेत त्या तपस्वी पुरुषाला ' स्थितधीः ' म्हणजे स्थिरबुद्धीचा असें म्हणतात ॥ ५६ ॥

**यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।**
**नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥**

**यः** ( जो ) **सर्वत्र** ( सर्व ठिकाणीं) **अनभिस्नेहः** (आसक्तिविरहित) **तत्** ( तें ) **तत्** ( तें ) **प्राप्य** ( मिळवून ) **शुभाशुभं** = शुभं च अशुभं च ( बरेंवाईट ) **न** ( नाहीं ) **अभिनंदति** ( आनंद मानतो ) **न** ( नाहीं ) **द्वेष्टि** ( द्वेष करतो ) **तस्य** ( त्याची ) **प्रज्ञा** ( बुद्धि ) **प्रतिष्ठिता** ( स्थिर झाली ).

यः सर्वत्र अनभिस्नेहः तत् तत् शुभाशुभं प्राप्य न अभिनंदति ( च ) न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता.

जो सर्व ठिकाणीं आसक्तिरहित असतो व जें जें शुभाशुभ यदृच्छेनें प्राप्त होईल त्याविषयीं जो हर्षविषाद मानीत नाहीं, त्याची बुद्धि स्थिर झाली ( असें समज ) ॥ ५७ ॥

**यदा संहरते चायं कूर्मोऽगानीव सर्वशः।**
**इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥**

**यदा** ( जेव्हां ) **संहरते** ( आंत ओढून घेतो ) **च** ( आणि ) **अयं** ( हा ) **कूर्मः** ( कांसव ) **अंगानि** ( अवयव ) **इव** ( जसें ) **सर्वशः** (सर्व बाजूंनीं) **इंद्रियाणि** (इंद्रियें) **इंद्रियार्थेभ्यः** = इंद्रियाणां अर्थेभ्यः ( इंद्रियांच्या विषयांपासून ) **तस्य** ( त्याची ) **प्रज्ञा** ( बुद्धि ) **प्रतिष्ठिता** ( स्थिर झालेली ).

यदा च अयं ( पुरुषः ) सर्वशः इंद्रियाणि इंद्रियार्थेभ्यः, कूर्मः अंगानि इव, संहरते ( तदा ) तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता.

ज्याप्रमाणें कांसव आपले अवयव ( हस्तपादादि ) सर्व बाजूंनीं आंखडून घेतो त्याप्रमाणें साधक पुरुष आपलीं इंद्रियें, त्याच्या त्या त्या बाह्य विषयां ( शब्दस्पर्शादि ) पासून जेव्हां आंवरून धरतो तेव्हां त्याची बुद्धि स्थिर झाली असें समजावें ॥ ५८ ॥

**विषया विनिवर्तंते निराहारस्य देहिनः ।**
**रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥**

**विषयाः** ( रूप, रस, गंधादि विषय ) **विनिवर्तंते** (परावृत्त होतात) **निराहारस्य** ( उपोषण करणाऱ्या, ज्याच्या इंद्रियांनीं विषयोपभोग सोडून दिले आहेत अशा ) **देहिनः** (देह धारण करणाऱ्या पुरुषाचे) **रसवर्जं**= रसं वर्जयित्वा ( विषयांची गोडी शिवाय करून )**रसः** (अभिरुची, गोडी) **अपि** ( सुद्धां ) **अस्य** ( याची ) **परं** (परमात्म्याला) **दृष्ट्वा** ( पाहून ) **निवर्तते** ( परत फिरते ).

निराहारस्य देहिनः विषयाः रसवर्जं विनिवर्तंते ( परंतु ) अस्य ( स्थितप्रज्ञस्य ) रसः अपि परं दृष्ट्वा निवर्तते.

निराहारी पुरुषाचे इंद्रियांनीं ग्रहण होणारे विषय सुटतात, तथापि विषयवासना शिल्लक राहते, परंतु ज्याला ( ज्या स्थितप्रज्ञाला ) परब्रह्माचा अनुभव येतो त्याचे विषय आणि विषयवासना हीं दोन्हीं सुटतात ॥ ५९ ॥

**यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः ।**
**इंद्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः ॥ ६० ॥**

**यततः** ( प्रयत्न करणाराचें ) **हि** ( कारण ) **अपि** ( सुद्धां ) **कौंतेय** ( कुंतिपुत्रा अर्जुना ) **पुरुषस्य** ( पुरुषाची ) **विपश्चितः** ( शहाण्याची ) **इंद्रियाणि** ( इंद्रियें ) **प्रमाथीनि** ( प्रबल झालेलीं ) **हरंति** ( खेंचून नेतात ) **प्रसभं** ( बलात्कारानें ) **मनः** ( मन ).

कौंतेय, हि यततः अपि विपश्चितः पुरुषस्य मनः प्रमाथीनि इंद्रियाणि प्रसभं हरन्ति.

अर्जुना ! कारण शहाण्या पुरुषाचें मन ( तें निश्चल ठेवण्याविषयीं ) तो प्रयत्न करीत असतांहि, इंद्रियें बलात्कारानें (विषयांकडे) ओढून नेतात!६०।

**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।**
**वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥**

**तानि** ( त्या इंद्रियांना ) **सर्वाणि** ( सर्वांना ) **संयम्य** (आवरून) **युक्तः** ( योगनिष्ठ ) **आसीत** ( वसावें ) **मत्परः** = अहं परः यस्य सः ( मजविषयीं अनन्यभाव धारण करून ) **वशे** ( स्वाधीन ) **हि** (कारण) **यस्य** ( ज्याचीं ) **इंद्रियाणि** ( इंद्रियें ) **तस्य** ( त्याची ) **प्रज्ञा** (बुद्धि) **प्रतिष्ठिता** ( स्थिर झालेली असते ).

तानि सर्वाणि संयम्य युक्तः मत्परः आसीत, हि यस्य वशे इंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता.

त्या सर्व इंद्रियांना ताब्यांत ठेवून योगनिष्ठ पुरुषानें माझ्या ठिकाणीं अनन्यभाव धारण करून वसावें; कारण ज्याच्या स्वाधीन इंद्रियें आहेत त्याची बुद्धि सुस्थिर होते ॥ ६१ ॥

**ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषुपजायते ।**
**संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥**

**ध्यायतः** ( चिंतन करीत राहणाऱ्या ) **विषयान्** (विषयांला) **पुंसः** ( पुरुषाची ) **संगः** ( आसक्ति ) **तेषु** ( त्या विषयामध्यें ) **उपजायते** ( उत्पन्न होते ) **संगात्** ( आसक्तीपासून ) **संजायते** ( उत्पन्न होते ) **कामः** ( विषयेच्छा ) **कामात्** ( कामवासनेपासून ) **क्रोधः** ( संताप ) **अभिजायते** ( उत्पन्न होतो ).

विषयान् ध्यायतः पुंसः तेषु संगः उपजायते, संगात् कामः संजायते, कामात् क्रोधः अभिजायते.

( रूप, रस, गंधादि ) विषयांचें चिंतन करीत राहणाऱ्या पुरुषाला त्या विषयांच्या ठिकाणीं आसक्ति उत्पन्न होते. आसक्तीपासून कामवासना उत्पन्न होते, आणि कामापासून संताप उत्पन्न होतो ॥ ६२ ॥

क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।
स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ ६३ ॥

क्रोधात् ( संतापापासून ) भवति (उत्पन्न होतो) संमोहः (अविवेक ) संमोहात् ( अविवेकापासून ) स्मृतिविभ्रमः = स्मृतेः विभ्रमः ( स्मरणशक्तीचा घोंटाळा ) स्मृतिभ्रंशात् = स्मृतेः भ्रंशात् ( आठवणीच्या घोंटाळ्यापासून ) बुद्धिनाशः ( बुद्धीचा नाश ) बुद्धिनाशात् = बुद्धेः नाशात् ( बुद्धीच्या नाशापासून ) प्रणश्यति ( जिवाचा सर्वथैव नाश होतो ) ॥ ६३ ॥

क्रोधात् संमोहः भवति, संमोहात् स्मृतिविभ्रमः, स्मृतिभ्रंशात् बुद्धिनाशः, बुद्धिनाशात् प्रणश्यति.

क्रोधापासून ' संमोह ' म्हणजे अविवेक ( बऱ्यावाईटाची निवड करणाऱ्या बुद्धीची मूढता ) उत्पन्न होतो, संमोहापासून स्मृतिभ्रम उत्पन्न होतो ( विसर पडतो ), स्मृतिभ्रमापासून बुद्धीचा नाश होतो आणि बुद्धिहीन झाला म्हणजे सर्वथैव नाश होतो ॥ ६३ ॥

रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिंद्रियैश्चरन् ।
आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥

रागद्वेषवियुक्तैः = रागेण च द्वेषेण च वियुक्तैः ( लोभ व द्वेष यांनीं विवर्जित ) तु ( परंतु ) विषयान् ( रूपरसादि पंच विषयांत ) इंद्रियैः ( इंद्रियांनीं ) चरन् ( उपभोग घेणारा ) आत्मवश्यैः= आत्मनः वश्यैः ( आत्म्याच्या ताब्यांत असलेलीं, स्वाधीन असणारीं ) विधेयात्मा = विधेयः आत्मा यस्य सः ( वश करून घेतलें आहे अंतःकरण ज्यानें तो, आत्मसंयमी ) प्रसादं ( शांति ) अधिगच्छति ( मिळवितो ).

तु रागद्वेषवियुक्तैः आत्मवश्यैः इंद्रियैः विषयान् चरन् विधेयात्मा प्रसादं अधिगच्छति.

परंतु लोभ व द्वेष यांचा त्याग करून स्वाधीन असलेल्या इंद्रियांच्या सहाय्यानें विषयांचा उपभोग घेणाऱ्या आत्मसंयमी पुरुषाला शांतता प्राप्त होते ॥ ६४ ॥

**प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।**
**प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥**

**प्रसादे** ( शांतिलाभ झाला असतां ) **सर्वदुःखानां** = सर्वेषां दुःखानां ( सर्व दुःखांचा ) **हानिः** ( नाश ) **अस्य** ( याच्या ) **उपजायते** ( उत्पन्न होतो ) **प्रसन्नचेतसः** = प्रसन्नं चेतः यस्य तस्य ( प्रसन्न अंतःकरण असणाराची ) **हि** ( कारण ) **आशु** ( लवकर ) **बुद्धिः** ( विचारशक्ति ) **पर्यवतिष्ठते** ( स्थिरता पावते ).

प्रसादे अस्य सर्वदुःखानां हानिः उपजायते, हि प्रसन्नचेतसः बुद्धिः आशु पर्यवतिष्ठते.

शांति प्राप्त झाली म्हणजे या संयमी पुरुषाच्या सर्व दुःखांचा परिहार ( नाश ) होतो; कारण प्रसन्न अंतःकरणाच्या पुरुषाची बुद्धि लवकर स्थिर होते ॥ ६५ ॥

**नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ।**
**न चाभावयतः शांतिरशांतस्य कुतः सुखम् ॥ ६६ ॥**

**न** ( नाहीं ) **अस्ति** ( आहे ) **बुद्धिः** ( स्थिर बुद्धि ) **अयुक्तस्य** ( योगयुक्त नसणाराला ) **न** ( नाहीं ) **च** ( आणि ) **अयुक्तस्य** ( योगयुक्त नसणाराला ) **भावना** ( एकनिष्ठा ) **न** ( नाहीं ) **च** ( आणि ) **अभावयतः** ( एकनिष्ठा नसणाराला ) **शांतिः** ( शांतता ) **अशांतस्य** ( शांतता नसणाराला ) **कुतः** ( कुठलें ) **सुखं** ( सुख ).

अयुक्तस्य बुद्धिः न अस्ति च अयुक्तस्य भावना न, च अभावयतः शांतिः न, अशांतस्य कुतः सुखम् ?

योगयुक्त नसणाराला स्थिर बुद्धि नसते व एकनिष्ठाहि करतां येत नाहीं; ज्याला एकनिष्ठ होतां येत नाहीं, त्याच्या अंतःकरणाला शांतता ( समाधान ) नसते, आणि असमाधानी मनुष्याला सुख कोठून मिळणार ? ॥६६॥

**इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।**
**तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥ ६७ ॥**

इंद्रियाणां ( इंद्रियांच्या ) हि ( कारण ) चरतां ( विषयानुभव घेणाऱ्या ) यत् ( जें ) मनः ( मन ) अनुविधीयते ( अनुसरतें ) तत् ( तें ) अस्य ( याची ) हरति ( हरण करतें ) प्रज्ञां ( बुद्धि ) वायुः ( वारा ) नावं ( नावेला ) इव ( प्रमाणें ) अंभसि (पाण्यांत !

हि चरतां इंद्रियाणां यत् मनः अनुविधीयते, तत् अस्य प्रज्ञां हरति, अंभसि नावं वायुः इव.

विषयानुभव घेणाऱ्या इंद्रियांच्या मागें जें मन धांवतें तें, पाण्यावर तरंगत असलेल्या नावेला ज्याप्रमाणें वारा भलतीकडेच नेतो त्याप्रमाणें, या अनिश्चित् मनुष्याच्या बुद्धीला भलतीकडे नेतें ( आत्मस्वरूपाचें चिंतन करूं देत नाहीं ) ॥ ६७ ॥

तस्माद्यस्य महाबाहो निग्रहीतानि सर्वशः ।
इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥

तस्मात् ( म्हणून ) यस्य ( ज्याचीं ) महाबाहो ( आजानुबाहो, अर्जुना ) निग्रहीतानि ( आंवरून धरलेलीं ) सर्वशः ( सर्व बाजूंनीं ) इंद्रियाणि ( इंद्रियें ) इंद्रियार्थेभ्यः ( इंद्रियांच्या विषयांपासून ) तस्य ( त्याची ) प्रज्ञा ( बुद्धि ) प्रतिष्ठिता ( स्थिर झाली ).

तस्मात् महाबाहो, यस्य इंद्रियाणि सर्वशः इंद्रियार्थेभ्यः निग्रहीतानि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता.

म्हणून हे महाबाहो अर्जुना ! ज्याचीं इंद्रियें त्यांच्या रूपरसादि विषयांपासून सर्व बाजूंनीं आंवरून धरलेलीं असतात त्याची बुद्धि स्थिर झाली असें म्हणावयाचें ॥ ६८ ॥

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।
यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ ६९ ॥

या ( जी ) निशा ( रात्र ) सर्वभूतानां = सर्वेषां भूतानां ( सर्व प्राणिमात्रांची ) तस्यां ( त्यामध्यें ) जागर्ति ( जागा असतो ) संयमी ( निग्रही पुरुष ) यस्यां ( ज्यावेळीं ) जाग्रति ( जागतात ) भूतानि

( प्राणीमात्र ) **सा** ( ती ) **निशा** ( रात्र ) **पश्यतः** ( पहाणाऱ्या ) **मुनेः** ( मुनीची ).

या सर्वभूतानां निशा तस्यां संयमी जागर्ति, यस्यां भूतानि जाग्रति सा पश्यतः मुनेः निशा ( अस्ति ).

जी सर्व प्राणीमात्रांची रात्र[1] असते, तीमध्यें निग्रही पुरुष जागा असतो, आणि ज्यावेळीं प्राणीमात्र जागे असतात ती ( विवेकदृष्टीनें ) पाहणाऱ्या मुनीची रात्र[1] असते ॥ ६९ ॥

**आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं, समुद्रमापः प्रविशंति यद्वत् ।**
**तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे स शांतिमाप्नोति न कामकामी ७०**

**आपूर्यमाणं** ( चोहोंकडून भरत राहणाराला ) **अचलप्रतिष्ठं** = अचला प्रतिष्ठा यस्य तं (ज्याची अढळ स्थिति म्ह० मर्यादा असते त्याला) **समुद्रं** ( समुद्राला ) **आपः** ( पाणी ) **प्रविशंति** ( आंत शिरतात ) **यद्वत्** ( ज्याप्रमाणें ) **तद्वत्** ( त्याप्रमाणें ) **कामाः** ( इच्छा, विषय-वासना ) **यं** ( ज्याला ) **प्रविशंति** ( अंतःकरणांत शिरतात ) **सर्वे** ( सर्व ) **सः** ( तो ) **शांतिं** ( शांतता ) **आप्नोति** ( मिळवितो ) **न** ( नाहीं ) **कामकामी** = कामानां कामी ( विषयांचें चिंतन करणारा ).

आपूर्यमाणं अचलप्रतिष्ठं समुद्रं यद्वत् आपः प्रविशंति तद्वत् यं सर्वे कामाः प्रविशंति सः शांतिं आप्नोति कामकामी न.

चोहोंकडून भरत राहणाऱ्या, परंतु आपल्या स्थितींत बदल न होऊं देणाऱ्या–मोठेपणा अथवा मर्यादा कायम राखणाऱ्या–समुद्राला ज्याप्रमाणें नद्यां जाऊन मिळतात ( नद्या मिळाल्या न मिळाल्या तरी त्याच्या स्थितींत बदल होत नाहीं ) त्याप्रमाणें निग्रही पुरुषाच्या मनांत सर्व प्रकारच्या वास-

---

**टीप १.** हा विरोधात्मक अलंकार आहे. रात्र म्हणजे अज्ञान आणि प्रकाश म्हणजे ज्ञान होय. इतर मनुष्याला ज्या गोष्टींचें अज्ञान ( रात्र ) असतें त्या गोष्टीविषयीं योगनिष्ठाला ज्ञान ( दिवस ) असतें, आणि जेथें इतरांना सर्व ( जगत् ) सत्य वाटतें म्हणजे त्यांना प्रकाश वाटतो, विवेकी पुरुषाला तेथें रात्र म्हणजे सर्व मिथ्या आहे असें वाटतें.

नांचा प्रवेश झाला तरी तो शांत अविकृत असतो. विषयवासनाधीन पुरुषाला ती शांतता ( निर्विकारता ) प्राप्त होत नाहीं ॥ ७० ॥

विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निःस्पृहः ।
निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति ॥ ७१ ॥

**विहाय** ( टाकून देऊन ) **कामान्** ( इच्छा ) **यः** ( जो ) **सर्वान्** ( सर्व ) **पुमान्** ( पुरुष ) **चरति** ( वागतो ) **निस्पृहः** (निरिच्छपणें) **निर्ममः** ( ममत्वरहित ) **निरहंकारः** ( मीपणा टाकून देणारा ) **सः** ( तो ) **शांतिं** ( शांततेला ) **अधिगच्छति** ( मिळवितो. )

सर्वान् कामान् विहाय यः पुमान् निस्पृहः निर्ममः निरहंकारः चरति सः शांतिं अधिगच्छति.

सर्व वासनांचा त्याग करून जो पुरुष, निर्लोभ होऊन, मीपणा व माझेपणा या दोहोंचा त्याग करून वागतो, त्याला शांततेची प्राप्ति होते ॥ ७१ ॥

एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।
स्थित्वाऽस्यामंतकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥ ७२ ॥

**एषा** ( ही ) **ब्राह्मी** ( ब्रह्माला पोंचविणारी ) **स्थितिः** ( स्थिति ) **पार्थ** ( अर्जुना ) **न** ( नाहीं ) **एनां** ( हिला ) **प्राप्य** ( प्राप्त करून घेऊन ) **विमुह्यति** ( मोह पावतो ) **स्थित्वा** ( स्थिर होऊन ) **अस्यां** ( याम‍ध्यें ) **अंतकाले** = अंतस्य काले ( मरणकाळीं ) **अपि** ( सुद्धां ) **ब्रह्मनिर्वाणं** = ब्रह्मणः निर्वाणं ( ब्रह्मपदाला ) **ऋच्छति** ( जातो ).

पार्थ, एषा ब्राह्मी स्थितिः एनां प्राप्य न विमुह्यति, अस्यां स्थित्वा अंतकाले अपि ब्रह्मनिर्वाणं ऋच्छति.

अर्जुना ! ब्राह्मी ( ब्रह्ममय झालेल्याची ) स्थिति अशी ( आतांपर्यंत सांगितल्याप्रमाणें ) असते. ही स्थिति प्राप्त झाल्यावर साधकाला मोह उत्पन्न होत नाहीं व तो अशा स्थितींत मरणकाळाचे वेळींही राहून ब्रह्मरूपाला जाऊन पोंचतो. ( तो ब्रह्मच होतो ) ॥ ७२ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु० सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः

# अध्याय तिसरा.



अर्जुन उवाच—ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ।
तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥ १ ॥

**ज्यायसी** ( श्रेष्ठ ) **चेत्** ( जर ) **कर्मणः** ( कर्मापेक्षां ) **ते** (तुला) **मता** ( वाटत असली ) **बुद्धिः** ( ज्ञान ) **जनार्दन** ( हे कृष्णा ) **तत्** ( तर ) **किं** ( कां ) **कर्माणि** ( कर्मांत ) **घोरे** ( क्रूर ) **मां** ( मला ) **नियोजयसि** ( घालतोस ) **केशव** ( हे केशव ).

जनार्दन, ते कर्मणः बुद्धिः ज्यायसी मता चेत्, तत् केशव मां घोरे कर्मणि किं नियोजयसि ?

अर्जुन म्हणालाः—हे जनार्दना, कर्मापेक्षां ज्ञान श्रेष्ठ असें जर तुम्हाला वाटत असल ( कबूल असेल ) तर, हे केशवा ! आपण मला घोर कर्म करावयाला कां लावतां ? ॥ १ ॥

व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।
तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ २ ॥

**व्यामिश्रेण** ( धरसोडीच्या ) **इव** ( जसें कांहीं ) **वाक्येन** ( बोलण्यानें ) **बुद्धिं** ( बुद्धि ) **मोहयसि** ( घोंटाळ्यांत घालतोस ) **इव** ( जसें कांहीं ) **मे** ( माझी ) **तत्** ( तरी ) **एकं** ( एक ) **वद** ( सांग ) **निश्चित्य** ( ठरवून ) **येन** ( ज्यानें ) **श्रेयः** ( कल्याण ) **अहं** ( मी ) **आप्नुयाम्** ( मिळवावें. )

व्यामिश्रेण इव वाक्येन मे बुद्धिं मोहयसि इव, तत् निश्चित्य एकं वद, येन अहं श्रेयः आप्नुयाम्.

घोंटाळ्याचें अर्थ वाटणाऱ्या आपल्या भाषणानें माझ्या बुद्धीला भ्रम पाडल्यासारखें करीत आहां; तर निश्चयात्मक] असा एक मार्ग सांगा, कीं ज्यानें माझें बरें ( कल्याण ) होईल ॥ २ ॥

श्रीभगवानुवाच—

**लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयाऽनघ ।**
**ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥ ३ ॥**

**लोके** ( या लोकीं ) **अस्मिन्** ( ह्यांत ) **द्विविधा** ( दोन प्रकारची ) **निष्ठा** ( भक्ति ) **पुरा** ( पूर्वी ) **प्रोक्ता** ( सांगितली आहे ) **मया** ( म्यां ) **अनघ** ( हे निष्पापा अर्जुना ) **ज्ञानयोगेन** = ज्ञानस्य योगेन ( ज्ञानाच्या योगानें ) **सांख्यानां** ( सांख्यांची ) **कर्मयोगेन** = कर्मस्य योगेन ( कर्मयोगानें ) **योगिनां** ( योग्यांची ).

अनघ, अस्मिन् लोके मया द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता; सांख्यानां ज्ञानयोगेन, योगिनां कर्मयोगेन.

श्रीभगवान् म्हणाले:—हे निष्पापा अर्जुना, मीं पूर्वीच सांगितलें आहे कीं, या लोकीं दोन प्रकारची निष्ठा आहे; एक सांख्यांची ज्ञानयोगाचें आचरण करण्याची आणि दुसरी योग्यांचीं कर्मयोगाचें आचरण करण्याची ॥ ३ ॥

**न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।**
**न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥**

**न** ( नाहीं ) **कर्मणां** ( कर्मांचा ) **अनारंभात्** ( आरंभ न केल्यापासून ) **नैष्कर्म्यं** ( कर्मशून्यता ) **पुरुषः** (पुरुष) **अश्नुते** ( मिळवितो ) **न** ( नाहीं ) **च** ( आणि ) **सन्यसनात्** ( सोडल्यापासून ) **एव** ( केवळ ) **सिद्धिं** ( पूर्णता ) **समधिगच्छति** ( मिळवितो. )

कर्मणां अनारंभात् पुरुषः नैष्कर्म्यं न अश्नुते, च सन्यसनात् एव सिद्धिं न समधिगच्छति.

कर्में करण्याला मुळीं आरंभच केला नाहीं, म्हणजे पुरुषाला नैष्कर्म्यस्थिति प्राप्त होते असें नाहीं; आणि कर्मांचा त्याग केला ( कर्में करणें सोडून दिलें ) म्हणजे तेवढयानेंच सिद्धि मिळते असेंहि नाहीं ॥ ४ ॥

**न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥**

न ( नाहीं ) हि ( कारण ) कश्चित् ( कोणीहि ) क्षणं ( एक क्षण ) अपि ( देखील ) जातु ( खरोखरीं ) तिष्ठति ( राहतो ) अकर्मकृत् ( कर्म न करितां ) कार्यते ( करविलें जातें ) हि ( कारण ) अवशः ( परतंत्र होऊन ) कर्म ( कर्म ) सर्वः ( सर्वांकडून ) प्रकृतिजैः ( प्रकृतिजन्य ) गुणैः ( गुणांनीं ).

हि कश्चित् क्षणम् अपि जातु अकर्मकृत् न तिष्ठति; सर्वः हि अवशः ( सन् ) प्रकृतिजैः गुणैः कर्म कार्यते.

कारण कोणीहि एक क्षणभर सुद्धां कर्म केल्यावांचून राहूं शकत नाहीं ( मनुष्य ) प्रकृतीच्या गुणांच्या अंकित असल्यामुळें ते गुण सर्वांना कर्म करावयाला भाग पाडतात ॥ ५ ॥

कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।
इंद्रियार्थान् विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ ६ ॥

कर्मेंद्रियाणि = कर्माणां इंद्रियाणि ( कर्म करण्याचीं इंद्रियें ) संयम्य ( आवरून धरून ) यः ( जो ) आस्ते ( बसतो ) मनसा ( मनानें ) स्मरन् ( चिंतन करीत ) इंद्रियार्थान् ( इंद्रियांचे विषय ) विमूढात्मा = विमूढः आत्मा यस्य सः ( ज्याचें मन बावरलें आहे तो, मूढबुद्धीचा ) मिथ्याचारः = मिथ्यः आचारः यस्य सः ( ज्याचें आचरण खोटें तो; दांभिक ) सः ( तो ) उच्यते ( म्हणतात. )

यः विमूढात्मा कर्मेंद्रियाणि संयम्य मनसा इंद्रियार्थान् स्मरन् आस्ते सः मिथ्याचारः उच्यते.

जो मूढबुद्धि कर्मेंद्रियें ( हातपाय इत्यादि ) आवरून धरून मनानें इंद्रियांच्या विषयांचें चिंतन करीत बसतो, त्याला ढोंगी म्हणतात ॥ ६ ॥

यस्त्विंद्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।
कर्मेंद्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ७ ॥

यः ( जो ) तु ( परंतु ) इंद्रियाणि ( इंद्रियें ) मनसा ( मनानें ) नियम्य ( आवरून धरून ) आरभते ( प्रारंभ करतो ) अर्जुन

( अर्जुना ) कर्मेंद्रियैः ( कर्मेंद्रियांनीं ) कर्मयोगं ( कर्ममार्ग ) असक्तः ( आसक्ति न ठेवणारा ) सः ( तो ) विशिष्यते ( श्रेष्ठत्व मिळवितो. )

अर्जुन, यः तु इंद्रियाणि मनसा नियम्य असक्तः कर्मेंद्रियैः कर्मयोगं आरभते, सः विशिष्यते.

परंतु अर्जुना, जो मनानें इंद्रियें स्वाधीन ठेवून आसक्त न होतां ( कर्मफलावर आसक्ति न ठेवतां ) केवळ कर्मेंद्रियांनीं कर्म करावयास लागतो त्याची योग्यता विशेष आहे ॥ ७ ॥

नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ।
शरीरयात्राऽपि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥ ८ ॥

नियतं ( नेमलेलें ) कुरु ( कर ) कर्म ( कर्म ) त्वं ( तूं ) कर्म ( कर्म ) ज्यायः ( अधिक चांगलें ) हि ( कारण ) अकर्मणः ( कर्म न करण्यापेक्षां ) शरीरयात्रा = शरीरस्य यात्रा ( शरीराचा जीवनक्रम ) अपि ( सुद्धां ) च ( आणि ) ते ( तुझा ) न प्रसिद्ध्येत् ( सिद्धीला जाणार नाहीं ) अकर्मणः ( कर्म न करणाऱ्याची. )

त्वं नियतं कर्म कुरु, हि अकर्मणः कर्म ज्यायः ( अस्ति ) अकर्मणः ते शरीरयात्रा अपि च न प्रसिद्ध्येत्.

तूं ( धर्माप्रमाणें ) नेमलेलें कर्म कर; कारण कर्म न करण्यापेक्षां कर्म करणें अधिक चांगलें आहे; कर्म न करतां तुझ्या शरीराचा जीवनक्रम चालणें सुद्धां शक्य नाहीं ॥ ८ ॥

यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः ।
तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसंगः समाचर ॥ ९ ॥

यज्ञार्थात् = यज्ञस्य अर्थात् ( यज्ञासाठीं ) कर्मणः ( कर्मापेक्षां ) अन्यत्र ( खेरीज ) लोकः ( मृत्युलोक ) अयं ( हा ) कर्मबंधनः = कर्म बंधनं यस्य सः ( ज्याचें बंधन कर्म तो ) तदर्थं = तस्य ( यज्ञस्य ) अर्थं ( त्याच्या ह्मणजे यज्ञाच्या करितां ) कर्म ( कर्म ) कौन्तेय (अर्जुना( मुक्तसंगः = मुक्तः संगो येन सः ( ज्यानें आसक्ति सोडली तो ) समाचर ( कर. )

यज्ञार्थात् अन्यत्र कर्मणः अयं लोकः कर्मबंधनः ( अस्ति ) कौंतेय, तदर्थं मुक्तसंगः ( सन् ) कर्म समाचर.

यज्ञासाठीं केले जाणाऱ्या कर्माशिवाय इतर जें कर्म त्यानें हा लोक बद्ध होतो. अर्जुना ! त्या ( यज्ञा ) साठीं करावयाचें कर्म सुद्धां फलाशा न ठेवतां कर ॥ ९ ॥

**सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।**
**अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥ १० ॥**

**सहयज्ञाः** =यज्ञेन सह ( यज्ञासह, यज्ञाबरोबर ) **प्रजाः** ( लोक ) **सृष्ट्वा** ( उत्पन्न करून ) **पुरा** ( पूर्वीं ) **उवाच** (म्हणाला) **प्रजापतिः** ( ब्रह्मदेव ) **अनेन** ( ह्यानें ) **प्रसविष्यध्वं** (प्रजावृद्धि करा) **एष** (हा) **वः** ( तुमचा ) **अस्तु** ( होवो ) **इष्टकामधुक्** = इष्टान् कामान् दोग्धि ( इच्छित मनोरथ पूर्ण करणारा ).

पुरा सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा प्रजापतिः उवाच अनेन ( यूयं ) प्रसविष्यध्वं एषः वः इष्टकामधुक् अस्तु.

पूर्वीं ( पुरातन काळीं ) ब्रह्मदेवानें यज्ञासह प्रजा उत्पन्न करून त्यांना म्हणाला कीं, " यानें ( यज्ञाच्या योगानें ) तुम्ही वृद्धि पावा; हा तुमचे इच्छित मनोरथ पूर्ण करो " ( इच्छित मनोरथ पूर्ण करणारी कामधेनु होवो ) ॥ १० ॥

**देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु वः ।**
**परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥**

**देवान्** ( देवांना ) **भावयत** ( पोषण करा ) **अनेन** ( ह्यानें ) ( **ते** ) **देवाः** ( देव ) **भावयंतु** (पोषण करोत) **वः** (तुमचें) **परस्परं** ( एकमेकांस ) **भावयंतः** (पोषण करून) **श्रेयः** (कल्याण) **परं** (उत्तम) **अवाप्स्यथ** ( मिळवाल )

अनेन ( यज्ञेन यूयं ) देवान् भावयत, ते देवाः वः भावयन्तु; ( एवं ) परस्परं भावयंतः परम् श्रेयः अवाप्स्यथ.

ह्या यज्ञानें तुम्ही देवांना संतुष्ट करा आणि ते देव तुमचें पोषण करोत; तुम्ही परस्परांना संतुष्ट केल्यानें तुमचें चांगलें कल्याण होईल ॥ ११ ॥

इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यंते यज्ञभाविताः।
तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः ॥ १२ ॥

**इष्टान्** ( आवडतीं ) **भोगान्** ( विषयसुखें ) **हि** ( कारण ) **वः** ( तुम्हास ) **देवाः** ( देव ) **दास्यंते** ( देतील ) **यज्ञभाविताः** ( यज्ञानें संतुष्ट झालेले ) **तैः** ( त्यांनीं ) **दत्तान्** (दिलेले) **अप्रदाय** (परत न देतां) **एभ्यः** ( त्यांना ) **यः** ( जो ) **भुंक्ते** ( उपभोग घेतो ) **स्तेनः** (चोर) **एव** ( केवळ ) **सः** ( तो ).

हि देवाः यज्ञभाविताः वः इष्टान् भोगान् दास्यंते तैः दत्तान् एभ्यः अप्रदाय यः भुंक्ते सः स्तेनः एव.

कारण, यज्ञानें संतुष्ट झालेले देव तुम्हाला पाहिजे असलेलीं विषयसुखें देतील. त्या देवांनीं दिलेलीं विषयसुखें जो त्या देवांना कांहीं हविर्भाग दिल्याशिवाय भोगतो, तो केवळ चोर होय ॥ १२ ॥

यज्ञशिष्टाशिनः संतो मुच्यंते सर्वकिल्बिषैः।
भुंजन्ते ते त्वघं पापा ये पचंत्यात्मकारणात् ॥ १३ ॥

**यज्ञशिष्टाशिनः** = यज्ञस्य शिष्टं अश्नंति ते ( यज्ञाच्या हविर्भागापैकीं शेष राहिलेलें जे खातात ) **संतः** ( सत्पुरुष ) **मुच्यंते** ( मुक्त होतात ) **सर्वकिल्बिषैः** = सर्वैः किल्बिषैः ( सर्व पापांपासून ) **भुंजन्ते** ( उपभोग घेतात ) **ते** ( ते ) **तु** ( परंतु ) **अघं** ( पाप ) **पापाः** ( पापी मनुष्यें ) **ये** ( जे ) **पचंति** ( स्वयंपाक करतात ) **आत्मकारणात्** = आत्मनः कारणात् ( आपल्याकरितां ).

यज्ञशिष्टाशिनः संतः सर्वकिल्बिषैः मुच्यंते, तु ये पापाः आत्मकारणात् पचंति ते अघं भुंजन्ते.

जे सत्पुरुष यज्ञाच्या हविर्भागापैकीं शेष ग्रहण करतात, ते सर्व पापांपासून मुक्त होतात; परंतु जे आपल्याकरतांच पाकनिष्पत्ति करतात, तें पापच भक्षण करतात ॥ १३ ॥

अन्नाद्भवंति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ।
यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥

अन्नात् ( अन्नापासून ) भवंति ( होतात ) भूतानि ( प्राणी ) पर्जन्यात् ( पर्जन्यापासून ) अन्नसंभवः ( अन्नाची उत्पत्ति ) यज्ञात् ( यज्ञापासून ) भवति ( होतो ) पर्जन्यः ( पाऊस ) यज्ञः ( यज्ञ ) कर्मसमुद्भवः = कर्मणः समुद्भवः यस्य तत् (ज्याची उत्पत्ति कर्मापासून तें).

अन्नात् भूतानि भवंति, पर्जन्यात् अन्नसंभवः ( भवति ) यज्ञात् पर्जन्यः भवति, यज्ञः कर्मसमुद्भवः ( अस्ति ).

अन्नापासून प्राणी उत्पन्न होतात, पर्जन्यापासून अन्न उत्पन्न होतें, यज्ञापासून पर्जन्य पडतो आणि यज्ञाची उत्पत्ति कर्मापासून आहे ॥ १४ ॥

कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माऽक्षरसमुद्भवम् ।
तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥

कर्म ( कर्म ) ब्रह्मोद्भवं = ब्रह्मणः उद्भवः यस्य तत् ( ब्रह्म म्हणजे मूळप्रकृति तिच्यापासून ज्याची उत्पत्ति तें ) विद्धि ( समज ) ब्रह्म ( मूळ प्रकृति ) अक्षरसमुद्भवं = अक्षरात् समुद्भवः यस्य तत् ( शाश्वत ब्रह्मापासून ज्याची उत्पत्ति तें ) तस्मात् ( म्हणून ) सर्वगतं ( सर्वत्र भरून राहिलेलें ) ब्रह्म ( ब्रह्म ) नित्यं (अक्षयीं) यज्ञे (यज्ञाच्या ठिकाणीं ) प्रतिष्ठितम् ( स्थापन झालेलें ).

कर्म ब्रह्मोद्भवं, ब्रह्म अक्षरसमुद्भवं विद्धि, तस्मात् सर्वगतं ब्रह्म यज्ञे नित्यं प्रतिष्ठितं अस्ति.

ब्रह्मापासून ( प्रकृतिपासून ) कर्माची उत्पत्ति आहे हें ध्यानांत घे; आणि अक्षर म्हणजे परमेश्वरापासून हें ब्रह्म ( प्रकृति ) निघालें आहे, याकरतां सर्वत्र भरून राहिलेलें ब्रह्मच यज्ञांत स्थापन झालेलें (गुंतलेलें) आहे ॥१५॥

एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।
अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥

एवं ( याप्रमाणें ) प्रवर्तितं ( फिरावित ठेवलेलें ) चक्रं ( चाक ) न अनुवर्तयति ( त्याप्रमाणें वर्तन ठेवीत नाहीं ) इह ( येथें, या लोकीं )

यः ( जो ) **अघायुः** = अघं आयुः यस्य सः ( ज्याचा जीवनक्रम पापरूप तो ) **इंद्रियारामः** = इंद्रियेषु आरामः यस्य सः ( ज्याचा संतोष इंद्रियांची तृप्ति तो ) **मोघं** ( व्यर्थ ) **पार्थ** ( अर्जुना ) **सः** (तो) **जीवति** ( जिवंत राहतो ).

पार्थ, एवं प्रवर्तितं चक्रं यः इह न अनुवर्तयति सः अघायुः इंद्रियारामः ( च ) मोघं जीवति.

अर्जुना, याप्रमाणें फिरत असलेल्या चक्राला अनुसरून जो या लोकीं वागत नाहीं व आपलें आयुष्य पापाचरणांत आणि विषयोपभोगांत घालवितो त्याचें जिणें व्यर्थ होय ॥ १६ ॥

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ।**
**आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥ १७ ॥**

यः ( जो ) **तु** ( परंतु ) **आत्मरतिः** = आत्मनि रतिः यस्य सः ( आत्मस्वरूपांत ज्याची आसक्ति तो ) **एव** ( केवळ ) **स्यात्** ( असेल ) **आत्मतृप्तः** = आत्मना तृप्तः ( आत्मस्वरूपचिंतनांत समाधान पावलेला ) **च** ( आणि ) **मानवः** ( पुरुष ) **आत्मनि** ( आत्म्याच्या ठिकाणीं ) **एव** ( केवळ ) **च** ( आणि ) **संतुष्टः** ( समाधान पावलेला ) **तस्य** ( त्याचें ) **कार्यं** ( करावयाचें ) **न विद्यते** ( असत नाहीं ).

तु यः मानवः आत्मरतिः एव स्यात् च आत्मतृप्तः च आत्मनि एव संतुष्टः, तस्य कार्यं न विद्यते.

परंतु, जो पुरुष केवळ आत्मस्वरूपांत रममाण असून आत्मस्वरूपचिंतनांतच समाधान पावलेला आणि आत्म्याच्या ठिकाणीं आनंदानें तृप्त असतो, त्याला ( स्वतःकरतां असें ) कांहींच करावयाचें राहत नाहीं ॥ १७ ॥

**नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।**
**न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥**

**न** ( नाहीं ) **एव** ( केवळ ) **तस्य** ( त्याला ) **कृतेन** ( कर्माशीं ) **अर्थः** ( लाभ ) **न** ( नाहीं ) **अकृतेन** ( अकर्माशीं ) **इह** ( या लोकीं ) **कश्चन** ( कोणत्याही ) **न** ( नाहीं ) **च** ( आणि ) **अस्य** ( त्याचा )

सर्वभूतेषु = सर्वेषु भूतेषु ( सर्व प्राणिमात्रांत ) कश्चित् ( कोणताहि ) अर्थस्य ( लाभाचा ) व्यपाश्रयः ( आश्रय ).

इह तस्य कृतेन अर्थः न एव, अकृतेन ( अपि ) कश्चन ( अर्थः ) न, च अस्य सर्वभूतेषु कश्चित् अर्थस्य व्यपाश्रयः न.

या लोकीं कर्म केल्यापासून त्याला कांहीं लाभ नसतो, कर्म न केल्यानेंहि त्याचा कांहीं तोटा नाहीं आणि जगांतील भूतमात्रांशींही त्याच्या ( स्वतःच्या ) नफ्यातोट्याचा संभव नसतो ( सर्व भूतमात्रांशींही त्याला कांहीं कर्तव्य नसतें ) ॥ १८ ॥

**तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।**
**असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥**

**तस्मात्** ( म्हणून ) **असक्तः** ( वासना न ठेवतां ) **सततं** ( नेहमीं ) **कार्यं** ( करावयाचें तें ) **कर्म** ( कर्म ) **समाचर** ( चांगल्या मार्गानें आचरण कर ) **असक्तः** ( वासना न ठेवतां ) **हि** ( कारण ) **आचरन्** ( करून ) **कर्म** ( कर्म ) **परं** ( श्रेष्ठपुरुषार्थ ) **आप्नोति** ( मिळवितो ) **पूरुषः** ( पुरुष ).

तस्मात् ( त्वं ) सततं कार्यं कर्म असक्तः समाचार; हि असक्तः कर्म आचरन् पूरुषः परं आप्नोति.

म्हणून फलाशा सोडून तूं करावयाचीं उक्त तीं कर्में चांगल्या प्रकारें आचरीत रहा; कारण फलाशा सोडून विहित कर्मांचें आचरण करणारा पुरुष उत्तम पद ( श्रेष्ठपुरुषार्थ ) प्राप्त करून घेतो ॥ १९ ॥

**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ।**
**लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥**

**कर्मणा** ( कर्मानें ) **एव** ( केवळ ) **हि** ( खरोखर ) **संसिद्धिम्** ( पूर्णतेला ) **आस्थिताः** ( पोंचले, गेले ) **जनकादयः** = जनकः आदि एषां ते ( ज्यांचा आरंभ जनकापासून ते = जनकादि ज्ञानी ) **लोकसंग्रहं** ( लोकांचें कल्याण ) **एव** ( देखील ) **अपि** ( सुद्धां ) **संपश्यन्** (पाहून) **कर्तुम्** ( करण्याला ) **अर्हसि** ( योग्य आहेस ).

हि जनकादयः कर्मणा एव संसिद्धं आस्थिताः, अपि लोकसंग्रहं एव संपश्यन् ( कर्म ) कर्तुं अर्हसि.

आणखीहि पहा कीं, जनकप्रभृति ज्ञानी पुरुष कर्तव्यकर्म करूनच पूर्णतेला पोंचले; शिवाय लोककल्याण करण्याकडेहि लक्ष ठेवून तूं कर्तव्यकर्म करावेंस हें योग्य आहे ॥ २० ॥

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।
स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥

यत् ( जें ) यत् ( जें ) आचरति ( करतो ) श्रेष्ठः ( सत्पुरुष ) तत् ( तें ) तत् ( तें ) एव ( केवळ ) इतरः ( दुसरे ) जनः (लोक) सः ( तो ) यत् ( जें ) प्रमाणं ( नमुना ) कुरुते ( करतो ) लोकः ( जन ) तत् ( तें ) अनुवर्तते ( अनुकरण करतो ).

यत् यत् श्रेष्ठः आचरति, तत् तत् एव इतरः जनः ( आचरति ) सः यत् प्रमाणं कुरुते, लोकः तत् अनुवर्तते.

श्रेष्ठ पुरुष ( आत्मज्ञानी ) जें जें कर्म करतो तें तें कर्म इतर लोक करतात; तो जें प्रमाण ( जो कित्ता ) धरून वर्तन करतो त्याचेंच अनुकरण सामान्य जन करतात ॥ २१ ॥

न मे पार्थाऽस्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।
नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ २२ ॥

न ( नाहीं ) मे ( मला ) पार्थ ( अर्जुना ) अस्ति (आहे) कर्तव्यं ( करावयाचें ) त्रिषु ( तीनही ) लोकेषु (लोकांत) किंचन (कांहींहि) न ( नाहीं ) अनवाप्तं ( न मिळालेलें ) अवाप्तव्यं ( मिळवावयाचें राहिलेलें ) वर्ते ( राहतों ) एव (सुद्धां) च (आणि) कर्मणि (कर्मांत).

पार्थ, त्रिषु लोकेषु किंचन मे कर्तव्यं न अस्ति, अनवाप्तं अवाप्तव्यं च न ( अस्ति ) ( अहं ) कर्मणि वर्ते एव.

अर्जुना ! मला या त्रैलोक्यांत कांहींएक करावयाचें राहिलें नाहीं, न मिळालेली अशी कांहीं वस्तु मिळवावयाची आहे असेंहि नाहीं; तथापि मी कर्म करतोंच आहें ॥ २२ ॥

यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतंद्रितः ।
मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥

यदि ( जर ) हि ( खरोखर ) अहं ( मी ) न वर्तेयं ( असणार नाहीं ) जातु ( निरंतर ) कर्मणि (कर्मांत) अतंद्रितः (आळस टाकून) मम ( माझा ) वर्त्म ( मार्ग ) अनुवर्तंते ( अनुसरतात ) मनुष्याः ( मनुष्यें ) पार्थ ( अर्जुना ) सर्वशः ( सर्व प्रकारांनीं. )

हि, यदि अहं अतंद्रितः कर्मणि जातु न वर्तेयं, पार्थ मनुष्याः सर्वशः मम वर्त्म अनुवर्तंते.

अर्जुना ! मी जर आळस टाकून सतत कर्म करणार नाहीं, तर मनुष्यें सर्व प्रकारें माझ्याच मार्गाचें अनुकरण करतील ॥ २३ ॥

उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।
संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥ २४ ॥

उत्सीदेयुः ( नाश पावतील ) इमे ( हे ) लोकाः ( लोक ) न कुर्यां ( केलें नाहीं ) कर्म ( कर्म ) चेत् ( जर ) अहं (मी) संकरस्य ( वर्णसंकराचा ) च ( आणि ) कर्ता ( करणारा ) स्याम् ( होईन ) उपहन्याम् ( नाश करीन ) इमाः ( हे ) प्रजाः ( जन ).

अहं कर्म न कुर्यां चेत् इमे लोकाः उत्सीदेयुः, संकरस्य कर्ता स्यां इमाः च प्रजाः उपहन्याम्.

मीं जर कर्म केलें नाहीं तर हे लोक नाश पावतील, जातींचा संकर ( घोंटाळा ) होण्याला मी कारण होईन आणि प्रजाजनांचा माझ्याकडून घात होईल ॥ २४ ॥

सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वंति भारत ।
कुर्याद्विद्वांस्तथाऽसक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥

सक्ताः ( फलेच्छा धरून राहिलेले ) कर्मणि ( कर्मांत ) अविद्वांसः ( अज्ञानी लोक ) यथा ( जसें ) कुर्वंति ( करतात ) भारत (अर्जुना) कुर्यात् ( करावें ) विद्वान् ( ज्ञानी पुरुषानें ) तथा ( तसें ) असक्तः

( फलेच्छा सोडून ) चिकीर्षुः ( करावयास इच्छिणारा ) लोकसंग्रहं ( लोकांचें कल्याण ).

भारत, अविद्वांसः यथा कर्मणि सक्ताः कुर्वंति, तथा लोकसंग्रहं चिकीर्षुः विद्वान् असक्तः कुर्यात्.

अर्जुना, ज्याप्रमाणें अज्ञानी मनुष्यें फलाशेनें कर्मे करतात त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषानें फलाविषयीं आसक्ति न ठेवतां फक्त लोकांच्या कल्याणाकरतां ( परोपकाराकरतां ) कर्मे करावींत ॥ २५ ॥

न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।
जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ २६ ॥

न ( नाहीं ) बुद्धिभेदं ( बुद्धिभ्रंश ) जनयेत् ( उत्पन्न करावा ) अज्ञानां ( अजाण लोकांचा ) कर्मसंगिनाम् = कर्मणि संगो येषां तेषां ( कर्मांत ज्यांची आसक्ति त्यांचा ) जोषयेत् (करवावींत) सर्वकर्माणि= सर्वाणि कर्माणि ( सर्व कर्मे ) विद्वान् ( ज्ञानी पुरुष ) युक्तः ( योगयुक्त होऊन ) समाचरन् ( आचरण करून ).

विद्वान् कर्मसंगिनां अज्ञानां बुद्धिभेदं न जनयेत्, युक्तः समाचरन् सर्व कर्माणि जोषयेत्.

जाणत्या पुरुषानें, कर्मफलाची आशा असणाऱ्या अज्ञानी लोकांचा बुद्धिभ्रंश करूं नये; तर त्यानें योगयुक्त होऊन निष्कामपणानें सर्व कर्मांचें आचरण करून त्यांना ( अज्ञानी लोकांना ) आवडीनें कर्मे करावयास लावावें ॥ २६ ॥

प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।
अहंकारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते ॥ २७ ॥

प्रकृतेः ( प्रकृतीच्या, मूळ मायेच्या ) क्रियमाणानि (केलीं जाणारीं) गुणैः ( सत्व, रज, तम या गुणांनीं ) कर्माणि ( कर्मे ) सर्वशः (सर्व ठिकाणीं ) अहंकारविमूढात्मा = अहंकारेण विमूढः आत्मा यस्य सः ( ज्याचा आत्मा अहंकारानें मोहित झाला आहे तो ) कर्ता ( करणारा ) अहं ( मी ) इति ( असें ) मन्यते ( मानतो ).

सर्वशः प्रकृतेः गुणैः कर्माणि क्रियमाणानि ( संति ), अहंकारविमूढात्मा अहं कर्ता इति मन्यते.

मूळ प्रकृतीच्या त्रिगुणात्मक गुणांनींच सर्वत्र कर्मे होत असतात, ( असें असून ) अहंकारानें जो मूढ झाला आहे तो 'मी कर्ता' असें समजतो ।२७।

**तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ।**
**गुणागुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥**

**तत्त्ववित्** ( रहस्य जाणारा ) **तु** (परंतु ) **महाबाहो** (आजानुबाहो, अर्जुना ) **गुणकर्मविभागयोः**=गुणानां च कर्मणां च विभागयोः (गुण व कर्में या दोहोंच्या वेगळेपणाचें ) **गुणाः** ( गुण ) **गुणेषु** ( गुणांमध्यें ) **वर्तन्ते** ( राहतात ) **इति** (असें) **मत्वा** (समजून घेऊन) **न सज्जते** ( आसक्त होत नाहीं ).

महाबाहो, गुणकर्मविभागयोः तत्त्ववित् तु गुणाः गुणेषु वर्तंते इति मत्वा न सज्यते.

अर्जुना, गुण आणि कर्में हीं आत्म्यापासून विभक्त ( निराळीं ) आहेत (आत्म्याशीं यांचा कांहीं संबंध नाहीं ) असें तत्व जाणणारा, गुणांचा आप-आपल्यांत व्यवहार चालला आहे हे लक्षांत घेऊन, कर्मांच्या ठिकाणीं आसक्ति ठेवीत नाहीं ॥ २८ ॥

**प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जंते गुणकर्मसु ।**
**तानकृत्स्नविदो मंदान्कृत्स्नविन्न विचालयेत् ॥२९ ॥**

**प्रकृतेः** ( प्रकृतीच्या ) **गुणसंमूढाः**=गुणैः संमूढाः ( गुणांनीं भूल घातलेले ) **सज्जंते** ( आसक्त होतात ) **गुणकर्मसु**=गुणानां कर्मसु ( गुणांच्या कर्मांत ) **तान्** ( त्यांना ) **अकृत्स्नविदः** ( अर्धवट ज्ञान झालेल्यांना ) **मंदान्** ( मंद बुद्धीच्यांना ) **कृत्स्नवित्** ( पूर्ण ज्ञानी ) **न विचालयेत्** ( बिघडवूं नये. )

प्रकृतेः गुणसंमूढाः गुणकर्मसु सज्जंते, कृत्स्नवित् अकृत्स्नविदः तान् न विचालयेत.

प्रकृतीच्या गुणांनीं (सत्वरजादि गुणांनीं) मूढ झालेले लोक गुणांची (विषयोपभोगांचीं) कर्में करण्यांत गढलेले असतात. अशा अर्धवट ज्ञान झालेल्या लोकांना पूर्ण ज्ञान झालेल्यांनीं विघडवूं नयें (त्यांचीं कर्में करण्याची श्रद्धा नाहींशी करूं नये) ॥ २९ ॥

**मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याऽध्यात्मचेतसा ।**
**निराशीर्निर्ममो भूत्वा युद्ध्यस्व विगतज्वरः ॥ ३० ॥**

**मयि** (माझ्या ठिकाणीं) **सर्वाणि** (सर्व) **कर्माणि** (कर्में) **संन्यस्य** (सोडून देऊन) **अध्यात्मचेतसा** = अध्यात्मनि चेतसा (आत्म्याच्या ठिकाणीं मन स्थिर करून) **निराशीः** (निरिच्छ झालेला) **निर्ममः** (अहंभाव सोडलेला) **भूत्वा** (होऊन) **युद्ध्यस्व** (युद्ध कर) **विगतज्वरः** = विगतः ज्वरः यस्यः सः (ज्याचा ताप गेला आहे तो).

अध्यात्मचेतसा मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्य, निराशीः निर्ममः भूत्वा विगतज्वरः (सन्) युद्ध्यस्व.

माझ्या परमात्म्याच्या ठिकाणीं मन स्थिर करून सर्व कर्मांचे फळ मला अर्पण करून, फलेच्छा व अहंभाव सोडून देऊन शांत वृत्तीनें युद्ध कर ।३०।

**ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठंति मानवाः ।**
**श्रद्धावंतोऽनसूयंतो मुच्यंते तेऽपि कर्मभिः ॥ ३१ ॥**

**ये** (जे) **मे** (माझें) **मतं** (मत) **इदं** (हें) **नित्यं** (दररोज) **अनुतिष्ठंति** (अनुसरतात) **मानवाः** (मनुष्य लोक) **श्रद्धावंतः** (विश्वास ठेवणारे) **अनसूयंतः** (तिरस्कार न करणारे) **मुच्यंते** (मुक्त होतात) **ते** (ते) **अपि** (सुद्धां) **कर्मभिः** (कर्मापासून, कर्मबंधापासून.)

ये श्रद्धावंतः अनसूयंतः मानवाः इदं मे मतं नित्यं अनुतिष्ठंति, ते अपि कर्मभिः मुच्यंते.

जे पुरुष दोषदृष्टीनें कल्पना न काढतां विश्वासानें या माझ्या मताप्रमाणें नेहमीं वर्तन करतात ते सुद्धां कर्मापासून (कर्मबंधनापासून) मुक्त होतात।३१।

**ये त्वेतदभ्यसूयंतो नानुतिष्ठंति मे मतम् ।**
**सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥**

ये ( जे ) तु ( परंतु ) एतत् ( हें ) अभ्यसूयंतः ( तिरस्कार बुद्धीनें कल्पना काढून ) न अनुतिष्ठंति ( वागत नाहींत ) मे ( माझें ) मतं ( मत ) सर्वज्ञानविमूढान् = सर्वस्मिन् ज्ञाने विमूढान् ( ज्ञानाच्या बाबतींत सर्वस्वीं अजाण ) तान् ( त्यांना ) विद्धि ( समज ) नष्टान् ( नाश पावलेले ) अचेतसः ( अविवेकी, बुद्धिहीन ).

ये तु एतत् मे मतं अभ्यसूयंतः न अनुतिष्ठंति, सर्वज्ञानविमूढान् अचेतसः तान् नष्टान् ( इति ) विद्धि.

जे या माझ्या मताविषयीं दोषदृष्टीनें (तिरस्कारबुद्धीनें) कल्पना काढून त्याप्रमाणें वागत नाहींत ते ज्ञानशून्य, अविवेकी नाश पावले असें समज ॥३२॥

सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।
प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ ३३ ॥

सदृशं ( अनुरोधानें ) चेष्टते ( वागतो ) स्वस्याः ( स्वतःच्या ) प्रकृतेः ( प्रकृतीच्या ) ज्ञानवान् ( ज्ञानी मनुष्य ) अपि ( सुद्धां ) प्रकृतिं ( प्रकृतीला ) यान्ति ( अनुसरतात ) भूतानि ( जीवमात्र ) निग्रहः ( दाबून धरणें ) किं ( काय ) करिष्यति ( करील ).

ज्ञानवान् अपि स्वस्याः प्रकृतेः सदृशं चेष्टते, भूतानि प्रकृतिं यान्ति, निग्रहः किं करिष्यति ?

ज्ञानी असला तरीसुद्धां तो आपल्या प्रकृतीच्या अनुरोधानें वागतो, सर्व जीव आपल्या प्रकृतीप्रमाणें वागतात; तेव्हां प्रकृतीवर ( तिच्या अनिवार्य गुणधर्माविरुद्ध ) अयोग्य जबरी करून उलट जाण्याचा काय उपयोग होईल ? ॥ ३३ ॥

इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।
तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपंथिनौ ॥ ३४ ॥

इंद्रियस्य ( इंद्रियाच्या ) इंद्रियस्य ( इंद्रियाच्या ) अर्थे ( विषयांत ) रागद्वेषौ = रागः च द्वेषः च (आवड आणि द्वेष, व्यवस्थितौ ( व्यवस्था केलेले, ठरलेले ) तयोः ( त्या दोहोंच्या ) न (नाहीं) वशम् ( स्वाधीन ) आगच्छेत ( येऊं देणें ) तौ ( हीं दोन ) हि ( कारण ) अस्य ( याच्या ) परिपंथिनौ ( मार्गांत अडथळे करणारीं. )

इंद्रियस्य अर्थे इंद्रियस्य रागद्वेषौ व्यवस्थितौ (सः) तयोः वशं न आगच्छेत्; तौ हि अस्य परिपंथिनौ.

इंद्रियांची त्यांच्या विषयासंबंधीं आवड अथवा द्वेष हीं प्रत्येक इंद्रियांचीं ठरलेलीं (कायम झालेलीं) असतात, आपण (ममत्व धरून) त्यांच्या स्वाधीन होऊं नये; कारण तीं दोन्हींहि योगमार्गांत अडथळे आणणारीं आहेत ॥ ३४ ॥

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥**

**श्रेयान्** (अधिक चांगलें) **स्वधर्मः** (आपला धर्म, आपल्या वर्णाचें कर्तव्यकर्म) **विगुणः** (हलक्या प्रतीचा) **परधर्मात्** = परस्य धर्मात् (दुसऱ्या वर्णाच्या धर्माहून) **स्वनुष्ठितात्** (चांगल्या रीतीनें संपादन केल्यापेक्षां) **स्वधर्मे** (आपला धर्म आचरण्यांत) **निधनं** (मरण) **श्रेयः** (अधिक चांगलें) **परधर्मः** (दुसऱ्याचा धर्म) **भयावहः** (भयंकर).

स्वधर्मः विगुणः (अपि) स्वनुष्ठितात् परधर्मात् श्रेयान् (अस्ति) स्वधर्मे निधनं श्रेयः, परधर्मः भयावहः (अस्ति).

आपलें वर्णधर्मविहित कर्तव्यकर्म सदोष असलें तरी तेंच आचरण करणें हें दुसऱ्या वर्णाचें कर्म उत्तम प्रकारें आचरण्यापेक्षां जास्त कल्याणकारक आहे; आपल्या धर्माप्रमाणें आचरण ठेवण्यांत मरण आलें तरी चांगलें, दुसऱ्याचा धर्म आचरण्यांत भयंकर अकल्याण आहे ॥ ३५ ॥

अर्जुन उवाच—**अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ।**
**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ३६॥**

**अथ** (आतां) **केन** (कशानें) **प्रयुक्तः** (प्रेरणा होऊन) **अयं** (हा) **पापं** (पाप) **चरति** (करतो) **पूरुषः** (पुरुष) **अनिच्छन्** (इच्छा नसून) **अपि** (सुद्धां) **वार्ष्णेय** (वृष्णि कुलोत्पन्ना कृष्णा) **बलात्** (जबरीनें) **इव** (जसें कांहीं) **नियोजितः** (कामास लावलेला)

वार्ष्णेय, अथ केन प्रयुक्तः अयं पुरुषः अनिच्छन् अपि बलात् नियोजितः इव पापं चरति ?

श्रीकृष्णा ! मनुष्याची इच्छा नसतांहि जबरीनें ओढून लावल्याप्रमाणें तो पापाचरण करतो तें कोणाच्या प्रेरणेनें होतें ? ॥ ३६ ॥

श्रीभगवानुवाच—**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।**
**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ३७**

**कामः** ( काम, वासना ) **एषः** ( हा ) **क्रोधः** ( राग ) **एषः** (हा) **रजोगुणसमुद्भवः** = रजसः गुणात् समुद्भवः यस्य सः ( रजोगुणापासून ज्याची उत्पत्ति तो ) **महाशनः** = महत् अशनं यस्य सः (फार खादाड) **महापाप्मा** ( मोठा पापी ) **विद्धि** ( जाण ) **एनं** ( हा ) **इह** ( या लोकीं ) **वैरिणं** ( शत्रु ).

एषः कामः एषः क्रोधः रजोगुणसमुद्भवः ( अस्ति ) महाशनः महापाप्मा ( अस्ति ) इह एनं वैरिणं विद्धि.

श्रीभगवान् म्हणाले:—रजोगुणापासून उत्पन्न झालेला, मोठा अधाशी ( सदा अतृप्त ) व महापापी असा हा काम, हा क्रोध ( हाच पापाची प्रेरणा करणारा होय ) या लोकीं हा आपला शत्रु आहे हें लक्षांत ठेव ३७

**धूमेनाऽव्रियते वह्निर्यथाऽऽदर्शो मलेन च ।**
**यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥**

**धूमेन** ( धुरानें ) **आव्रियते** ( झांकला जातो ) **वह्निः** ( अग्नि ) **यथा** ( ज्याप्रमाणें ) **आदर्शः** ( आरसा ) **मलेन** (मळानें) **च** (आणि) **यथा** ( जसा ) **उल्बेन** ( ज्या चर्मानें गर्भ वेष्टिलेला असतो त्याला वार म्हणतात, त्या वारेनें ) **आवृतः** ( वेष्टिलेला ) **गर्भः** ( गर्भ ) **तथा** ( तसा ) **तेन** ( त्यानें ) **इदं** ( हें ) **आवृतं** ( वेष्टिलेलें ).

यथा धूमेन वन्हिः आव्रियते, यथा च आदर्शः मलेन, यथा गर्भः उल्बेन आवृतः, तथा तेन ( कामेन ) इदं आवृतं.

ज्याप्रमाणें धुरानें अग्नि, मळानें आरसा, किंवा वारेनें गर्भ आच्छादिलेला असतो, त्याप्रमाणें यानें ( कामानें ) हें ( शुद्ध ज्ञान ) झांकून टाकलेलें असतें ॥ ३८ ॥

**आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।**
**कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥**

**आवृतं** ( वेष्टिलेलें ) **ज्ञानम्** ( ज्ञान ) **एतेन** ( ह्यानें ) **ज्ञानिनः** ( ज्ञान्याचें ) **नित्यवैरिणा** ( अहोरात्र द्वेष करणारा ) **कामरूपेण** कामः रूपं यस्य सः ( ज्याचें स्वरूप काम तो ) **कौन्तेय** ( हे अर्जुना ) **दुष्पूरेण** ( ज्याची कधीं तृप्ति व्हावयाची नाहीं त्यानें ) **अनलेन** ( असंतुष्ट जो त्यानें ) **च** ( आणि ).

कौन्तेय, ज्ञानिनः नित्यवैरिणा एतेन कामरूपेण दुष्पूरेण च अनलेन ज्ञानं आवृतं.

अर्जुना, सदा असंतुष्ट व अतृप्त असा हा कामरूपी नेहमींचा वैरी यानेंच ज्ञानी पुरुषाचें ज्ञान आच्छादून टाकिलें आहे ॥ ३९ ॥

**इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।**
**एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥**

**इंद्रियाणि** ( इंद्रियें ) **मनः** ( मन ) **बुद्धिः** ( बुद्धि ) **अस्य** ( याची ) **अधिष्ठानम्** ( राहण्याची जागा ) **उच्यते** ( असें म्हटलें आहे ) **एतैः** ( यांनीं ) **विमोहयति** ( भ्रांतींत घालतो ) **एषः** ( हा ) **ज्ञानं** ( ज्ञान ) **आवृत्य** ( झांकून टाकून ) **देहिनम्** ( देह धारण करणाऱ्या जीवाला )

इंद्रियाणि, मनः बुद्धिः अस्य अधिष्ठानम् उच्यते. एषः एतैः ज्ञानं आवृत्य देहिनं विमोहयति.

इंद्रियें, मन, बुद्धि हीं या शत्रूचें राहण्याचें ठिकाण म्हटलें आहे. हा त्याचे आश्रयानें जिवाचें ज्ञान गुफांटयांत घालून त्याला मोहांत पाडतो ४०॥

**तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।**
**पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥**

**तस्मात्** ( म्हणून ) **त्वं** ( तूं ) **इंद्रियाणि** ( इंद्रियें ) **आदौ** ( प्रारंभीं ) **नियम्य** ( स्वाधीन करून घेऊन ) **भरतर्षभ** = भरतानां ऋषभ ( भरतकुलश्रेष्ठा, अर्जुना ) **पाप्मानं** ( पाप्याला ) **प्रजहि** ( ठार मारून टाक ) **हि** ( खरोखर ) **एनं** ( याला ) **ज्ञानविज्ञाननाशनम्**= ज्ञानस्य च विज्ञानस्य च नाशनम् ( ज्ञान आणि अनुभवज्ञान यांचा नाश करणाऱ्याला )

भरतर्षभ, तस्मात् त्वं आदौ इंद्रियाणि नियम्य ज्ञानविज्ञाननाशनम् एनं हि पाप्मानं प्रजहि.

म्हणून अर्जुना, तूं पहिल्यानें इंद्रियें स्वाधीन करून घेऊन अध्यात्मज्ञान व अनुभवज्ञान यांचा नाश करणारा हा पापी ( काम, क्रोध ) त्याला मारून टाक ॥ ४१ ॥

**इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ।**
**मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥**

**इंद्रियाणि** ( इंद्रियें ) **पराणि** ( पलीकडचीं, श्रेष्ठ ) **आहुः** ( म्हणतात ) **इंद्रियेभ्यः** ( इंद्रियांहून ) **परं** ( पलीकडचें, श्रेष्ठ ) **मनः** ( मन ) **मनसः** ( मनाहून ) **तु** ( खरोखर ) **परा** ( श्रेष्ठ, पलीकडली ) **बुद्धिः** ( बुद्धि ) **यः** ( जो ) **बुद्धेः** ( बुद्धीहून ) **परतः** ( अधिक श्रेष्ठ, पलीकडचा ) **तु** ( खरोखर ) **सः** ( तो ).

इंद्रियाणि पराणि आहुः, इंद्रियेभ्यः मनः परं, तु मनसः परा बुद्धिः, यः तु बुद्धेः परतः सः ( आत्मा ).

भूतांहून इंद्रियें श्रेष्ठ ( पलीकडचीं ) आहेत असें म्हटलें आहे, इंद्रियांहून मन श्रेष्ठ ( पलीकडचें ), मनाहून बुद्धि श्रेष्ठ ( पलीकडची ) आणि जो बुद्धीहूनहि श्रेष्ठ ( पलीकडचा ) ( तो ) तो ( आत्मा ) होय ॥ ४२ ॥

**एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।**
**जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥**

**एवं** ( याप्रमाणें ) **बुद्धेः** ( बुद्धीहून ) **परं** ( श्रेष्ठाला, पलीकडच्याला ) **बुद्ध्वा** ( जाणून ) **संस्तभ्य** ( स्थिर करून ) **आत्मानं** ( आपल्याला ) **आत्मना** ( आपण ) **जहि** ( मारून टाक ) **शत्रुं** ( शत्रूला ) **महाबाहो** ( अर्जुना ) **कामरूपं** (कामस्वरूप) **दुरासदम्** ( सांपडण्याला कठीण ).

महाबाहो, एवं बुद्धेः परं बुद्ध्वा आत्मानं आत्मना संस्तभ्य कामरूपं दुरासदं शत्रूं जहि.

अर्जुना, आत्मा हा बुद्धीपेक्षांहि श्रेष्ठ, पलीकडचा आहे हें लक्षांत घेऊन आपण आपल्याला सांवरून धरून या दुःसाध्य कामरूपी शत्रूला मारून टाक ॥ ४३ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्म० यो० श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः



———

# अध्याय चवथा.

श्रीभगवानुवाच—इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।
विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥१॥

इमं ( हा ) विवस्वते ( विवस्वताला, सूर्याला ) योगं ( योग ) प्रोक्तवान् (सांगितला) अहं (म्या) अव्ययम् (अविनाशी) विवस्वान् ( सूर्य ) मनवे ( मनूला ) प्राह ( म्हणाला ) मनुः ( मनु ) इक्ष्वाकवे ( इक्ष्वाकूला ) अब्रवीत् ( बोलला ).

इमं अव्ययं योगं अहं विवस्वते प्रोक्तवान्; विवस्वान् मनवे प्राह; मनुः इक्ष्वाकवे अब्रवीत्.

श्रीभगवान् ह्मणाले–हा अविनाशी ( कधीं क्षीण न होणारा ) योगमार्ग मीं सूर्याला सांगितला; सूर्यानें मनूला ( आपल्या मुलाला ) सांगितला; आणि मनूनें इक्ष्वाकूला ( त्याचा मुलगा इक्ष्वाकु राजा, जो पहिलाच राजा झाला त्याला ) समजावून दिला ॥ १ ॥

एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।
स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥

एवं ( याप्रमाणें ) परंपराप्राप्तं = परंपरया प्राप्तं (परंपरेनें मिळालेला) इमं ( हा ) राजर्षयः ( राजऋषि, राजे असून जे ज्ञानी त्यांनीं ) विदुः ( जाणला होता = त्यांना समजला होता ) सः (तो) कालेन (कालानें) इह ( येथें, या लोकीं ) महता ( मोठा ) योगः (योग) नष्टः (नाहींसा झाला ) परंतप ( शत्रूंस ताप देणाऱ्या अर्जुना ).

परंतप, एवं परंपराप्राप्तं इमं ( योगं ) राजर्षयः विदुः; सः योगः महता कालेन इह नष्टः.

अर्जुना, याप्रमाणें हा योग-मार्ग परंपरेनें राजऋषि यांना समजला होता, त्यानंतर फार काल गेल्यानें हलीं येथें, या (मृत्यु) लोकीं तो नष्ट ( नाहींसा, कोणाला माहीत नाहीं असा ) झाला ॥ २ ॥

**स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।**
**भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥**

सः ( तो ) एव ( देखील ) अयं ( हा ) मया ( म्यां ) ते (तुला) अद्य ( आज ) योगः (योग) प्रोक्तः ( सांगितला) पुरातनः (पूर्वीच्या, काळचा ) भक्तः ( भक्त ) असि ( आहेस ) मे (माझा) सखा ( प्रिय मित्र ) च ( आणि ) इति ( याप्रमाणें ) रहस्यं ( गुह्य ) हि (खरोखर) एतत् ( हें ) उत्तमम् ( अति उत्कृष्ट ).

सः एव अयं पुरातनः योगः अद्य मया ते प्रोक्तः; मे भक्तः असि च सखा इति. हि एतत् उत्तमं रहस्यं ( अस्ति ).

तूं माझा भक्त आणि प्रिय मित्र आहेस म्हणून तोच हा पूर्वकालीन योग आज मीं तुला सांगितला; हा योग म्हणजे एक उत्तम रहस्य ( गुह्य ) च आहे ( असें समज ) ॥ ३ ॥

अर्जुन उवाच—**अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।**
**कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥**

अपरं ( अलीकडील ) भवतः ( तुझा ) जन्म (जन्म) परं (पूर्वीचा) जन्म ( जन्म ) विवस्वतः ( सूर्याचा ) कथं ( कसें ) एतत् ( हें ) विजानीयाम् ( समजूं ) त्वं ( तूं ) आदौ ( अगोदर ) प्रोक्तवान् ( सांगितलेंस ) इति ( याप्रमाणें ).

भवतः जन्म अपरं, विवस्वतः जन्म परं ( अस्ति ) त्वं आदौ प्रोक्तवान् इति एतत् ( अहं ) कथं विजानीयाम् ?

अर्जुन म्हणालाः—तुमचा जन्म अलीकडचा आणि सूर्याचा जन्म पुरातन काळचा असें असून तुम्ही पहिल्यानें ( हा योग सूर्याला ) सांगितला म्हणतां. तर हें मीं कसें समजावें ? ॥ ४ ॥

श्रीभगवानुवाच—**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥**

बहूनि ( पुष्कळ ) मे ( माझे ) व्यतीतानि ( गेलेले ) जन्मानि ( जन्म ) तव ( तुझे ) च ( आणि ) अर्जुन ( अर्जुना ) तानि ( ते

जन्म ) अहं ( मी ) वेद ( जाणतों ) सर्वाणि ( सर्व ) न ( नाहीं ) त्वं ( तूं ) वेत्थ ( जाणतोस ) परंतप ( अर्जुना ).

परंतप अर्जुन, मे तव च बहूनि जन्मानि व्यतीतानि; तानि सर्वाणि अहं वेद, त्वं न वेत्थ.

श्रीभगवान् म्हणाले—हे शत्रुतापना अर्जुना ! माझे आणि तुझे पुष्कळ जन्म होऊन गेलेले आहेत; ते सर्व मला स्मरत आहेत, तुला त्यांचें स्मरण नाहीं ॥ ५ ॥

**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।**
**प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥**

**अजः** ( जन्म न पावलेला ) **अपि** ( सुद्धां ) **सन्** ( होऊन ) **अव्ययात्मा** =अव्ययः आत्मा यस्य सः (ज्याचा आत्मा कधीं नाश पावत नाहीं तो ) **भूतानां** ( भूतमात्रांचा ) **ईश्वरः** (ईश्वर, स्वामी, नियामक) **अपि** ( सुद्धां ) **सन्** ( होऊन ) **प्रकृतिं** ( प्रकृति ) **स्वाम्** ( माझ्या, स्वतःच्या ) **अधिष्ठाय** ( आश्रय करून, स्वाधीन =स्ववश करून ) **संभवामि** ( मी होतों, मी उद्भवतों ) **आत्ममायया** = आत्मनः मायया (परमेश्वरी मायेनें)

अजः अव्ययात्मा अपि सन् भूतानां ईश्वरः अपि सन् स्वां प्रकृतिं अधिष्ठाय आत्ममायया संभवामि.

मी जरी जन्मरहित आणि अविनाशी आहें, सर्व भूतमात्रांचा नियामक ( प्रवर्तक, स्वामी ) आहें, तथापि माझ्या स्वतःच्या प्रकृतीला ( मायेला ) आश्रय (स्ववश) करून त्या माझ्या मायेनें (मायेच्या आश्रयानें, सहायानें) मी जन्म घेतों ॥ ६ ॥

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥**

**यदा यदा** ( जेव्हां जेव्हां ) **हि** ( खरोखर ) **धर्मस्य** ( धर्माची ) **ग्लानिः** ( क्षीणत्व, मंदपणा ) **भवति** ( होते ) **भारत** ( हे अर्जुना ) **अभ्युत्थानम्** ( उभें राहणें, उदयाला येणें ) **अधर्मस्य** ( अधर्माचें )

तदा ( तेव्हां ) आत्मानम् ( स्वतःला ) सृजामि ( उत्पन्न करतों ) अहं ( मी ).

भारत, यदा यदा हि धर्मस्य ग्लानिः भवति, अधर्मस्य अभ्युत्थानं ( भवति ) तदा अहं आत्मानं सृजामि.

अर्जुना, जेव्हां जेव्हां धर्माला मंदपणा येतो, ( धर्म क्षीण होतो ) आणि अधर्म वाढतो, तेव्हां तेव्हां मी अवतार घेतों ॥ ७ ॥

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥

परित्राणाय ( संरक्षण करण्याकरितां ) साधूनां ( साधु पुरुषांचें ) विनाशाय ( संहार करण्याकरतां ) च ( आणि ) दुष्कृतां ( दुर्जनांचा ) धर्मसंस्थापनार्थाय = धर्मस्य संस्थापनस्य अर्थाय ( धर्माची विघडलेली स्थिति पुनः नीट करण्याकरतां ) संभवामि ( मी जन्म घेतों, मी अवतार घेतों ) युगे युगे ( युगायुगांच्या ठिकाणीं, वेळोवेळीं ).

साधूनां परित्राणाय, दुष्कृतां विनाशाय, धर्मसंस्थापनार्थाय च ( अहं ) युगे युगे संभवामि.

साधु पुरुषांचें संरक्षण करण्यासाठीं, दुर्जनांचा नाश करण्यासाठीं आणि धर्माची विघडलेली स्थिति पुनः नीट व्यवस्थित करण्यासाठीं मी निरनिराळ्या युगांमध्यें ( वेळोवेळीं ) अवतार घेतों ॥ ८ ॥

जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्वतः ।
त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ९ ॥

जन्म ( जन्म ) कर्म ( कर्म ) च ( आणि ) मे ( माझें ) दिव्यं ( अलौकिक ) एवं ( याप्रमाणें ) यः ( जो ) वेत्ति ( जाणतो ) तत्वतः ( खरेपणानें ) त्यक्त्वा ( सोडल्यानंतर ) देहं ( शरीर ) पुनः ( फिरून ) जन्म ( जन्म ) न ( नाहीं ) एति ( येतो ) माम् ( मला ) एति ( येतो ) सः ( तो ) अर्जुन ( अर्जुना ).

अर्जुन, यः तत्वतः मे दिव्यं जन्म कर्म च एवं वेत्ति; सः देहं त्यक्त्वा पुनः जन्म न एति; मां एति.

अर्जुना ! जो माझा अघटित जन्म व अलौकिक कर्म हीं खऱ्या अर्थानें समजतो, तो देह सोडल्यानंतर पुनः जन्मास येत नाहीं, तर तो मला येऊन मिळतो. माझ्यामध्यें लीन होतो, ह्मणजे मुक्त होतो ॥ ९ ॥

वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।
बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥

वीतरागभयक्रोधाः = वीतः रागः च भयं च क्रोधः च येषां ते ( ज्यांचा काम, भय व राग हीं गेलीं आहेत ते ) मन्मया ( मी ज्यांच्यांत पूर्ण भरलों आहें ते, मद्रूप झालेले ) मां ( मला ) उपाश्रिताः ( आश्रय करून राहिलेले ) बहवः ( पुष्कळ ) ज्ञानतपसा = ज्ञानस्य तपसा ( ज्ञानरूपी तपाचरणानें ) पूताः ( शुद्ध झालेले ) मद्भावं = मम भावं ( माझ्या स्थितीला, मत्स्वरूपाला ) आगताः ( आलेले ).

वीतरागभयक्रोधाः मन्मया माम् उपाश्रिताः बहवः ज्ञानतपसा पूताः मद्भावं आगताः ( संति ).

काम, भय आणि राग हे ज्यांनीं टाकून देऊन माझाच आश्रय धरून माझ्या ठिकाणीं लीन होऊन राहिलेले आणि ज्ञानरूप तपानें पवित्र झालेले असे अनेक लोक माझ्या स्वरूपाला येऊन मिळालेले आहेत ॥ १० ॥

ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् ।
मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ ११ ॥

ये ( जे ) यथा ( ज्याप्रमाणें ) मां ( मला ) प्रपद्यंते ( भजतात ) तान् ( त्यांना ) तथा ( त्याप्रमाणें ) एव ( देखील ) भजामि ( तृप्त करतों ) अहं ( मी ) मम ( माझा ) वर्त्म ( मार्ग ) अनुवर्तंते ( अनुसरतात ) मनुष्याः ( मनुष्यें ) पार्थ ( अर्जुना ) सर्वशः ( सर्व बाजूंनीं ).

पार्थ, ये यथा मां प्रपद्यंते, तान् तथा एव अहं भजामि; मनुष्याः सर्वशः मम वर्त्म अनुवर्तंते.

अर्जुना, जे ज्या भावनेनें माझी उपासना करतात त्याप्रमाणेंच मी त्यांच्या इच्छा पुरवितों; मनुष्यें सर्व प्रकारांनीं माझाच मार्ग अनुसरतात ( माझ्याकडेच येत असतात ) ॥ ११ ॥

**कांक्षन्तः कर्मणां सिद्धिं यजंते इह देवताः ।**
**क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२ ॥**

**कांक्षन्तः** ( इच्छा धरून ) **कर्मणां** ( कर्मांची ) **सिद्धिं** ( पूर्णता, यश ) **यजंते** ( आराधना करतात ) **इह** ( येथें ) **देवताः** ( देवता ) **क्षिप्रं** ( लवकर ) **हि** ( खरोखर ) **मानुषे** ( मनुष्यांत ) **लोके** ( लोकांत ) **सिद्धिः** ( पूर्णता ) **भवति** ( आहे ) **कर्मजा** ( कर्मांपासून उत्पन्न झालेलें ).

कर्मणां सिद्धिं कांक्षन्तः इह देवताः यजंते; हि मानुषे लोके कर्मजा सिद्धिः क्षिप्रं भवति.

कर्मफलाच्या प्राप्तीची इच्छा धरणारे या लोकीं देवतांची आराधना करतात; कारण मनुष्यलोकीं कर्मापासून फल लवकर प्राप्त होतें ॥ १२ ॥

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।**
**तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥**

**चातुर्वर्ण्यं** ( चार वर्ण, चार जाति ) **मया** ( म्या ) **सृष्टं** ( उत्पन्न केल्या ) **गुणकर्मविभागशः** = गुणानां च कर्मणां च विभागशः ( गुणांच्या आणि कर्मांच्या वांटणीप्रमाणें ) **तस्य** ( त्याचा ) **कर्तारं** ( उत्पत्ति करणारा ) **अपि** ( सुद्धां ) **मां** ( मला ) **विद्धि** ( जाण ) **अकर्तारं** ( न करणारा ) **अव्ययं** ( अविनाशी ).

मया गुणकर्मविभागशः चातुर्वर्ण्यं सृष्टं; तस्य कर्तारं अपि मां अकर्तारं अव्ययं विद्धि.

गुणांच्या आणि कर्मांच्या वांटणीप्रमाणें ( मनुष्यांच्या ) चार ( ब्राह्मण क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ) जाती मीं उत्पन्न केल्या. त्यांचा कर्ता मी आहें, तथापि मी अकर्ता व अविनाशी आहें असें जाण ( समजून घे ) ॥ १३ ॥

**न मां कर्माणि लिंपन्ति न मे कर्मफले स्पृहा ।**
**इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बद्ध्यते ॥१४॥**

**न** ( नाहीं ) **मां** ( मला ) **कर्माणि** ( कर्मे ) **लिंपन्ति** ( चिकटतात, बाधक होतात ) **न** ( नाहीं ) **मे** ( माझी ) **कर्मफले** ( कर्माच्या फला-

विषयीं ) स्पृहा ( इच्छा ) इति ( याप्रमाणें ) मां ( मला ) यः ( जो ) अभिजानाति ( जाणतो ) कर्मभिः ( कर्मांनीं ) न ( नाहीं ) सः ( तो ) बद्ध्यते ( बांधला जातो ).

मां कर्माणि न लिंपन्ति, मे कर्मफले स्पृहा न, इति यः मां अभिजानाति सः कर्मभिः न बद्धयते.

"कर्मे मला बाधूं शकत नाहींत, कर्मांपासून प्राप्त होणारे फलांविषयीं माझी आसक्ति नसते." याप्रमाणें ज्याला माझें ज्ञान होतें, त्याला कर्मे बांधूं शकत नाहींत ॥ १४ ॥

एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।
कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥

एवं ( याप्रमाणें ) ज्ञात्वा ( जाणून ) कृतं ( केलें ) कर्म [ कर्म ) पूर्वैः [ पूर्वींच्या लोकांनीं ] अपि [ सुद्धां ] मुमुक्षुभिः [ मोक्ष मिळण्याची इच्छा करणारांनीं ] कुरु [ कर ] कर्म [ कर्म ] एव [ देखील ] तस्मात् [ म्हणून ] त्वं [ तूं ] पूर्वैः ( पुराण काळच्या लोकांनीं ] पूर्वतरं [ पूर्व परंपरेप्रमाणें ] कृतं [ केलेलें ].

एवं ज्ञात्वा पूर्वैः मुमुक्षुभिः कर्मकृतं; तस्मात् त्वं अपि पूर्वैः पूर्वतरं कृतं कर्म एव कुरु.

याप्रमाणें समज घेऊन मोक्षाची इच्छा करणाऱ्या मागच्या लोकांनीं सुद्धां ( विहित ] कर्मांचें आचरण केलें आहे. याकरतां पूर्वींचे लोक पूर्व परंपरेप्रमाणें कर्म करीत आले, तसें तूंहि कर्मांचेंच आचरण कर ।। १५ ॥

किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।
तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १६ ॥

किं ( कोणतें ) कर्म ( कर्म ) किं (कोणतें) अकर्म ( अकर्म, कर्मशून्यता ) इति ( याप्रमाणें ) कवयः (कवी, विद्वान् लोक) अपि (सुद्धां) अत्र ( येथें ) मोहिताः ( गोंधळले आहेत ) तत् ( तें ) ते ( तुला ) कर्म ( कर्म ) प्रवक्ष्यामि ( उघड करून सांगतों ) यत् (जें) ज्ञात्वा ( जाणल्यानें ) मोक्ष्यसे ( तूं मुक्त होशील ) अशुभात् ( पापापासून ).

किं कर्म किं अकर्म इति अत्र कवयः अपि मोहिताः, तत् कर्म ते प्रवक्ष्यामि, यत् ज्ञात्वा अशुभात् मोक्ष्यसे.

कर्म कोणतें आणि अकर्म कोणतें यांविषयीं विद्वान् लोक देखील घोंटाळ्यांत पडले आहेत, तें कर्म मी तुला समजावून सांगतों. तें समजून घेतलेंस म्हणजे तूं पापापासून मुक्त होशील ॥ १६ ॥

**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।**
**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥**

कर्मणः ( कर्माला ) हि ( खरोखर ) अपि ( सुद्धां ) बोद्धव्यं ( समजलें पाहिजे ) बोद्धव्यं (समजलें पाहिजे) च (आणि) विकर्मणः ( विपरीत, म्हणजे वेदनिषिद्ध कर्माला ) अकर्मणः ( कर्माभावाला, कर्मशून्यतेला ) च ( आणि ) बोद्धव्यं ( समजलें पाहिजे ) गहना ( खोल, गूढ ) कर्मणः ( कर्माची ) गतिः ( मार्ग ).

हि कर्मणः बोद्धव्यं, विकर्मणः अपि च बोद्धव्यं, अकर्मणः च बोद्धव्यं; कर्मणः गतिः गहना ( अस्ति ).

कर्म ( वेदविहित कर्म ) विकर्म (वेदनिषिद्ध कर्म) आणि अकर्म ( कर्मशून्यता, कर्माचा अभाव ) यांचें यथार्थ ज्ञान समजून घेतलें पाहिजे; कारण कर्माचा मार्ग ( रहस्य ) समजण्याला फार कठीण आहे ॥ १७ ॥

**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।**
**स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ १८ ॥**

कर्मणि ( कर्मांत ) अकर्म ( कर्मशून्यता ) यः ( जो ) पश्येत् ( पहातो ) अकर्मणि ( अकर्मांत ) च ( आणि ) कर्म ( कर्म ) यः ( जो ) सः ( तो ) बुद्धिमान् ( शहाणा ) मनुष्येषु ( मनुष्यांत ) सः ( तो ) युक्तः ( मनाचा समतोलपणा राखणारा, स्थीर मनाचा ) कृत्स्नकर्मकृत् = कृत्स्नं कर्म करोति यः सः ( सर्व कर्म करतो तो ).

यः कर्मणि अकर्म पश्येत्, अकर्मणि च यः कर्म पश्येत्, सः मनुष्येषु बुद्धिमान्, सः युक्तः, सः कृत्स्नकर्मकृत्.

जो कर्मामध्यें ( सकामकर्मांमध्यें ) अकर्म ( कर्म नाहीं असें ) पाहतो आणि अकर्मामध्यें ( सकामकर्म न करण्यामध्यें ) कर्म ( कर्म आहे असें ) पाहतो तो मनुष्यांत बुद्धिमान्, तोच योगी आणि सर्व कर्मकर्ता होय ।१८।

**यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ।**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥ १९ ॥**

**यस्य** ( ज्याचे ) **सर्वे** (सर्व) **समारंभाः** (व्यापार, प्रयत्न, कर्मारंभ) **कामसंकल्पवर्जिताः**=कामैः च संकल्पैः च वर्जिताः (इच्छा आणि कल्पना यांनीं विरहित, म्हणजे ज्यांत फलांची इच्छा आणि कर्माचा अभिमान् हीं दोन्हींहि नाहींत ) **ज्ञानाग्निदग्धकर्माणं**=ज्ञानस्य अग्निना दग्धानि कर्माणि यस्य तं (ज्यांचीं कर्में ज्ञानाच्या अग्नीनें भस्म झालीं आहे ; त्याला) **तं** (त्याला) **आहुः** (म्हणतात) **पंडितं** (विद्वान्) **बुधाः** (शहाणे लोक).

यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः (संति) तं ज्ञानाग्निदग्धकर्माणं बुधाः पंडितं आहुः.

ज्याचे सर्व व्यापार ( प्रयत्न ) फलाशा आणि अभिमान ( अहंकार ) याव्यतिरिक्त होतात आणि ज्ञान हाच कोणी अग्नि त्यानें ज्यांचीं कर्में जळून जातात, त्याला शहाणे लोक पंडित ( विद्वान् ) असें म्हणतात ।। १९ ।।

**त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ।**
**कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः ॥ २० ॥**

**त्यक्त्वा** ( सोडून देऊन ) **कर्मफलासंगं**=कर्मणः फले आसंगं ( कर्माच्या फलाविषयीं आसक्ति ) **नित्यतृप्तः** (नेहमीं संतुष्ट) **निराश्रयः** ( अवलंबून न राहणारा, स्वतंत्र ) **कर्मणि** ( कर्मामध्यें ) **अभिप्रवृत्तः** ( गुंतलेला ) **अपि** ( सुद्धां ) **न** ( नाहीं ) **एव** ( केवळ ) **किंचित्** ( कांहीं एक ) **करोति** ( करतो ) **सः** ( तो ).

कर्मफलासंगं त्यक्त्वा ( यः ) नित्यतृप्तः निराश्रयः सः कर्मणि अभिप्रवृत्तः अपि न एव किंचित् करोति.

जो कर्मापासून प्राप्त होणारे फलाविषयीं इच्छा सोडून देऊन सदा संतुष्ट असून कोणावर अवलंबून राहत नाहीं, तो जरी कर्मांत गुंतलेला असला तरी तो कांहीं एक करीत नाहीं ( असेंच समजावयाचें ) ॥ २० ॥

**निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।**
**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ २१ ॥**

**निराशीः** = निर्गता आशिषो यस्मात् ( ज्याच्या सर्व इच्छा गेल्या आहेत, इच्छा न ठेवणारा ) **यतचित्तात्मा** = यतं चित्तं च आत्मा च यस्य सः (ज्याचें मन व शरीर हीं स्वाधीन आहेत तो)**त्यक्तसर्वपरिग्रहः** = त्यक्तः सर्वः परिग्रहो येन सः ( ज्यानें सर्व विषयभोगाचे पदार्थ सोडून दिले आहेत तो ) **शारीरं** ( शरिरासंबंधीं ) **केवलं** ( फक्त ) **कर्म** ( कर्म ) **कुर्वन्** (करणारा ) **न आप्नोति** (मिळवीत नाहीं) **किल्बिषम्** (पातक)

निराशीः यतचित्तात्मा, त्यक्तसर्वपरिग्रहः केवलं शारीरं कर्म कुर्वन् किल्बिषं न आप्नोति.

ज्यानें इच्छेचा त्याग केला आहे, मन व शरीर यांचें दमन केलें आहे ( हीं आपल्या स्वाधीन ठेवलीं आहेत ), सर्व विषयभोगाच्या वस्तूंचा ज्यानें त्याग केला आहे, त्यानें केवळ शरीररक्षणाकरतां कर्म केलें तर त्यांत त्याला पातक लागत नाहीं ॥ २१ ॥

**यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः ।**
**समः सिद्धावसिद्धौ च कृत्वाऽपि न निबद्ध्यते ॥२२॥**

**यदृच्छालाभसंतुष्टः** = यदृच्छया लाभेन संतुष्टः ( सहज रीतीनें मिळालेल्या पदार्थांत संतोष मानणारा ) **द्वंद्वातीतः** = द्वंद्वं अतीतः (शीत उष्ण, सुखदुःख वगैरे द्वंद्वें यांच्या पलीकडे गेलेला, द्वंद्वांस न जुमानणारा ) **विमत्सरः** ( मत्सर नाहीं असा ) **समः** ( सारखा ) **सिद्धौ** ( पूर्णत्वांत, सिद्धि झाल्यांत ) **असिद्धौ** ( पूर्णता न झाल्यांत, सिद्धि न झाल्यांत ) **च** ( आणि ) **कृत्वा** ( करून ) **अपि** ( सुद्धां ) **न निबद्ध्यते** ( बांधला जात नाहीं. )

यदृच्छालाभसंतुष्टः, द्वंद्वातीतः, विमत्सरः, सिद्धौ असिद्धौ च समः (सः) (कर्म) कृत्वा अपि न निबद्ध्यते.

सहज रीतीनें मिळेल त्या पदार्थांत संतोष मानणारा, सुखदुःख वगैरे द्वंद्वें यांस न जुमानणारा, कोणाचा मत्सर न करणारा, कार्यांत यश अगर अपयश हीं सारखीं मानणारा असा जो, त्यानें कर्म केलें तरी तो कर्मपाशांत सांपडत नाहीं ॥ २२ ॥

गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।
यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥

गतसंगस्य = गतः संगः यस्य तस्य (ज्याची विषयांविषयीं आसक्ति गेली आहे त्याचें) मुक्तस्य = अहंकारान्, कर्तृत्वाभिमानात् मुक्तः तस्य (मी कर्ता या देहबुद्धीपासून जो सुटलेला त्याचें) ज्ञानावस्थित-चेतसः = ज्ञाने अवस्थितं चेतः यस्य तस्य (ज्याचें मन ज्ञानांत स्थिर झालें आहे त्याचें) यज्ञाय (यज्ञाकरतां) आचरतः (करणाराचें) कर्म (कर्म) समग्रं (सर्व) प्रविलीयते (नाहींसें होतें.)

गतसंगस्य, मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः यज्ञाय कर्म आचरतः (तत्) समग्रं प्रविलीयते.

विषयांसंबंधीं ज्याची आसक्ति नाहींशी झाली आहे, मी कर्ता या देह-बुद्धीपासून जो सुटलेला, ज्याचें मन ज्ञानप्राप्तींत स्थिर झालें आहे आणि फक्त यज्ञासाठींच (वेदोक्त यज्ञासाठीं किंवा यज्ञपुरुष जो विष्णु त्यासाठीं) जो कर्म करीत असतो, त्याचें तें कर्म समग्र (कर्मवासना, कर्मफल यांसुद्धां) नाहींसें होतें ॥ २३ ॥

---

१ कर्म तीन प्रकारचें–संचित, क्रियमाण आणि प्रारब्ध. यांपैकीं प्रारब्ध जन्मतःच बरोबर आलेलें तें भोगानें (तो जन्म भोगून) जळतें म्हणजे नाहींसें होतें; व संचित आणि क्रियमाण यांबद्दल यथार्थदीपिकेंत पंडित म्हणतात "एवं संचित ज्ञानें जळे, क्रियमाण अकर्तात्मत्वें नातळे" या-प्रमाणें समग्र (तिन्ही प्रकारचें कर्म) नाहींसें होतें. याकरतां मुक्त याचा अर्थ कर्तृत्वाभिमानापासून सुटलेला असा करणें सयुक्तिक होतें.

ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।
ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ २४ ॥

ब्रह्म ( ब्रह्म ) अर्पणं ( देणेची क्रिया ) ब्रह्म (ब्रह्म) हविः (आहुति, यज्ञाग्नींत अर्पण करण्याचें द्रव्य ) ब्रह्माग्नौ = ब्रह्मणः अग्नौ ( ब्रह्माच्या अग्नींत ) ब्रह्मणा ( ब्रह्मानें ) हुतम् ( दिलेली आहे ) ब्रह्म ( ब्रह्मप्रत ) एव ( फक्त ) तेन ( त्यानें ) गंतव्यं ( जावयाचें ) ब्रह्मकर्मसमाधिना = ब्रह्म एव कर्म तस्मिन् समाधिः यस्य तेन ( ब्रह्म हेंच कोणी कर्म त्यांत ज्याची एकाग्रता त्यानें ).

ब्रह्म अर्पणं ब्रह्म हविः ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ( च ) ब्रह्मकर्म समाधिना तेन ब्रह्म एव गंतव्यं.

आहुति देणेची क्रिया ब्रह्म, आहुति ब्रह्म, अग्नि ब्रह्म आणि हवन करणाराही ब्रह्म; ब्रह्मचिंतनांत एकाग्रता हेंच ज्याचें कर्म त्याला ब्रह्मांतच जाऊन मिळावयाचें आहे ( ब्रह्मप्राप्तिच व्हावयाची ) ॥ २४ ॥

दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।
ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥

दैवं ( देवतासंबंधीं ) एव ( फक्त ) अपरे ( कांहीं ) यज्ञं ( यज्ञ ) योगिनः ( योगी ) पर्युपासते ( करतात ); ब्रह्माग्नौ = ब्रह्मणः अग्नौ ( ब्रह्म या अग्नींत ) अपरे ( दुसरे ) यज्ञं ( यज्ञ ) यज्ञेन (आत्मयज्ञानें) एव ( केवळ ) उपजुह्वति ( होम करतात ).

अपरे योगिनः दैवं एव यज्ञं पर्युपासते; अपरे यज्ञेन एव ब्रह्माग्नौ यज्ञं उपजुह्वति.

ज्यामध्यें देवतांचे ( इंद्र, अग्नि वगैरे देवता यांचे ) हविर्भाग दिले जातात असे देव-यज्ञ कांहीं योगी करतात; दुसरे योगी ब्रह्मरूपी अग्नींत आत्मयज्ञ करतात ( आत्म्याच्या सर्व उपाधींचा होम करतात ) ॥ २५ ॥

श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।

शब्दादीन्विषयानन्य इंद्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥

**श्रोत्रादीनि** = श्रोत्रं आदिः येषाम् तानि (कान हें इंद्रिय ज्यांत पहिलें आहे तीं = कान, डोळे, त्वचा, जिव्हा आणि नाक ) **इंद्रियाणि** (इंद्रियें) **अन्ये** ( दुसरे ) **संयमाग्निषु** = संयमस्य अग्निषु ( आत्मसंयमन हाच कोणी अग्नि त्यांत ) **जुह्वति** (होम करतात) **शब्दादीन्** = शब्दः आदिः येषां तान् ( ज्यांचा आरंभ शब्द ते = शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध ) **विषयान्** ( इंद्रियांचे विषय ) **अन्ये** ( दुसरे ) **इंद्रियाग्निषु** = इंद्रियाणां अग्निषु ( इंद्रियाच्या अग्नींमध्यें ) **जुह्वति** (होम करतात).

अन्ये श्रोत्रादीनि इंद्रियाणि संयमाग्निषु जुह्वति. अन्ये शब्दादीन् विषयान् इंद्रियाग्निषु जुह्वति.

कोणी आत्मसंयमनरूपीं अग्नींत कान इत्यादि इंद्रियांचा होम करतात (आत्मसंयमन करून इंद्रियें ताब्यांत ठेवतात); तर दुसरे कोणी पंचेंद्रियांचे अग्नींत शब्दादि विषयांचा होम करितात = शब्दादि विषयांस जाळून टाकतात ( ज्यांचीं इंद्रियें शब्दादि विषयांचे योगानें यत्किंचितहि विकार पावत नाहींत ) ॥ २६ ॥

**सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।**
**आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥**

**सर्वाणि** ( सर्व ) **इंद्रियकर्माणि** = इंद्रियाणां कर्माणि ( इंद्रियांचीं कर्में ) **प्राणकर्माणि** = प्राणस्य कर्माणि ( जीवनशक्तीचीं कर्में ) **च** ( आणि ) **अपरे** ( दुसरे ) **आत्मसंयमयोगाग्नौ** = आत्मनः संयम एव योगः तस्य अग्नौ ( स्वतःची आकलनशक्ति हाच कोणी योग त्या योगाच्या अग्नींत ) **जुह्वति** ( होम करतात ) **ज्ञानदीपिते** ( ज्ञानानें पेटविलेल्या ).

अपरे ज्ञानदीपिते आत्मसंयमयोगाग्नौ सर्वाणि इंद्रियकर्माणि प्राणकर्माणि च जुह्वति.

दुसरे, आत्मसंयमन हाच योगाग्नि तो ज्ञानानें प्रज्वलित करून त्यांत सर्व इंद्रियांच्या व प्राणाच्या कर्मांची आहुति देतात ( याला निर्विकल्प समाधियज्ञ म्हणावयाचें ) ॥ २७ ॥



**द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे**
**स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥**

**द्रव्ययज्ञाः** = द्रव्येण यज्ञः येषां ते (ज्यांचा यज्ञ पदार्थांनीं केला जातो ते) **तपोयज्ञाः** = तपः यज्ञः येषां ते (तप हाच ज्यांचा यज्ञ ते) **योगयज्ञाः** = योगः यज्ञः येषां ते ( योग हा ज्यांचा यज्ञ ते ) **तथा** ( तसें ) **अपरे** ( दुसरे ) **स्वाध्यायज्ञानयज्ञाः** = स्वाध्यायः च ज्ञानं च यज्ञः येषां ते ( आपला अभ्यास आणि ज्ञानप्राप्ति हीं ज्यांचा यज्ञ ते ) **च** ( आणि ) **यतयः** ( यति ) **संशितव्रताः** = संशितं व्रतं येषां ते ( ज्यांचें आचरण कडकडीत ते ),

अपरे द्रव्ययज्ञाः तपोयज्ञाः योगयज्ञाः तथा च स्वाध्यायज्ञानयज्ञाः (संति) संशितव्रताः यतयः ( संति ).

दुसरे द्रव्याचा यज्ञ करणारे ( म्हणजे पवित्र ठिकाणीं पवित्र कामाकरितां द्रव्य खर्च करणारे ) तपश्चर्या करणारे योगसाधन करणारे, तसेंच ऋग्वेदादि पवित्र ग्रंथांचें अध्ययन करणारे आणि अनेक शास्त्रांच्या अभ्यासानें ज्ञान मिळविणारे, हे सर्व अशा निरनिराळ्या प्रकारांनीं यज्ञ करणारेच होत. हे सर्व यति असून यांचें व्रत फार कडकडीत असतें ॥ २८ ॥

**अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथाऽपरे ।**
**प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥**

**अपाने** ( श्वास ओढून घेण्यांत ) **जुह्वति** ( होम करतात ) **प्राणं** ( श्वास सोडणें ) **प्राणे** ( श्वास सोडण्यांत ) **अपानं** (श्वास घेणें) **तथा** ( तसेंच ) **अपरे** ( दुसरे ) **प्राणापानगती** = प्राणस्य च अपानस्य च गती ( प्राण आणि अपान वायूंच्या दोन गती ) **रुद्ध्वा** ( बंद ठेवून ) **प्राणायामपरायणाः** = प्राणयामः परायणं येषां ते (प्राणायाम हा ज्यांचा शेवटचा आश्रय ते ).

तथा अपरे अपाने प्राणं जुह्वति, प्राणे अपानं ( जुह्वति ), प्राणापानगतीरुद्ध्वा प्राणायामपरायणाः ( संति ).

कांहीं ( योगी ) अपानवायूमध्यें प्राणवायू नेऊन सोडतात ( या करण्याला ‘ पूरक ’ म्हणतात ), प्राणवायूंत अपानवायु नेऊन सोडतात ( याला ‘ रेचक ’ म्हणतात ), प्राण आणि अपान यांच्या दोन्ही गतींचा

निरोध ( याला 'कुंभक' म्हणतात ) करून प्राणायाम करण्यांत निमग्न असतात ॥ २९ ॥

**अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति ।**
**सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥**

**अपरे** (दुसरे) **नियताहाराः** = नियतः आहारः येषां ते ( ज्यांचा आहार नियमित ते ) **प्राणान्** (प्राणवायु) **प्राणेषु** (प्राणवायूंत) **जुह्वति** ( होम करतात ) **सर्वे** ( सर्व ) **अपि** ( सुद्धां ) **एते** ( हे ) **यज्ञविदः** ( यज्ञ जाणणारे ) **यज्ञक्षपितकल्मषाः** = यज्ञेन क्षपितः कल्मषः येषां ते ( ज्यांचीं पातकें यज्ञ केल्यामुळें नाहींशीं झालीं ते ).

अपरे नियताहाराः प्राणेषु प्राणान् जुह्वति. एते सर्वे अपि यज्ञविदः यज्ञक्षपितकल्मषाः ( संति ).

आणखी दुसरे, आहार नियमित करून प्राणवायूंमध्येंच प्राणवायूंचा होम करतात; हे सर्व यज्ञांचें रहस्य जाणणारे यज्ञानें पातकांचा नाश करून टाकतात ॥ ३० ॥

**यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम् ।**
**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥ ३१ ॥**

**यज्ञशिष्टामृतभुजः** = यज्ञस्य शिष्टं अमृतं भुजंति ये ते ( जे यज्ञांतील राहिलेला अमृतरूपी भाग सेवन करतात ते ) **यांति** ( जातात ) **ब्रह्म** ( ब्रह्माला ) **सनातनं** (सदैव राहणारें) **न** ( नाहीं ) **अयं** (हा) **लोकः** ( लोक ) **अस्ति** ( आहे ) **अयज्ञस्य** ( यज्ञ न करणाराचा ) **कुतः** ( कोठून ) **अन्यः** ( दुसरा ) **कुरुसत्तम** ( कुरुकुलश्रेष्ठा अर्जुना ).

कुरुसत्तम, यज्ञशिष्टामृतभुजः सनातन ब्रह्म यांति. अयज्ञस्य अयं लोकः न अस्ति. कुतः अन्यः ?

हे कुरुकुलश्रेष्ठा, अर्जुना ! यज्ञांतील राहिलेला अमृततुल्य भाग जे सेवन करतात ते अक्षय ब्रह्म प्राप्त करून घेतात. जे मुळीं यज्ञच करीत नाहींत त्यांना हा लोक ( मृत्युलोक ) साध्य होत नाहीं, मग इतर लोकांविषयीं गोष्ट कशाला पाहिजे ? ॥ ३१ ॥

**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।**
**कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥३२॥**

**एवं** ( याप्रमाणें ) **बहुविधाः** ( अनेक प्रकारचे ) **यज्ञाः** ( यज्ञ ) **वितताः** ( पसरले आहेत ) **ब्रह्मणः** (ब्रह्माच्या, वेदाच्या) **मुखे** (मुखांत) **कर्मजान्** ( कर्मांपासून उत्पन्न झालेले ) **विद्धि** (समज) **तान्** (त्यांना) **सर्वान्** ( सर्व ) **एवं** (याप्रमाणें) **ज्ञात्वा** (समजून घेऊन) **विमोक्ष्यसे** ( तूं सुटून जाशील ).

एवं बहुविधाः यज्ञाः ब्रह्मणः मुखे वितताः ( संति ); तान् सर्वान् कर्मजान् विद्धि; एवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे.

याप्रमाणें अनेक प्रकारचे यज्ञ वेदांमध्यें विस्तारानें सांगितले आहेत; हे सर्व यज्ञ कर्मांपासून उत्पन्न झाले आहेत असें समजून घे; यांचें ज्ञान झालें म्हणजे तूं (कर्मबंधनापासून) सुटशील ॥ ३२ ॥

**श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।**
**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥**

**श्रेयान्** ( अधिक चांगलें ) **द्रव्यमयात्** (पदार्थांच्या) **यज्ञात्** (यज्ञापेक्षां ) **ज्ञानयज्ञः** = ज्ञानस्य यज्ञः ( ज्ञानाचा यज्ञ ) **परंतप** ( अर्जुना ) **सर्वं** ( सर्व ) **कर्म** ( कर्म ) **अखिलं** ( निःशेष ) **पार्थ** (अर्जुन **ज्ञाने** ( ज्ञानांत ) **परिसमाप्यते** ( संपलें जातें ).

परंतप द्रव्यमयात् यज्ञात् ज्ञानयज्ञः श्रेयान्; पार्थ सर्वं अखिलं कर्म ज्ञाने परिसमाप्यते.

अर्जुना, द्रव्याच्या ( पदार्थांच्या ) सहाय्यानें सिद्ध होणाऱ्या यज्ञापेक्षां ज्ञानरूपी यज्ञ श्रेष्ठ आहे, ज्ञानांत (ज्ञान प्राप्त झालें म्हणजे त्यांत) सर्व कर्मांचा समावेश होतो ॥ ३३ ॥

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्वदर्शिनः ॥ ३४ ॥**

**तत्** ( तें )**विद्धि** (जाण) **प्रणिपातेन** (नमस्कार करून, नम्र होऊन) **परिप्रश्नेन** ( प्रश्न करून, शंका विचारून ) **सेवया** ( सेवा करून )

**उपदेक्ष्यन्ति** ( शिकवितील ) **ते** ( तुला ) **ज्ञानं** ( ज्ञान ) **ज्ञानिनः** ( ज्ञानी पुरुष ) **तत्वदर्शिनः** ( तत्व पहाणारे, ब्रह्मस्वरूप जाणणारे ).

प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया तत् ( ज्ञानं ) विद्धि, तत्वदर्शिनः ज्ञानिनः ते ज्ञानं उपदेक्ष्यन्ति.

नम्र होऊन ( शिष्यवृत्ति पतकरून ) योग्य प्रश्न विचारून, सेवा करून तें ज्ञान समजून घे; ज्यांस ब्रह्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान झालें आहे असे ज्ञानी पुरुष तुला ज्ञान समजावून देतील ॥ ३४ ॥

**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव ।**
**येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ३५ ॥**

**यत्** ( जें ) **ज्ञात्वा** ( जाणल्यानंतर ) **न** ( नाहीं ) **पुनः** ( पुनः ) **मोहं** ( भ्रम, भ्रांति ) **एवं** ( याप्रमाणें ) **यास्यसि** (जाणार) **पांडव** ( अर्जुना ) **येन** ( ज्यानें ) **भूतानि** ( प्राणिमात्र ) **अशेषेण** (निःशेष; सर्व) **द्रक्ष्यसि** (पहाशील) **आत्मनि** (आत्मस्वरूपांत ) **अथो** (म्हणजे) **मयि** ( माझ्यांत ).

पांडव यत् ज्ञात्वा पुनः एवं मोहं न यास्यसि, येन भूतानि अशेषेण आत्मनि अथो मयि द्रक्ष्यसि.

अर्जुना ! तें ( ज्ञान ) समजल्यावर असा तूं भ्रमांत पडणार नाहींस, याच्या ( या ज्ञानाच्या ) योगानें तूं सर्व भूतमात्र आत्मस्वरूपांत म्हणजे माझ्या ठिकाणीं पाहशील ॥ ३५ ॥

**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।**
**सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ३६ ॥**

**अपि** ( देखील ) **चेत्** ( जरी ) **असि** ( तूं आहेस ) **पापेभ्यः** ( पाप्यांपेक्षां ) **सर्वेभ्यः** ( सर्वांपेक्षां ) **पापकृत्तमः** (फार पाप करणारा) **सर्वं** ( सर्व ) **ज्ञानप्लवेन** = ज्ञानस्य प्लवेन ( ज्ञानाच्या नौकेनें ) **एव** ( फक्त ) **वृजिनं** ( पातक ) **संतरिष्यसि** ( पार तरून जाशील ).

सर्वेभ्यः पापेभ्यः अपि पापकृत्तमः असि चेत् सर्वं वृजिनं ज्ञानप्लवेन एव संतरिष्यसि.

सर्व पापी लोकांपेक्षां फार पाप करणारा जरी तूं असलास तरी ज्ञानरूप नौकेनें तो पापसमुद्र तूं तरून जाशील ॥ ३६ ॥

**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ।**
**ज्ञानाग्निः सर्व कर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ३७ ॥**

**यथा** ( ज्याप्रमाणें )**एधांसि** ( लांकडें ) **समिद्धः** ( पेटलेल्या ) **अग्निः** ( विस्तव ) **भस्मसात्** ( राख ) **कुरुते** ( करतो ) **अर्जुन** ( अर्जुना ) **ज्ञानाग्निः** = ज्ञानमेव अग्निः ( ज्ञान हाच कोणी अग्नि ) **सर्व-कर्माणि** ( सर्व कर्मे ) **भस्मसात्** ( राख ) **कुरुते** ( करतो ) **तथा** ( त्याप्रमाणें ).

अर्जुन, यथा समिद्धः अग्निः एधांसि भस्मसात् कुरुते, तथा ज्ञानाग्निः सर्व कर्माणि भस्मसात् कुरुते.

अर्जुना, ज्याप्रमाणें पेटलेला अग्नि लांकडांची राख करून टाकतो त्याप्रमाणें ज्ञानरूपी अग्नि सर्व कर्में ( कर्मबंधनें ) भस्म करून टाकतो ॥ ३७ ॥

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।**
**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥ ३८ ॥**

**न** ( नाहीं ) **हि** ( खरोखर ) **ज्ञानेन** ( ज्ञानानें ) **सदृशं** (सारखें) **पवित्रं** ( शुद्ध करणारें ) **इह** ( येथें ) **विद्यते** ( आहे ) **तत्** ( तें ) **स्वयं** ( स्वतः ) **योगसंसिद्धः** = योगे संसिद्धः (योगांत पूर्णतेस आलेला) **कालेन** ( कांहीं कालानंतर ) **आत्मनि** ( आत्मस्वरूपांत ) **विंदति** ( मिळवितो, प्राप्त करून घेतो ).

हि ज्ञानेन सदृशं इह पवित्रं न विद्यते; योगसंसिद्धः स्वयं तत् ( ज्ञानं ) कालेन आत्मनि विंदति.

या लोकीं ज्ञानासारखें पवित्र करणारें दुसरें कांहीं नाहीं. तें ज्ञान ज्याला योगसिद्धि झाली तो योग्य कालानंतर आपल्या आत्मस्वरूपींच प्राप्त करून घेतो ॥ ३८ ॥

**श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ।**

**ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९ ॥**

**श्रद्धावान्** ( ज्याच्या अंतःकरणांत भक्ति आहे तो, भाविक ) **लभते** ( मिळवितो ) **ज्ञानं** ( ज्ञान ) **तत्परः** = तस्मिन् ( ज्ञाने ) परः ( परायणः ) ( त्याकरतां म्हणजे ज्ञानाकरतां झटणारा ) **संयतेंद्रियः** = संयतानि इंद्रियाणि येन सः ( ज्यानें इंद्रियें ताब्यांत ठेवलीं तो ) **ज्ञानं** (ज्ञान) **लब्ध्वा** ( मिळवून ) **परां** ( उत्तम, श्रेष्ठ ) **शांतिं** ( शांतीला ) **अचिरेण** ( उशीर न लागतां ) **अधिगच्छति** ( जातो ).

श्रद्धावान् तत्परः, संयतेंद्रियः ( च ) ज्ञानं लभते; ज्ञानं लब्ध्वा अचिरेण परां शांतिं अधिगच्छति.

इंद्रियें स्वाधीन ठेऊन श्रद्धापूर्वक ज्ञानाकरतां झटणाऱ्या मनुष्याला ज्ञान प्राप्त करून घेतां येतें आणि ज्ञान झाल्यानंतर लागलींच त्याला उत्तम समाधानस्थिति प्राप्त होते ॥ ३९ ॥

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४० ॥**

**अज्ञः** ( अजाण, अज्ञानी ) **च** ( आणि ) **अश्रद्दधानः** ( अविश्वासी, श्रद्धा न ठेवणारा ) **च** ( आणि ) **संशयात्मा** = संशये आत्मा यस्य सः ( ज्याचें अंतःकरण संशयमग्न तो ) **विनश्यति** ( नाश पावतो ) **न** ( नाहीं ) **अयं** ( हा ) **लोकः** ( लोक ) **अस्ति** ( आहे ) **न** ( नाहीं ) **परः** ( श्रेष्ठ ) **न** ( नाहीं ) **सुखं** ( सुख ) **संशयात्मनः** ( ज्याच्या अंतःकरणांत संशय आहे त्याला ).

अज्ञः च अश्रद्दधानः च संशयात्मा विनश्यति; संशयात्मनः अयं लोकः न अस्ति, परः न, सुखं न ( च अस्ति ).

अज्ञानी, श्रद्धाहीन आणि मनाचा संशयी असा पुरुष नाश पावतो. त्या संशयी पुरुषाला इहलोक नाहीं, परलोक नाहीं आणि सुखहि मिळत नाहीं ॥ ४० ॥

**योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ।**

**आत्मवंतं न कर्माणि निबध्नंति धनंजय ॥ ४१ ॥**

**योगसंन्यस्तकर्माणं** = योगेन संन्यस्तं कर्म यस्य तं ( ज्याचें योगसाधनानें फलाशारहित कर्म आहे त्याला ) **ज्ञानसंछिन्नसंशयम्** = ज्ञानेन संछिन्नः संशयः यस्य तं ( ज्ञानानें ज्याचा संशय नाहींसा झाला आहे त्याला ) **आत्मवंतं** ( आत्मस्वरूपाची ओळख झाली आहे त्याला ) **न** ( नाहीं ) **कर्माणि** ( कर्में ) **निबध्नांति** ( बांधतात ) **धनंजय** ( अर्जुना ).

ध नंजय, योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् आत्मवंतं कर्माणि न निबध्नंति.

अर्जुना, योगसाधनानें ज्याचीं सर्व कर्में फलाशारहित ईश्वरार्पण केलेलीं असतात, ज्ञानाच्या योगानें ज्याचा सर्व संशय गेला आहे, आत्मस्वरूपाची ज्याला ओळख झाली आहे, अशा पुरुषानें केलेलीं कर्में त्याला बद्धक होत नाहींत ॥ ४१ ॥

**तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।**
**छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥**

**तस्मात्** ( म्हणून ) **अज्ञानसंभूतं** = अज्ञानात् संभूतं ( अज्ञानापासून उत्पन्न झालेला ) **हृत्स्थं** = हृदि स्थितं ( हृदयांत बसलेला ) **ज्ञानासिना** = ज्ञानस्य असिना ( ज्ञानाच्या तरवारीनें ) **आत्मनः** ( आत्म्याविषयीं ) **छित्वा** ( तोडून ) **एनं** ( हा ) **संशयं** ( संशय ) **योगं** ( योग ) **आतिष्ठ** ( अभ्यास कर ) **उत्तिष्ठ** ( ऊठ ) **भारत** ( अर्जुना. )

तस्मात् अज्ञानसंभूतं हृत्स्थं आत्मनः, एवं संशयं ज्ञानासिना छित्वा योगं आतिष्ठ; भारत ! उत्तिष्ठ.

म्हणून अज्ञानापासून उत्पन्न झालेला आत्मस्वरूपाविषयींचा मनांत असलेला संशय ज्ञान–खड्गानें तोडून टाकून योगाचें ( कर्मयोगाचें ) आचरण कर. हे भरतकुलश्रेष्ठा अर्जुना ! ( युद्धाकरतां ) ऊठ ॥ ४२ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासू० ब्र० श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञान-कर्म-सन्यास-योगो नाम चतुर्थोऽध्यायः



———

# अध्याय पांचवा.

अर्जुन उवाच—संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।
यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥१॥

**संन्यासं** ( त्याग ) **कर्मणां** ( कर्मांचा ) **कृष्ण** ( हे कृष्णा ) **पुनः** ( पुनः ) **योगं** ( योग, कर्मयोग ) **च** ( आणि ) **शंससि** ( प्रशंसा करतांस ) **यत्** ( जें ) **श्रेयः** ( अधिक चांगलें ) **एतयोः** (या दोहोंपैकीं) **एकं** ( एक ) **तत्** ( तें ) **मे** ( मला ) **ब्रूहि** ( सांग ) **सुनिश्चितं** ( चांगला निश्चय करून ).

कृष्ण, कर्मणां संन्यासं पुनः योगं च शंससि; एतयोः यत् एकं श्रेयः तत् मे सुनिश्चितं ब्रूहि.

अहो कृष्ण, आपण कर्मसंन्यासाची प्रशंसा करतां आणि पुनः कर्मयोगाची प्रशंसा करतां; तर या दोहोंपैकीं अधिक चांगला कोणता तें मला निश्चितपणें एकच सांगा ॥ १ ॥

श्रीभगवानुवाच—संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।
तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥२॥

**संन्यासः** ( त्याग ) **कर्मयोगः** ( कर्मयोग ) **च** ( आणि ) **निःश्रेयसकरौ** ( मोक्ष देणारे, मुक्ति देणारे ) **उभौ** ( दोन्ही ) **तयोः** ( त्या दोहोंत ) **तु** ( खरोखर ) **कर्मसंन्यासात्** = कर्मणः संन्यासात् ( कर्मसंन्यासापेक्षां ) **कर्मयोगः** ( कर्मयोग ) **विशिष्यते** ( अधिक चांगला आहे ).

संन्यासः कर्मयोगः च उभौ निःश्रेयसकरौ; तयोः तु कर्मसंन्यासात् कर्मयोगः विशिष्यते.

श्रीभगवान् म्हणाले:—कर्मसंन्यास आणि कर्मयोग हे दोन्हीहि मार्ग मुक्ति देणारे आहेत; परंतु या दोहोंमध्यें कर्मयोग जास्त चांगला आहे ॥२॥

**ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति ।**
**निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ॥ ३ ॥**

**ज्ञेयः** ( समजावा ) **सः** ( तो ) **नित्यसंन्यासी** ( 'नित्यसंन्यासी') **यः** ( जो ) **न द्वेष्टि** ( द्वेष करीत नाहीं ) **न कांक्षति** ( इच्छा करीत नाहीं ) **निर्द्वंद्वः** ( द्वंद्वांपासून दूर असलेला, शीत-उष्ण, सुख-दुःख वगैरे द्वंद्वांकडे दुर्लक्ष करणारा ) **हि** ( खरोखर ) **महाबाहो** ( अर्जुना ) **सुखं** ( अनायासें, सहज ) **बंधात्** ( बंधापासून ) **प्रमुच्यते** ( सुटतो ).

यः न द्वेष्टि न कांक्षति, सः नित्यसंन्यासी ज्ञेयः; महाबाहो, हि निर्द्वंद्वः ( सः ) सुखं बंधात् प्रमुच्यते.

आजानुबाहो अर्जुना, जो कोणाचा द्वेष करीत नाहीं, ज्याला कसलाहि लोभ नाहीं त्याला ' नित्य संन्यासी ' समजावा; तो द्वंद्वरहित ( सुख-दुःख वगैरे द्वंद्वांची ज्यास परवा नाहीं असा ) होऊन ( संसार ) बंधनापासून अनायासें सुटून जातो ॥ ३ ॥

**सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदन्ति न पंडिताः ।**
**एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम् ॥ ४ ॥**

**सांख्ययोगौ** = सांख्यः च योगः च ( सांख्य आणि योग ) **पृथक्** ( निराळे ) **बालाः** ( मुलें, अज्ञ मनुष्यें ) **प्रवदन्ति** ( म्हणतात ) **न** ( नाहीं ) **पंडिताः** ( विद्वान् लोक ) **एकं** ( एक ) **अपि** ( सुद्धां ) **आस्थितः** ( आंत राहिलेला ) **सम्यक्** ( चांगल्या रीतीनें ) **उभयोः** ( दोहोंचें ) **विंदते** ( मिळवितो ) **फलं** ( फळ ).

सांख्ययोगौ पृथक् ( इति ) बालाः प्रवदंति; न पंडिताः; एकं अपि सम्यक् आस्थितः उभयोः फलं विंदते.

सांख्य ( ज्ञानमार्ग ) आणि योग ( कर्मयोग ) हे दोन वेगळे आहेत असें अज्ञ मनुष्यें म्हणतात; शहाणे ( ज्ञानी ) तसें समजत नाहींत. या दोहोंपैकीं कोणत्याहि एका मार्गाचें चांगल्या रीतीनें अनुष्ठान केलें असतां उभयमार्गाचें फल ( मोक्ष ) मिळतें ॥ ४ ॥

यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ।
एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥ ५ ॥

यत् ( जें ) सांख्यैः ( सांख्यांनीं ) प्राप्यते ( मिळविलें जातें ) स्थानं ( पद ) तत् ( तें ) योगैः ( योगी लोकांनीं ) अपि ( सुद्धां ) गम्यते ( मिळवितां येतें ) एकं ( एक ) सांख्यं ( ज्ञानमार्ग ) च ( आणि ) योगं ( कर्मयोग ) च (आणि) यः (जो) पश्यति ( पहातो) सः ( तो ) पश्यति ( पाहतो ).

ज्ञानी लोकांना जें पद प्राप्त होतें तेंच पद योग्यांनाहि मिळतें; जो सांख्य ( ज्ञानमार्ग ) आणि योग ( कर्ममार्ग ) हे दोन्हीहि एक आहेत असें जाणतो, तोच खऱ्या रीतीनें पहातो ( तोच ज्ञानी होय ) ॥ ५ ॥

संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।
योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥ ६ ॥

संन्यासः ( संन्यास ) तु ( खरोखर ) महाबाहो ( अर्जुना ) दुःखं ( दुःख ) आप्तुं ( मिळविण्याला ) अयोगतः ( योगाशिवाय ) योगयुक्तः = योगेन युक्तः ( योगाशीं संलग्न ) मुनिः ( ऋषि ) ब्रह्म ( ब्रम्हपदाला ) न चिरेण ( उशीर न लागतां, लागलींच ) अधिगच्छति ( जातो ).

महाबाहो, तु अयोगतः संन्यासः आप्तुं दुःखम्; योगयुक्तः मुनिः न चिरेण ब्रह्म अधिगच्छति.

अर्जुना, योगाभ्यासाशिवाय संन्यास साध्य होणें कठीण पडतें ( क्लेशदायक होतें ); योगाभ्यासी मुनि त्वरित ब्रह्मपदाला जातो ॥ ६ ॥

योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः ।
सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७ ॥

योगयुक्तः ( योगाशीं संलग्न, योगाभ्यासी ) विशुद्धात्मा = विशुद्धः आत्मा यस्य सः ( ज्याचें अंतःकरण निर्मळ तो ) विजितात्मा ( आत्मसंयमी ) जितेंद्रियः = जितानि इंद्रियाणि येन सः ( ज्यानें इंद्रियें जिंकलीं तो ) सर्वभूतात्मभूतात्मा = सर्वेषां भूतानां आत्मा भूतः यस्य सः (सर्व

भूतमात्रांचा आत्मा तोच ज्याचा आत्मा झाला आहे असा जो तो ) **कुर्वन्** ( कर्म करीत असतां ) **अपि** ( सुद्धां ) **न लिप्यते** ( लिंपला जात नाहीं, लिप्त होत नाहीं. ).

योगयुक्तः, विशुद्धात्मा, विजितात्मा जितेंद्रियः सर्वभूतात्मभूतात्मा ( च ) कुर्वन् अपि न लिप्यते.

जो योगाभ्यासी, ज्याचें अंतःकरण ( शुद्ध ) निर्मळ झालेलें, जो आत्मसंयमी, ज्यानें इंद्रियें जिंकलीं आहेत ( स्वाधीन ठेवलीं आहेत ) सर्व भूतमात्रांच्या जिवांशीं ज्याचें ऐक्य झालें आहे, त्यानें कर्मे केलीं तरी तीं त्याला बाधक होत नाहींत ( कर्मबंधनापासून तो अलिप्त राहतो ) ॥ ७ ॥

**नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्ववित् ।**
**पश्यन्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपन्श्वसन् ॥ ८ ॥**

**न** ( नाहीं ) **एव** ( केवळ ) **किंचित्** ( कांहीं ) **करोमि** ( मी करतों ) **इति** ( याप्रमाणें ) **युक्तः** ( आत्मनिष्ठ योगी ) **मन्येत** ( समजावें ) **तत्त्ववित्** ( तत्व जाणणारा, खरें स्वरूप जाणणारा ) **पश्यन्** ( पाहात असतां ) **शृण्वन्** ( ऐकत असतां ) **स्पृशन्** ( स्पर्श करीत असतां ) **जिघ्रन्** ( वास घेत असतां ) **अश्नन्** ( खात असतां ) **गच्छन्** ( जात असतां ) **स्वपन्** ( झोंप घेत असतां ) **श्वसन्** ( श्वासोश्वास घेत असतां ).

न एव किंचित् करोमि इति तत्त्ववित् युक्तः मन्येत; पश्यन्, शृण्वन्, स्पृशन्, जिघ्रन्, अश्नन्, गच्छन्, स्वपन्, श्वसन्.

ज्ञानाचें तत्व ( खरें स्वरूप ) जाणणाऱ्या आत्मनिष्ठ योग्यानें 'मी कांहीं करीत नाहीं' असें समजावें; ऐकणें, पहाणें, स्पर्श करणें, वास घेणें, खाणें, जाणें, झोंप घेणें, श्वाछोच्छवास करणें ( संबंध पुढें आहे ).

**प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि ।**
**इन्द्रियाणीन्द्रियार्थेषु वर्तंत इति धारयन् ॥ ९ ॥**

**प्रलपन्** ( बोलत असतां ) **विसृजन्** ( देत असतां ) **गृह्णन्** ( घेत असतां) **उन्मिषन्** ( डोळे उघडीत असतां ) **निमिषन्** ( डोळे मिटीत

असतां ) अपि ( सुद्धां ) इंद्रियाणि ( इंद्रियें ) इंद्रियार्थेषु = इंद्रियाणां अर्थेषु ( इंद्रियांच्या विषयांत ) वर्तंते ( वावरत असतात ) इति ( याप्रमाणें ) धारयन् ( खात्रीपूर्वक जाणून ).

प्रलपन्, विसृजन्, गृह्णन्, उन्मिषन्, निमिषन्, अपि इंद्रियाणि इंद्रियार्थेषु वर्तंते इति धारयन् ( अहं किंचित् एव न करोमि इति मन्येत ).

बोलणें, देणें, घेणें, डोळे उघडणें, मिटणें वगैरे सर्व क्रिया इंद्रियें आपापल्या विषयांशीं सहज रीतीनें वावरत असल्यानें होत आहेत असें खात्रीपूर्वक जाणून ( आपण स्वतः कांहींच करीत नाहीं असें समजावें. ) ॥९॥

**ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ।**
**लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ॥ १० ॥**

**ब्रह्मणि** ( ब्रह्मांत ) **आधाय** ( ठेवून, अर्पण करून ) **कर्माणि** ( कर्में ) **संगं** ( आसक्ति ) **त्यक्त्वा** ( सोडून देऊन ) **करोति** ( करतो ) **यः** ( जो ) **लिप्यते** ( लिप्त होतो ) **न** ( नाहीं ) **सः** ( तो ) **पापेन** ( पापानें ) **पद्मपत्रं** = पद्मस्य पत्रं ( कमळाचें पान ) **इव** ( सारखें ) **अंभसा** ( पाण्यानें ).

यः संगं त्यक्त्वा कर्माणि ब्रह्मणि आधाय करोति, सः पद्मपत्रं अंभसा इव पापेन न लिप्यते.

जो आसक्ति सोडून ( फलाची आशा सोडून ) कर्में ब्रह्मांत ठेवून ( केलेलीं कर्में ब्रह्मार्पण करून ) कर्में करतो तो ज्याप्रमाणें कमळाच्या पानावर पाणी राहत नाहीं त्याप्रमाणें पापानें लिप्त होत नाहीं ॥ १० ॥

**कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिंद्रियैरपि ।**
**योगिनः कर्म कुर्वंति संगं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये ॥ ११ ॥**

**कायेन** ( शरीरानें ) **मनसा** ( मनानें ) **बुध्द्या** ( बुद्धीनें ) **केवलैः** ( फक्त ) **इंद्रियैः** ( इंद्रियांनीं ) **अपि** ( सुद्धां ) **योगिनः** ( योगी ) **कर्म** ( कर्म ) **कुर्वंति** ( करतात ) **संगं** ( आसक्ति ) **त्यक्त्वा** ( सोडून ) **आत्मशुद्धये** = आत्मनः शुद्धये ( अंतःकरणाची शुद्धि करण्याकरितां ).

योगिनः आत्मशुद्धये संगं त्यक्त्वा कायेन, मनसा, बुद्ध्या केवलैः इंद्रियैः अपि कर्म कुर्वंति.

योगी अंतःकरणाची शुद्धि करण्याकरतां (कर्मफलावरील) आसक्ति सोडून केवळ शरीर, मन, बुद्धि व इंद्रियें यांनीं कर्म करतात ॥ ११ ॥

**युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शांतिमाप्नोति नैष्ठिकीम् ।**
**अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते ॥ १२ ॥**

**युक्तः** (योगयुक्त पुरुष) **कर्मफलं** = कर्मणः फलं (कर्मांचें फल) **त्यक्त्वा** (सोडून देउन) **शांतिं** (शांतिसुख) **आप्नोति** (मिळवितो) **नैष्ठिकीम्** (पूर्ण, उत्तम) **अयुक्तः** (अस्थिर बुद्धीचा मनुष्य) **कामकारेण** = कामस्य कारेण (इच्छेच्या बळानें, इच्छा अनावर होऊन) **फले** (फळांत) **सक्तः** (अनुरक्त होऊन) **निबध्यते** (बांधला जातो)

युक्तः कर्मफलं त्यक्त्वा नैष्ठिकीम् शांतिं आप्नोति; अयुक्तः फले सक्तः कामकारेण निबध्यते.

योगयुक्त पुरुष कर्मफलाची आशा सोडून देऊन पूर्ण शांतिसुख मिळवितो; अस्थिर बुद्धीचा मनुष्य वासनेच्या प्राबल्यानें कर्मफलाविषयीं आसक्त होऊन राहिल्यामुळें बद्ध होतो (फलभोगाच्या फेऱ्यांत सांपडतो) ॥१२॥

**सर्व-कर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी ।**
**नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥**

**सर्वकर्माणि** (सर्व कर्में) **मनसा** (मनानें) **संन्यस्य** (सोडून देऊन) **आस्ते** (बसतो) **सुखं** (सुखानें) **वशी** (आत्मसंयमी) **नवद्वारे** = नवद्वाराणि यस्य तस्मिन् (नऊ दरवाजे आहेत अशा) **पुरे** (नगरांत) **देही** (धारण करणारा) **न** (नाहीं) **एव** (केवळ) **कुर्वन्** (करून) **न** (नाहीं) **कारयन्** (करवितां).

सर्वकर्माणि मनसा संन्यस्य वशी देही नवद्वारे पुरे न एव कुर्वन् न कारयन् सुखं आस्ते.

मनानें सर्व कर्में सोडून आत्मसंयमी देहधारी पुरुष ज्याला नऊ दरवाजे आहेत अशा नगरांत (शरीरांत) कांहीं कर्म न करतां व न करवितां सुखानें राहतो ॥ १३ ॥

न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।
न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ १४ ॥

न ( नाहीं ) कर्तृत्वं ( कर्तेपणा ) न ( नाहीं ) कर्माणि ( कर्मे ) लोकस्य ( लोकांचा, जनांचा ) सृजति (उत्पन्न करतो) प्रभुः (ईश्वर) न ( नाहीं ) कर्मफलसंयोगं = कर्मणः च फलस्य च संयोगं ( कर्म आणि फल यांची सांगड ) स्वभावः ( सहज गुण, प्रकृति गुण ) तु ( खरोखर ) प्रवर्तते ( उघड होतो ).

प्रभुः लोकस्य कर्तृत्वं न सृजति, कर्माणि न ( सृजति ), न कर्मफलसंयोगं ( सृजति ), तु स्वभावः प्रवर्तते.

परमेश्वर लोकांचा कर्तेपणा, कर्मे किंवा कर्म आणि फल यांचा संबंध, यांपैकीं कोणतेंहि उत्पन्न करीत नाहीं; प्रकृतिगुणांनीं हीं उत्पन्न होतात ।१४।

नादत्ते कस्य चित्पापं न चैव सुकृतं विभुः ।
अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति जंतवः ॥ १५ ॥

न आदत्ते ( घेत नाहीं ) कस्यचित् ( कोणाचें ) पापं ( पाप ) न ( नाहीं ) च ( आणि ) एव ( देखील ) सुकृतं ( पुण्य ) विभुः ( ईश्वर )अज्ञानेन ( अज्ञानानें ) आवृतं ( झांकलेलें ) ज्ञानं ( ज्ञान ) तेन ( त्यामुळें ) मुह्यंति ( फसले जातात ) जंतवः ( जीव ).

विभुः कस्यचित् पापं न आदत्ते, सुकृतं न च एव; ज्ञानं अज्ञानेन आवृतं, तेन जंतवः मुह्यंति.

परमेश्वर कोणत्याहि पुरुषाच्या पापकर्मांचा अथवा पुण्यकर्मांचा स्वीकार करीत नाहीं; अज्ञानानें ज्ञान गुरफुटून गेल्यामुळें जीव मोहानें फसले जातात ॥ १५ ॥

ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।
तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ १६ ॥

ज्ञानेन ( ज्ञानानें ) तु ( परंतु ) तत् ( तें ) अज्ञानं ( अज्ञान ) येषां ( ज्यांचें ) नाशितं ( नाश पावलें आहे ) आत्मनः ( आत्मस्वरू-

पाच्या ) तेषां ( त्यांचें ) आदित्यवत् ( सूर्यासारखें ) ज्ञानं ( ज्ञान ) प्रकाशयति ( उजेड पाडतें ) तत्परं ( अत्यंत श्रेष्ठ तें ).

येषां तु तत् अज्ञानं आत्मनः ज्ञानेन नाशितं, तेषां आदित्यवत् तत् ज्ञानं प्रकाशयति.

परंतु ज्याचें अज्ञान आत्म्याच्या ज्ञानानें नाहींसें झालें आहे त्याच्या अंतःकरणांत सूर्याप्रमाणें प्रकाशणाऱ्या ज्ञानानें अत्यंत श्रेष्ठ जें परब्रम्ह तें प्रकाशित होतें ॥ १६ ॥

**तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।**
**गच्छंत्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ १७ ॥**

**तद्बुद्धयः** = तस्मिन् बुद्धिः येषां ते ( ज्यांचें मन त्या ब्रह्माच्या ठिकाणीं ते ) **तदात्मानः** = तत् एव आत्मा येषां ते ( ज्यांचा आत्मा केवळ तेंच, ब्रह्म तेंच) **तन्निष्ठाः** = तस्मिन् निष्ठाः येषां ते ( त्या ब्रह्माच्या ठिकाणीं ज्यांचा दृढ विश्वास ते ) **तत्परायणाः** = तत् परम् अयनं येषां ते ( तें ब्रह्म ज्यांचें अंतिम, विश्रामस्थान ते ) **गच्छंति** (जातात) **अपुनरावृत्तिम्** ( पुनः परत न येण्याला ) **ज्ञाननिर्धूतकल्मषाः** = ज्ञानेन निर्धूताः कल्मषाः येषां ते ( ज्ञानानें ज्यांचें पाप धुवून टाकलें ते ).

तद्बुद्धयः, तदात्मानः, तन्निष्ठाः, तत्परायणाः, ज्ञाननिर्धूतकल्मषाः (च) अपुनरावृत्तिं गच्छंति.

ज्यांचे विचार ब्रह्माविषयींचे, जे ब्रह्मांत तादात्म्य पावलेले, ज्यांचा दृढविश्वास ब्रह्मावर, जे सर्वकाळ ब्रह्माच्या ठिकाणीं तत्पर असणारे, त्यांचीं सर्व पापें ज्ञानानें धुवून जाऊन ते शुद्ध होऊन जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटतात ॥ १७ ॥

**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।**
**शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥ १८ ॥**

**विद्याविनयसंपन्ने** = विद्यया च विनयेन च संपन्ने ( विद्या आणि नम्रता यांनीं पूर्ण ) **ब्राह्मणे** ( ब्राह्मणाविषयीं ) **हस्तिनि** (हत्तीविषयीं) **शुनि** ( कुत्र्याविषयीं ) **च** ( आणि ) **एव** ( देखील ) **श्वपाके**

( चांडाळाविषयीं ) च ( आणि ) पंडिताः ( ज्ञाते ) समदर्शिनः ( सारखें पाहणारे, समदृष्टी ).

पंडिताः विद्याविनयसंपन्ने, ब्राह्मणे, गवि, हस्तिनि, शुनि, श्वपाके च एव समदर्शिनः ( संति ).

ज्ञाते पुरुष विद्या व नम्रता या गुणांनीं युक्त असे ब्राह्मण, गाय, हत्ती, कुत्रा अगर चांडाळ या सर्वांच्या ठिकाणीं सारखी दृष्टी ठेवतात म्हणजे समदृष्टीनें ( ब्रह्मरूपदृष्टीनें ) पाहतात ॥ १८ ॥

**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।**
**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥ १९ ॥**

इह ( या लोकीं ) एव ( देखील ) तैः ( त्यांनीं ) जितः ( जिंकलेला ) सर्गः ( पुनर्जन्म ) येषां ( ज्यांचें ) साम्ये ( सम अवस्थेंत ) स्थितं ( राहिलेलें ) मनः ( मन ) निर्दोषं ( दोषरहित, निर्मळ ) हि (खरोखर ) समं ( सारखें, भेदरहित ) ब्रह्म (ब्रह्म) तस्मात् (म्हणून) ब्रह्मणि ( ब्रह्मांत ) ते ( ते ) स्थिताः ( राहिलेले ).

येषां मनः साम्ये स्थितं तैः इह एव सर्गः जितः; ब्रह्म हि निर्दोषं समं ( अस्ति ) तस्मात् ते ब्रह्मणि स्थिताः ( संति ).

ज्यांचें मन भेदरहित होतें ते या लोकीं सुद्धां जन्ममरण जिंकतात ( जन्ममरणाच्या उपाधीविरहित राहतात ); ब्रह्म हें निर्मल व भेदरहित आहे म्हणून ते ब्रह्मांत येथल्या येथेंच एकरूप होऊन राहतात ( ब्रह्मरूप होऊन वावरतात ) ॥ १९ ॥

**न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाऽप्रियम् ।**
**स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितः ॥ २० ॥**

न प्रहृष्येत् ( आनंद मानूं नये ) प्रियं ( आवडती वस्तु, सुखकारक वस्तु ) प्राप्य ( मिळाल्यानें ) न उद्विजेत् ( दुःखी होऊं नये ) प्राप्य ( मिळाल्यानें ) च ( आणि ) अप्रियं ( आवडत नसणारी वस्तु ) स्थिरबुद्धिः = स्थिरा बुद्धिर्यस्य सः ( ज्याची बुद्धि स्थिर तो ) असं-





मूढः ( भ्रमिष्ट नव्हे तो ) ब्रह्मवित् ( ब्रह्म जाणणारा ) ब्रह्मणि ( ब्रह्मांत ) स्थितः ( राहिलेला ).

प्रियं प्राप्य न प्रहृष्येत्, अप्रियं प्राप्य न उद्विजेत् ( एवं ) स्थिरबुद्धिः, असंमूढः, ब्रह्मवित्, ब्रह्मणि स्थितः ( अस्ति ).

प्रियवस्तु मिळाली असतां आनंद होऊं नये किंवा अप्रिय झालें असतां दुःख होऊं नये, याप्रमाणें स्थिरबुद्धि ज्याची होऊन जो मोहापासून अलिप्त राहिला, तोच ब्रह्मज्ञानी, ब्रह्माच्या ठिकाणीं स्थित झाला असें समजावें ॥२०

**बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखम् ।**
**स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥ २१ ॥**

**बाह्यस्पर्शेषु** = बाह्येषु स्पर्शेषु ( बाहेरील म्हणजे विषयांच्या स्पर्शांत ) **असक्तात्मा** = असक्तः आत्मा यस्य सः ( ज्याचें अंतःकरण विरक्त तो ) **विंदति** ( अनुभवतो ) **आत्मनि** ( आत्म्यांत ) **यत्** ( जें ) **सुखं** ( सुख ) **सः** ( तो ) **ब्रह्मयोगयुक्तात्मा** = ब्रह्मणि योगेन युक्तः आत्मा यस्य सः ( योगाभ्यासानें ब्रह्माच्या ठिकाणीं ज्याचा आत्मा लीन झाला तो ) **सुखं** ( सुख ) **अक्षय्यं** ( निरंतरचें ) **अश्नुते** ( अनुभवतो ).

बाह्यस्पर्शेषु असक्तात्मा आत्मनि यत् सुखं ( अस्ति तत् ) विंदति, सः ब्रह्मयोगयुक्तात्मा अक्षय्यं सुखं अश्नुते.

ज्याचें मन बाह्य विषयांपासून विरक्त असतें तो आत्मस्थितींतील जें सुख तें अनुभवितो, आणि योगाभ्यासानें त्याचा आत्मा ब्रह्माशीं एकरूप झाला असल्यामुळें तो ( ब्रह्मनिष्ठ ) अक्षय सुखाचा अनुभव घेतो ॥ २१ ॥

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।**
**आद्यंतवंतः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥ २२ ॥**

**ये** ( जे ) **हि** ( खरोखर ) **संस्पर्शजाः** = संस्पर्शात् जाताः (संयोगापासून उत्पन्न होणारे ) **भोगाः** ( उपभोग ) **दुःखयोनयः** = दुःखस्य योनयः ( दुःखाचीं उत्पत्तिस्थानें ) **एव** ( केवळ ) **ते** ( ते ) **आद्यंतवंतः** ( प्रारंभ व शेवट असणारे ) **कौंतेय** ( कुंतिपुत्रा अर्जुना )

न ( नाहीं ) तेषु ( त्यांत ) रमते ( आसक्त होतो ) बुधः ( ज्ञानी, शहाणा पुरुष ).

कौंतेय, संस्पर्शजाः हि ये भोगाः ते आद्यंतवंतः, दुःखयोनयः एव ( संति ); बुधः तेषु न रमते.

अर्जुना, इंद्रियें आणि विषय यांच्या संयोगानें उत्पन्न होणारे जे उपभोग ते अल्पकाळ राहाणारे असून दुःखाची उत्पत्ति करणारे आहेत; त्यांत शहाणा ( ज्ञानी ) पुरुष रममाण होत नाहीं ॥ २२ ॥

**शक्नोतीहैव यः सोढुं प्राक् शरीरविमोक्षणात् ।**
**कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ २३ ॥**

**शक्नोति** ( समर्थ आहे ) **इह** ( या लोकीं ) **एव** ( देखील ) **यः** ( जो ) **सोढुं** ( सहन करण्याला ) **प्राक्** (पूर्वी) **शरीरविमोक्षणात्**= शरीरस्य विमोक्षणात् ( देह सोडण्याच्या ) **कामक्रोधोद्भवं** = कामात् च क्रोधात् च उद्भवः यस्य तं ( काम आणि क्रोध यांच्यापासून उत्पन्न होणारा त्याला ) **वेगं** ( जोराला ) **सः** ( तो ) **युक्तः** ( योगी, आत्मनिष्ठ ) **सः** ( तो ) **सुखी** ( सुखी ) **नरः** ( पुरुष ).

शरीरविमोक्षणात् प्राक् यः कामक्रोधोद्भवं वेगं इह एव सोढुं शक्नोति, सः नरः युक्तः, सः सुखी.

जो शरीराचा त्याग करण्यापूर्वी ( मरणापूर्वी ) या लोकीं कामक्रोध यांचा वेग सहन करूं शकतो तोच योगी आणि तोच सुखी पुरुष होय ॥२३

**योंऽतःसुखोंऽतरारामस्तथांतर्ज्योतिरेव यः ।**
**स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ २४ ॥**

**यः** ( जो ) **अंतःसुखः** = अंतः ( आत्मनि ) सुखं यस्य सः (ज्याचें सुख अंतर्यामीं, आत्मस्वरूपीं, तो ) **अंतरारामः** = अंतः आरामः यस्य सः ( ज्याचें विश्रांतिस्थान आत्मस्वरूपीं तो ) **तथा** ( तसेंच ) **अंतर्ज्योतिः** = अंतः ज्योतिर्यस्य सः ( ज्याचा प्रकाश अंतर्यामापासून तो ) **एव** ( देखील ) **सः** ( जो ) **सः** ( तो ) **योगी** ( आत्मनिष्ठ )

**ब्रह्मनिर्वाणं** = ब्रह्मणः निर्वाणं ( ब्रह्माच्या ऐक्याला ) **ब्रह्मभूतं** ( ब्रह्म होऊन ) **अधिगच्छति** ( जातो ).

यः अंतः सुखः, अंतरारामः, तथा यः अंतर्ज्योतिः एव सः योगी ब्रह्मभूतः ब्रह्मनिर्वाणं अधिगच्छति.

ज्याचें सुख आणि विश्रांतिस्थान हीं आत्मस्वरूपीं असतात, तसेंच ज्याला अंतर्यामापासूनच ( आत्मसाक्षात्कारापासून ) प्रकाश (ज्ञान) मिळालेला असतो असा योगी ब्रह्मस्वरूप होऊन ब्रह्मांतच मिळून जातो ॥२४॥

**लभंते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः ।**
**छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥**

**लभंते** ( मिळवितात ) **ब्रह्मनिर्वाणं** ( ब्रह्माशीं तादात्म्य ) **ऋषयः** ( ऋषी ) **क्षीणकल्मषाः** = क्षीणाः कल्मषाः येषां ते ( ज्यांचीं पापें नाहींशीं झालीं आहेत ते ) **छिन्नद्वैधाः**= छिन्नं द्वैधं येषां ते (ज्यांचा द्वैतभाव गेला ते ) **यतात्मानः** = यतः आत्मा येषां ते (आत्मसंयमी, मन, बुद्धि आणि इंद्रियें हीं ज्यांच्या स्वाधीन ते) **सर्वभूतहिते**= सर्वेषां भूतानां हिते ( सर्व प्राणिमात्रांचें हित करण्यांत ) **रताः** ( गढलेले, गुंतलेले ).

क्षीणकल्मषाः, छिन्नद्वैधाः, यतात्मानः, सर्वभूतहिते रताः ऋषयः ब्रह्मनिर्वाणं लभंते.

ज्यांचीं पातकें भस्म झालीं आहेत, ज्यांचा द्वैतभाव गेला आहे, जे आत्मसंयमी, जे सर्व प्राणिमात्रांचें कल्याण करण्यांत सारखे गढलेले असे ऋषी ब्रह्माशीं तादात्म्य पावतात ॥ २५ ॥

**कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।**
**अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ २६ ॥**

**कामक्रोधवियुक्तानां** = कामात् च क्रोधात् च वियुक्तानां ( काम आणि क्रोध यांपासून दूर झालेले त्यांच्या ) **यतीनां** ( यतींच्या ) **यतचेतसाम्** = यतं चेतः येषां तेषाम् ( ज्यांनीं मन स्वाधीन ठेवलें आहे त्यांच्या ) **अभितः** ( सभोंवतीं ) **ब्रह्मनिर्वाणं** ( ब्रह्माशीं ऐक्य ) **वर्तते**

( असतें ) **विदितात्मनाम्** = विदितः आत्मा येषां तेषां ( आत्मस्वरूप ज्यांना समजलें आहे त्यांच्या ).

कामक्रोधवियुक्तानां, यतचेतसां, विदितात्मनां, यतीनां अभितः ब्रह्म-निर्वाणं वर्तते.

ज्यांनीं काम आणि क्रोध यांचा त्याग केला आहे, मन स्वाधीन ठेवलें आहे, आत्मस्वरूप ज्यांना समजलें आहे अशा योग्यांच्या जवळच ब्रह्म-सुख असतें ॥ २६ ॥

**स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः ।**
**प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ ॥ २७ ॥**

**स्पर्शान्** ( इंद्रियें आणि विषय यांचे संयोग त्यांना ) **कृत्वा** (करून) **बहिः** ( बाहेर, दूर ) **बाह्यान्** ( बाहेरील ) **चक्षुः** ( डोळा, दृष्टि ) **च** ( आणि ) **एव** ( देखील ) **अंतरे** ( मध्यें ) **भ्रुवोः** ( भिवयांमध्यें ) **प्राणापानौ** = प्राणः च अपानः च (प्राणवायु आणि अपानवायु) **समौ** ( सारखे ) **कृत्वा** ( करून ) **नासाभ्यंतरचारिणौ** = नासायाः अभ्यंतरे चारिणौ ( नाकाच्या आंत संचार करणारे म्हणजे वाहणारे ).

बाह्यान् स्पर्शान् बहिः कृत्वा, भ्रुवोः अन्तरे चक्षुः च नासाभ्यंतरचा-रिणौ प्राणापानौ समौ कृत्वा.

इंद्रियें आणि त्यांचे विषय यांचे बाहेरून होणारे जे संयोग त्यांस बाहेर ठेऊन म्हणजे दूर सारून, दोन भिवयांच्यामध्यें दृष्टि ठेऊन, नाकांत संचार करणारे प्राण आणि अपानवायु समान करून ॥ २७ ॥

**यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।**
**विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥ २८ ॥**

**यतेंद्रियमनोबुद्धिः** = यतानि इंद्रियाणिमनश्च बुद्धि च यस्य सः ( ज्याचीं इंद्रियें, मन व बुद्धि हीं स्वाधीन आहेत तो ) **मुनिः** ( मुनि ) **मोक्षपरायणः** = मोक्षः परायणं यस्य सः ( मोक्ष हाच ज्याचें विराम-स्थान ) **विगतेच्छाभयक्रोधः** = विगता इच्छा च भयं च क्रोधः च

यस्य सः ( ज्याची इच्छा, भय व राग हीं गेलीं आहेत तो ) **सदा** ( नेहमीं ) **मुक्तः** ( मोकळा ) **एव** ( केवळ ) **सः** ( तो ).

यतेंद्रियमनोबुद्धिः, विगतेच्छाभयक्रोधः, मोक्षपरायणः, यः मुनिः सः सदा मुक्तः एव.

इंद्रियें, मन, बुद्धि हीं स्वाधीन ठेवून, इच्छा, भय आणि राग यांस घालवून, मोक्ष मिळविण्याविषयीं तत्पर असा जो मुनि तो नेहमीं मुक्तच असतो ( असें समजावें ) ॥ २८ ॥

**भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।**
**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥ २९ ॥**

**भोक्तारं** ( उपभोग घेणारा ) **यज्ञतपसां** = यज्ञानां च तपसां च ( यज्ञाचा आणि तपांचा ) **सर्वलोकमहेश्वरम्** = सर्वेषां लोकानां महेश्वरम् ( सर्व भुवनांचा मोठा धनी ) **सुहृदं** ( मित्र, सखा ) **सर्वभूतानां** ( सर्व प्राणिमात्रांचा ) **ज्ञात्वा** ( जाणून ) **मां** (मला) **शांतिं** ( शांति-सुखाला ) **ऋच्छति** ( मिळवितो ).

( सः मुक्तः ) यज्ञतपसां भोक्तारं, सर्वलोकमहेश्वरं, सर्वभूतानां सुहृदं, मां ज्ञात्वा शांतिं ऋच्छति.

( तो जीवन्मुक्त पुरुष ) यज्ञ आणि तपश्चर्या यांचा भोक्ता, सर्व भुवनांचा महाधिपति व सर्व भूतमात्रांचा सखा जो मी त्या मला ओळखून शांतिसुख मिळवितो ॥ २९ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूप० संन्यासयोगो नाम पंचमोऽध्यायः ।

———

# अध्याय सहावा.

श्रीभगवानुवाच–अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ।
स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ।१।

**अनाश्रितः** ( आशा न ठेवतां ) **कर्मफलं** = कर्मणः फलं ( कर्मांचें फल ) **कार्यं** ( केलें पाहिजे असें, करणें योग्य असें ) **कर्म** ( कर्म ) **करोति** ( करतो ) **यः** ( जो ) **सः** ( तो ) **संन्यासी** ( संन्यासी ) **च** ( आणि ) **योगी** ( योगी ) **च** ( आणि ) **न** ( नाहीं ) **निरग्निः** ( अग्निशिवाय, होमादि कर्मे न करणारा ) **न** ( नाहीं ) **च** ( आणि ) **अक्रियः** ( कर्मे न करणारा ).

कर्मफलं अनाश्रितः यः कार्यं कर्म करोति, सः संन्यासी योगी च ( भवति ) निरग्निः न च अक्रियः न.

कर्मांच्या फलाविषयीं आशा न ठेवतां जें कर्म करणें शास्त्रविहित आहे, तें जो करतो तो संन्यासी व तोच योगी होय; अग्निहोत्रादि विहित कर्मांचा त्याग करणारा किंवा विहित कर्मे मुळींच न करणारा ( पुरुष ) तो योगी किंवा संन्यासी नव्हे ॥ १ ॥

यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव ।
न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥ २ ॥

**यं** ( ज्याला ) **संन्यासम्** ( संन्यास ) **इति** ( असें ) **प्राहुः** ( ह्मणतात ) **योगं** ( योग ) **तं** ( त्याला ) **विद्धि** ( समज ) **पांडव** ( अर्जुना ) **न** ( नाहीं ) **हि** ( खरोखर ) **असंन्यस्तसंकल्पः** = न संन्यस्तः संकल्पः येन सः ( संकल्पाच्या इच्छेचा त्याग ज्यानें केला नाहीं तो ) **योगी** ( योगी ) **भवति** ( होतो ) **कश्चन** ( कोणीहि )

पांडव, यं संन्यासं इति प्राहुः तं योगं विद्धि; हि असंन्यस्तसंकल्पः कश्चन योगी न भवति.

अर्जुना, ज्याला संन्यास म्हणतात तोच योग असें समज; संकल्पाचा म्हणजे इच्छेचा संन्यास (त्याग) केल्याशिवाय कोणीही योगी होत नाहीं ।२।

**आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।**
**योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥ ३ ॥**

**आरुरुक्षोः** ( चढूं इच्छिणाऱ्या ) **मुनेः** ( मुनीच्या ) **योगं** ( योग ) **कर्म** ( कर्म ) **कारणं** ( कारण, साधन ) **उच्यते** ( म्हणतात ) **योगारूढस्य** = योगं आरुढस्य ( योग साध्य केल्याचा ) **तस्य** ( त्याचा ) **एव** ( देखील ) **शमः** ( शांत वृत्ति ) **कारणं** ( कारण, साधन ) **उच्यते** ( म्हणतात ).

योगं आरुरुक्षोः मुनेः कर्म कारणं उच्यते; तस्य एव योगारूढस्य (कर्मणः) शमः कारणं उच्यते.

योग ( हा कोणी पर्वत तो ) चढूं इच्छिणाऱ्या ( योगसाधन करूं इच्छिणाऱ्या ) मुनीला कर्मयोग हें साधन होय, व योग साध्य झाल्यावर त्याला ( निरपेक्ष व निरभिमान वृत्तीनें विहित कर्म करण्याला ) शम ( शांत वृत्ति, स्वस्थ अंतःकरणस्थिति ) हेंच साधन होतें असें म्हणतात ॥ ३ ॥

**यदा हि नेंद्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ।**
**सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥ ४ ॥**

**यदा** ( जेव्हां ) **हि** ( खरोखर ) **न** ( नाहीं ) **इंद्रियार्थेषु** ( इंद्रियांच्या विषयांचा ) **न** ( नाहीं ) **कर्मसु** ( कर्मांत ) **अनुषज्जते** ( सक्त होतो ) **सर्वसंकल्पसंन्यासी** ( सर्व इच्छांचा त्याग करणारा ) **योगारूढः** = योगं आरूढः ( योग साध्य केलेला ) **तदा** ( तेव्हां ) **उच्यते** ( म्हणतात ).

यदा हि न इंद्रियार्थेषु न कर्मसु सर्व संकल्पसंन्यासी अनुषज्जते, तदा योगारूढः उच्यते.

जेव्हां इंद्रियांच्या विषयोपभोगांमध्यें आणि कर्मांमध्यें ( योगी ) सक्त होत नाहीं व सर्व संकल्प ( मनांतील इच्छा ) सोडून देतो तेव्हां तो योगारूढ ( त्याला योगसाध्य ) झाला असें म्हणतात ॥ ४ ॥

**उद्धरेदात्मनाऽऽत्मानं नात्मानमवसादयेत् ।**
**आत्मैव ह्यात्मनोबंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ५ ॥**

**उद्धरेत्** ( उद्धरावा, उंच पदाला पोंचवावा ) **आत्मना** ( आपल्या आत्म्याच्या सहाय्यानें, आपण होऊनच ) **आत्मानं** ( आपल्या आत्म्याला ) **न** ( नाहीं ) **आत्मानं** ( आपल्या आत्म्याला ) **अवसादयेत्** ( नीच-पदाला जऊं द्यावें ) **आत्मा** ( आपला आत्मा ) **एव** ( फक्त ) **हि** ( खरेंच ) **आत्मनः** ( आत्म्याचा ) **बंधुः** ( भाऊ, हितकर्ता ) **आत्मा** ( आत्मा ) **एव** ( फक्त ) **रिपुः** ( शत्रु ) **आत्मनः** ( आपला )

आत्मना आत्मनं उद्धरेत् , आत्मानं न अवसादयेत् ; हि आत्मा एव आत्मनः बंधुः आत्मा एव आत्मनः रिपुः.

आपल्या आत्म्याच्या सहाय्यानें ( आपण होऊनच ) आपल्या आत्म्याचा उद्धार करावा, ( आपण ) आपल्या आत्म्याला अधोगतीला जाऊं देऊं नये; कारण आपणच आपल्या आत्म्याचा ( हितकर्ता ) बंधु आहों व आपणच आपल्या आत्म्याचा ( अनहितकर्ता ) शत्रुहि आहों ॥ ५ ॥

**बंधुरात्माऽऽत्मनस्तस्य येनाऽत्मैवाऽत्मना जितः ।**
**अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥ ६ ॥**

**बंधुः** ( भाऊ, हितकर्ता ) **आत्मा** ( आपला आत्मा ) **आत्मनः** ( आत्म्याचा ) **तस्य** ( त्याचा ) **येन** ( ज्यानें ) **आत्मा** ( आत्मा ) **एव** ( देखील ) **आत्मना** ( आत्म्यानें ) **जितः** ( जिंकला आहे ) **अनात्मनः** = न ( जितः ) आत्मा येन तस्य ( ज्यानें आत्मा जिंकला नाहीं त्याचा ) **तु** ( परंतु ) **शत्रुत्वे** ( वैर करण्यांत ) **वर्तेत** ( वागतो ) **आत्मा** ( आत्मा ) **एव** ( देखील ) **शत्रुवत्** ( शत्रूप्रमाणें ).

येन आत्मना एव आत्मा जितः, तस्य आत्मनः आत्मा बंधु; तु अनात्मनः आत्मा एव शत्रुवत् शत्रुत्वे वर्तेत.

ज्यानें आपला आत्मा जिंकला आहे त्याचा आत्मा त्याचा स्वतःचा बंधु ( हितकर्ता ) होतो; परंतु ज्यानें आत्मा जिंकला नाहीं त्याचा आत्मा ( त्याच्याशीं ) शत्रूप्रमाणें वैरत्वानें वागतो. सारांश, ज्यानें आत्मसंयमन

केलें आहे त्याचा आत्मा त्याला बंधुप्रमाणें ( हितकर्ता ) होतो व ज्याला आत्मसंयमन करतां आलें नाहीं त्याचा आत्मा त्याचाच शत्रु होतो ॥ ६ ॥

**जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥ ७ ॥**

**जितात्मनः** = जितः आत्मा येन तस्य ( ज्यानें आपला आत्मा जिंकला आहे, ( आत्मसंयमी ) त्याचा ) **प्रशांतस्य** ( अत्यंत शांत वृत्तीचा त्याचा ) **परमात्मा** ( श्रेष्ठ आत्मा ) **समाहितः** ( समतोल वृत्तीचा, निर्विकार ) **शीतोष्णसुखदुःखेषु** = शीतं च उष्णं च सुखं च दुखं च = शीतोष्णसुखदुःखानि तेषु ( शीत व उष्ण सुख आणि दुःख यांच्यामध्यें ) **तथा** ( तसेंच ) **मानापमानयोः** = मानश्च अपमानश्च मानापमानौ तयोः ( सत्कार आणि तिरस्कार झाला असतां ).

जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः समाहितः ( भवति ).

ज्यानें आत्मसंयमन केलें आहे ( शरीर, इंद्रियें आणि मन हीं स्वाधीन ठेवलीं आहेत ); ज्याची वृत्ति अत्यंत शांत आहे; थंडी, उष्णता, सुख अथवा दुःख हीं प्राप्त झालीं असतां, त्याप्रमाणेंच त्याचा कोणी सत्कार केला अथवा अपमान केला तरी त्याचा आत्मा ( अंतस्थ वृत्ति ) निश्चल ( निर्विकार ) राहतो ॥ ७ ॥

**ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः ।**
**युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः ॥ ८ ॥**

**ज्ञानविज्ञानतृप्तात्मा** = ज्ञानेन च विज्ञानेन च तृप्तः आत्मा यस्य सः ( ज्ञान आणि अनुभव-ज्ञान यांच्या प्राप्तीनें ज्याचा आत्मा समाधान पावला आहे तो ) **कूटस्थः** ( अचल, विकारशून्य ) **विजितेंद्रियः** = विजितानि इंद्रियाणि येन सः ( ज्यानें इंद्रियें जिंकलीं तो ) **युक्तः** (योगाभ्यास-सक्त = योगांत पूर्णत्व पावलेला ) **इति** ( असें ) **उच्यते** ( ह्मणतात ) **योगी** ( योगी ) **समलोष्टाश्मकांचनः** = समानि लोष्टं च कांचनं च यस्य सः ( ज्याला ढेकूळ, दगड आणि सोनें हीं सारखीं तो ).

( यदा ) योगी विजितेंद्रियः ज्ञानविज्ञानतृप्तात्मा, समलोष्टाश्मकांचनः, कूटस्थः ( भवति, तदा ) युक्तः इति उच्यते.

ज्या योग्यानें इंद्रियें आपल्या पूर्ण ताब्यांत आणलीं आहेत; ज्याला वेदांतशास्त्राचें ज्ञान आणि आत्मसाक्षात्काराचें अनुभवज्ञान झाल्यानें ज्याचा आत्मा समाधान पावलेला आहे; ज्याला माती, दगड आणि सोनें यांची किंमत सारखींच; जो अचल ह्मणजे विकारशून्य राहतो त्या योग्याला 'युक्त' ( योगांत पूर्णत्व पावलेला ) असें म्हणतात ॥ ८ ॥

**सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु ।**
**साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥ ९ ॥**

**सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु** = सुहृत्सु च मित्रेषु च अरिषु च उदासीनेषु च मध्यस्थेषु च द्वेष्येषु च बंधुषु च ( जिवींच्या जिवलगांत, मित्रांत, शत्रूंत, तटस्थ असणारांत, निःपक्षपाती पुरुषांत, द्वेष करण्यायोग्य त्यांत आणि आप्तजनांत ) **साधुषु** ( साधु पुरुषांत ) **अपि** ( सुद्धां ) **पापेषु** ( पापीपुरुषांत ) **समबुद्धिः** = समा बुद्धिर्यस्य सः ( ज्याची बुद्धि सारखी तो ) **विशिष्यते** ( सर्व श्रेष्ठ आहे ).

( यः ) सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु, साधुषु, पापेषु च अपि समबुद्धिः ( अस्ति सः ) विशिष्यते.

जिवींचा जिवलग, मित्र, शत्रु, तटस्थ, निःपक्षपाति, द्वेष करण्यायोग्य, आप्त, साधु, पापी या सर्वांच्या ठिकाणीं जो सारखी बुद्धि ठेवतो तो सर्वांत श्रेष्ठ होय ॥ ९ ॥

**योगी युंजीत सततमात्मानं रहसि स्थितः ।**
**एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ १० ॥**

**योगी** ( योगी ) **युंजीत** ( गुंतवावें ) **सततं** ( सर्वदा ) **आत्मानं** ( आपलें चित्त ) **रहसि** ( एकांतांत ) **स्थितः** ( बसून ) **एकाकी** ( एकाग्र चित्त करून ) **यतचित्तात्मा** = यतः चित्तं च आत्मा च यस्य सः ( ज्याचें मन आणि अंतःकरण स्वाधीन तो ) **निराशीः** = निर्गताः आशिषः यस्मात् सः ( निरिच्छ ) **अपरिग्रहः** ( परिग्रहरहित )

योगी रहसि स्थितः एकाकी, यतचित्तात्मा, निराशीः अपरिग्रहः सततं आत्मानं युंजीत;

योग्यानें एकांतांत एकाग्र चित्त करून रहावें, मन व अंतःकरण हीं स्वाधीन ठेवावींत, निरिच्छ असून आणि सर्व पाश सोडून आपलें सर्व चित्त योगाभ्यासांत गुंतवावें ॥ १० ॥

**शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।**
**नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ ११ ॥**

**शुचौ** ( स्वच्छ ) **देशे** ( जागेंत ) **प्रतिष्ठाप्य** ( स्थापन करून ) **स्थिरं** ( अढळ, न हलणारें ) **आसनं** ( आसन ) **आत्मनः** ( आपलें ) **न** ( नाहीं ) **अत्युच्छ्रितं** ( अति उंच ) **न** ( नाहीं ) **अतिनीचं** ( फार सखल ) **चैलाजिनकुशोत्तरम्** = चैलं च आजिनं च कुशाः च उत्तराः यस्मिन् तत् ( वस्त्र, मृगचर्म, दर्भ हीं ज्यांत एकावर एक तें ).

शुचौ देशे, न अत्युच्छ्रितं न अतिनीचं, चैलाजिनकुशोत्तरं आत्मनः स्थिरं आसनं प्रतिष्ठाप्य;

दर्भाचें आसन कृष्णाजिन व वस्त्र हीं एकावर एक घातलेलीं, फार उंच अगर सखल नाहीं असें आपलें आसन स्वच्छ जागेंत अढळ मांडून ॥११॥

**तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः ।**
**उपविश्यासने युंज्याद्योगमात्मविशुद्धये ॥ १२ ॥**

**तत्र** ( तेथें ) **एकाग्रं** ( एके ठिकाणीं लागलेलें ) **मनः** ( मन ) **कृत्वा** ( करून ) **यतचित्तेंद्रियक्रियः** = यताः चित्तस्य च इंद्रियाणां च क्रियाः येन सः ( मनाचे आणि इंद्रियांचे व्यापार ज्याच्या आधीन तो ) **उपविश्य** ( बसून ) **आसने** ( आसनावर ) **युंज्यात्** ( अभ्यास करावा ) **योगं** ( योग ) **आत्मविशुद्धये** ( अंतःकरणाची शुद्धि करण्याकरितां )

तत्र आसने उपविश्य, यतचित्तेंद्रियक्रियः मनः एकाग्रं कृत्वा, आत्मविशुद्धये योगं युंज्यात्.

त्या आसनावर बसून, मन एकाग्र करून, चित्त व इंद्रियें यांचे व्यापार

स्थिर ( संयमित ) ठेवून अंतःकरणाची शुद्धि करण्याकरतां योगाभ्यास करीत राहावें ॥ १२ ॥

**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।**
**संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ १३ ॥**

**समं** ( सरळ ) **कायशिरोग्रीवं** = कायः च शिरः च ग्रीवा च ( पाठ, मस्तक आणि मान ) **धारयन्** ( धारण करून ) **अचलं** ( निश्चल, न हालतां ) **स्थिरः** ( स्वस्थतेनें ) **संप्रेक्ष्य** ( पहात ) **नासिकाग्रं** = नासिकायाः अग्रं ( नाकाचा शेंडा ) **स्वं** ( आपला ) **दिशः** ( दिशा ) **च** ( आणि ) **अनवलोकयन्** ( न पहातां ).

स्थिरः ( भूत्वा ) कायशिरोग्रीवं अचलं समं धारयन् स्वं नासिकाग्रं संप्रेक्ष्य च दिशः अनवलोकयन्.

स्वस्थ होऊन, पाठ, मस्तक आणि मान हीं सरळ रेषेंत आणून न हालतां आपल्या नाकाच्या शेंड्याच्या रेषेंत दृष्टि लावून दुसऱ्या कोणीकडे न पाहतां ( योग्याभ्यास करावा ) ॥ १३ ॥

**प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।**
**मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥ १४ ॥**

**प्रशांतात्मा** = प्रशांतः आत्मा यस्य सः (ज्याचें अंतःकरण शांत तो) **विगतभीः** = विगता भीः यस्य सः ( ज्याची भीति गेली आहे तो ) **ब्रह्मचारिव्रते** = ब्रह्मचारिणः व्रते ( ब्रह्मचर्य–व्रतांत ) **स्थितः** (राहून) **मनः** ( मन ) **संयम्य** ( आंवरून धरून ) **मच्चित्तः** = मयि चित्तं यस्य सः ( माझ्या ठिकाणीं ज्याचें मन तो ) **युक्तः** ( ध्यानस्थ ) **आसीत** ( बसावें ) **मत्परः** = अहं परः यस्य सः ( ज्याचें अंतिम तो ).

प्रशांतात्मा, विगतभीः, ब्रह्मचारिव्रते स्थितः, मनः संयम्य, मच्चित्तः युक्तः मत्परः आसीत.

अंतःकरण शांत करावें, सर्व भीति सोडून द्यावी, ब्रह्मचर्यानें राहावें, मन आवरून धरून तें माझ्या चिंतनांत लावून त्या ठिकाणीं तें अढळ ठेवावें। १४।

**युंजन्नेवं सदाऽऽत्मानं योगी नियतमानसः ।**
**शांतिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ॥ १५ ॥**

**युंजन्** ( ध्यानीं लावून ) **एवं** ( याप्रमाणें ) **सदा** (सदैव) **आत्मानं** ( आपलें अंतःकरण ) **योगी** ( योगी ) **नियतमानसः** = नियतं मानसं यस्य सः (ज्याचें मन स्वाधीन तो) **शांतिं** (शांतिप्रत) **निर्वाणपरमां** = निर्वाणं परमं यस्याः तां ( जिचें अंतिम मोक्ष तीप्रत ) **मत्संस्थाम्** = मयि संस्था यस्याः तां ( जिची स्थिति माझ्या ठिकाणीं तीप्रत ) **अधिगच्छति** ( प्राप्त करून घेतो ).

एवं सदा आत्मानं युंजन् नियतमानसः योगी निर्वाणपरमां मत्संस्थां शांतिं अधिगच्छति.

याप्रमाणें सदैव आत्मचिंतनांत ध्यानस्थ राहून मन आंवरून धरल्यानें योगी माझ्या ठिकाणीं जिचें वास्तव्य व मोक्ष जिचें अंतिम अशी शांति प्राप्त करून घेतो ॥ १५ ॥

**नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकान्तमनश्नतः ।**
**न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥ १६ ॥**

**न** ( नाहीं ) **अत्यश्नतः** ( जास्त खाणाराचा ) **तु** (खरोखर) **योगः** ( योग ) **अस्ति** ( आहे ) **न** ( नाहीं ) **च** (आणि) **एकांतं** (सर्वस्वीं) **अनश्नतः** ( उपवास करणाराचा ) **न** ( नाहीं ) **च** ( आणि ) **अतिस्वप्नशीलस्य** = अति स्वप्नं शीलं यस्य तस्य ( ज्याला फार झोंप घेण्याची संवय त्याचा ) **जाग्रतः** ( जागणाराचा ) **न** ( नाहीं ) **एव** ( देखील ) **च** ( आणि ) **अर्जुन** ( अर्जुना ).

अर्जुन, अत्यश्नतः तु योगः न अस्ति, एकांतं अनश्नतः च न, अतिस्वप्नशीलस्य च न, ( अति ) जाग्रतः एव च न ( योगः अस्ति ).

अर्जुना, जो फार खातो किंवा जो मुळींच खात नाहीं, जो फार झोंप घेतो किंवा जो फार जागरण करतो अशा मनुष्याला योग साध्य होत नाहीं ॥ १६ ॥

**युक्ताऽऽहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।**
**युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ १७ ॥**

युक्ताहारविहारस्य = युक्तः आहारः च विहारः च यस्य तस्य ( ज्याचें खाणें आणि करमणुकीचे प्रकार योग्य म्हणजे नियमित त्याचा ) युक्तचेष्टस्य = युक्ता चेष्टा यस्य तस्य ( ज्याची वागणूक योग्य त्याचा ) कर्मसु ( कर्मांत ) युक्तस्वप्नावबोधस्य = युक्तः स्वप्नः च अवबोधः च यस्य तस्य ( ज्याची निद्रा व जागरण नियमित त्याचा ) योगः ( योगः ) भवति ( होतो ) दुःखहा ( दुःखनाशक ).

युक्ताऽहारविहारस्य, कर्मसु युक्तचेष्टस्य, युक्तस्वप्नावबोधस्य योगः दुः-खहा भवति.

ज्याचें खाणें आणि कर्मणुकीचे प्रकार नियमित, ज्याची व्यवहारांत वाग-णूक योग्य रीतीची, ज्याची निद्रा व जागरण परिमित त्या योग्याचा योगा-भ्यास दुःखनाशक ( सुखसाध्य ) होतो ॥ १७ ॥

यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ।
निस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥ १८ ॥

यदा ( जेव्हां ) विनियतं ( आंवरलेलें, संयमित ) चित्तं ( मन ) आत्मनि ( आत्मस्वरूपांत ) एव ( फक्त ) अवतिष्ठते (बसून राहतो) निस्पृहः ( निरिच्छ ) सर्वकामेभ्यः = सर्वेभ्यः कामेभ्यः ( सर्व विष-योपभोगांविषयीं ) युक्तः ( ' युक्त, ' पूर्णत्व पावलेला ) इति ( असें ) उच्यते ( म्हणतात ) तदा ( तेव्हां ).

यदा विनियतं चित्तं आत्मनि एव अवतिष्ठते, सर्वकामेभ्यः निस्पृह. ( भवति ) तदा युक्तः इति उच्यते.

जेव्हां ( योग्याचें ) आंवरून धरलेलें मन आत्मस्मरूपांत निमग्न राहतें आणि ( त्याची ) जेव्हां सर्व विषयोपभोगांची इच्छा नष्ट होते, तेव्हां त्या योग्याला ' युक्त ' ( पूर्ण समाधिस्त ) असें म्हणतात ॥ १८ ॥

यथा दीपो निवातस्थो नेंगते सोपमा स्मृता ।
योगिनो यतचित्तस्य युंजतो योगमात्मनः ॥ १९ ॥

यथा ( ज्याप्रमाणें ) दीपः ( दिवा ) निवातस्थः ( निवाऱ्यांत असलेला ) न इंगते ( हालत नाहीं ) सा ( ती ) उपमा ( दृष्टान्त ) स्मृता ( आठवते ) योगिनः (योग्याची) यतचित्तस्य—यतं चित्तं येन

तस्य ( ज्यानें मन आंवरून धरलें त्याचें ) युंजतः (अभ्यास करणाराचें) योगं ( योग ) आत्मनः ( आत्म्याचें ).

यथा निवातस्थः दीपः न इंगते, सा उपमा आत्मनः योगं युंजतः यत-चित्तस्य योगिनः स्मृता.

निवाऱ्यांत ठेवलेल्या दिव्याची ज्योत जशी हालत नाहीं तीच उपमा, मन आंवरून धरून तें आतमस्वरूपीं एकाग्र करणाऱ्या योग्याला बरोबर लागूं पडेल असें ध्यानांत येतें ॥ १९ ॥

**यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।**
**यत्रचैवात्मनाऽऽत्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥ २० ॥**

**यत्र** ( जेथें ) **उपरमते** ( शांत होतें ) **चित्तं** ( मन ) **निरुद्धं** ( आंवरून धरलेलें ) **योगसेवया** = योगस्य सेवया ( योगाची सेवा केल्यानें, योगाभ्यासानें ) **यत्र** ( जेथें ) **च** ( आणि ) **एव** ( देखील ) **आत्मना** ( अंतर्दृष्टीनें ) **आत्मनं** ( आतमस्वरूप ) **पश्यन्** ( पाहून ) **आत्मनि** ( आत्म्यांत, अंतर्यामीं ) **तुष्यति** ( संतुष्ट राहतो ).

योगसेवया निरुद्धं चितं यत्र उतरमते, यत्र च आत्मना आत्मानं पश्यन् एव ( योगी ) आत्मनि तुष्यति;

योगाभ्यासानें आंवरून धरलेलें मन ज्या ठिकाणीं शांतता पावतें (आणि) जेथें योगी अंतर्दृष्टीनें आतमस्वरूप पाहून आपल्या ठिकाणींच आपण संतुष्ट राहतो ॥ २० ॥

**सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ।**
**वेत्ति यत्र न चैवाऽयं स्थितश्चलति तत्वतः ॥ २१ ॥**

**सुखं** ( सुख ) **आत्यंतिकं** ( अत्यंत, अतीशय ) **यत्** ( जें ) **तत्** ( तें ) **बुद्धिग्राह्यं** = बुद्धया ग्राह्यं ( बुद्धीनें घेण्याजोगें ) **अतींद्रियं** = इंद्रियाणि अतीतं ( इंद्रियांच्या पलीकडील ) **वेत्ति** (जाणतो) **यत्र** (जेथें) **न** ( नाहीं ) **च** ( आणि ) **एव** ( देखील ) **अयं** ( हा ) **स्थितः** ( राहिलेला ) **चलति** ( हालतो ) **तत्वतः** ( तत्वापासून, आत्मस्वरूपा-पासून) .

यत्र यत् बुद्धिग्राह्यं अतींद्रियं; आत्यंतिकं सुखं तत् वेत्ति, ( तत्र ) च अयं स्थितः तत्वतः न एव चलति.

इंद्रियांना न समजणारें परंतु बुद्धीनें आकलन होणारें जें परम सुख त्याचा अनुभव जेव्हां जाणतो व आत्मस्वरूपीं रत झालेला योगी जेथून अगदीं ढळत नाहीं ( संबंध पुढें आहे ) ॥ २१ ॥

**यं लब्ध्वा चाऽपरं लाभं मन्यते नाऽधिकं ततः ।**
**यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणाऽपि विचाल्यते ॥ २२ ॥**

**यं** ( जें ) **लब्ध्वा** ( मिळाल्यानंतर ) **च** ( आणि ) **अपरं** (दुसरा) **लाभं** ( लाभ, प्राप्ति ) **मन्यते** ( मानतो ) **न** ( नाहीं ) **अधिकं** ( अधिक ) **ततः** ( त्यापेक्षां )**यस्मिन्** ( ज्यांत ) **स्थितः** ( असलेला, राहिलेला ) **न** ( नाहीं ) **दुःखेन** ( दुःखानें ) **गुरुणा** ( जड ) **अपि** ( देखील ) **विचाल्यते** ( ढळला जातो ).

यं च लब्ध्वा अपरं ततः अधिकं लाभं न मन्यते; यस्मिन् स्थितः(योगी) गुरुणा अपि दुःखेन न विचाल्यते.

जें ( आत्मसुख ) मिळाल्यानंतर त्यापेक्षां अधिक दुसरा कोणताहि लाभ आहे असें तो मानीत नाहीं; ज्यांत ( ज्या आत्मसुखांत ) रत झाला असतां तो (योगी) दुर्घट दुःख झालें तरी तेथून ढळत नाहीं (संबंध पुढें आहे)।२२।

**तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् ।**
**स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ॥ २३ ॥**

**तं** ( त्याला ) **विद्यात्** ( समजावा ) **दुःखसंयोगवियोगं**=दुखस्य संयोगात् वियोगं ( दुःखसंयोगापासून वियोग, दुःखप्राप्तीचा अभाव ) **योगसंज्ञितं** ( योग नांवाचा ) **निश्चयेन** ( निश्चयानें ) **योक्तव्यः** ( अभ्यासावा ) **योगः** ( योग ) **अनिर्विण्णचेतसा**=न निर्विण्णं चेतः यस्य तेन ( ज्याचें मन उदास नाहीं त्यानें, उत्साही आहे अशा मनानें ).

तं दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितं विद्यात्; सः योगः अनिर्विण्णचेतसा निश्चयेन योक्तव्यः.

दुःखाचा स्पर्श ज्या स्थितींत नाहीं त्या स्थितीला 'योग' अशी संज्ञा आहे





( त्या स्थितीला योग म्हणतात ). तो योग उल्हसित मनानें व निश्चयानें अभ्यासावा ॥ २३ ॥

**संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः ।**
**मनसैवेंद्रियग्रामं विनियम्य समंततः ॥ २४ ॥**

**संकल्पप्रभवान्** (मनोरथापासून उत्पन्न होणाऱ्या) **कामान्** (इच्छा) **त्यक्त्वा** ( टाकून देऊन ) **सर्वान्** ( सर्व ) **अशेषतः** ( शिल्लक न ठेवतां, निःशेष ) **मनसा** ( मनानें ) **एव** ( देखील ) **इंद्रियग्रामं** = इंद्रियाणां ग्रामं ( इंद्रियांचा समूह) **विनियम्य** (जिंकून, आंवरून धरून) **समंततः** ( सर्व बाजूंनीं ).

सर्वान् संकल्पप्रभवान् कामान् अशेषतः त्यक्त्वा, मनसा एव इंद्रियग्रामं समंततः विनियम्य.

संकल्पापासून उद्भवणाऱ्या सर्व वासना निःषेसरीतीनें सोडून देऊन आणि चोहोंकडून मनानें सर्व इंद्रियें आंवरून धरून (संबंध पुढील श्लोकांत) ।२४।

**शनैः शनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया ।**
**आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतये ॥ २५ ॥**

**शनैः शनैः** ( हळू हळू ) **उपरमेत्** ( शांत होत जावें ) **बुद्ध्या** ( बुद्धीनें ) **धृतिगृहीतया** = धृत्या गृहीतया ( धैर्यानें धरलेल्या ) **आत्मसंस्थं** ( आत्मस्वरूपीं स्थिर झालेलें ) **मनः** ( मन ) **कृत्वा** ( करून ) **न** ( नाहीं ) **किंचित्** ( कोणतीहि वस्तु ) **अपि** ( सुद्धां ) **चिंतयेत्** ( मनन करावें ).

धृतिगृहीतया बुद्धया शनैः शनैः उपरमेत् ; मनः आत्मस्थितं कृत्वा किंचित् अपि न चिंतयेत्.

धैर्यानें बुद्धीचें आकलन करून तिच्या योगानें हळू हळू शांति प्राप्त करून घ्यावी; मन आत्मस्वरूपीं स्थित करून दुसरा कोणताहि विचार मनांत येऊं देऊं नये ॥ २५ ॥

**यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम् ।**

**ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २६ ॥**

**यतः यतः** ( जिकडून जिकडून ) **निश्चरति** ( बाहेर निसटून जातें ) **मनः** ( मन ) **चंचलं** ( चंचळ ) **अस्थिरं** (स्वस्थ न राहणारें) **ततः ततः** ( तिकडून तिकडून ) **नियम्य** ( ओढून आणून ) **एतत्** ( हें ) **आत्मनि** ( आत्मस्वरूपांत ) **एव** ( देखील ) **वशं** ( आधीन होण्याला) **नयेत्** ( लावावें ).

चंचलं अस्थिरं मनः यतः यतः निश्चरति, ततः ततः एतत् नियम्य आत्मनि एव वशं नयेत्.

जिकडून जिकडून चंचल आणि स्वस्थ न राहणारें मन निसटून जावयाला पाहील, तिकडून तिकडून त्याला ओढून आणून आत्मस्वरूपीं लीन व्हावयाला लावावें ॥ २६ ॥

**प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।**
**उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥**

**प्रशांतमनसं**=प्रशांतं मनः यस्य सः प्रशांतमनाः, तं प्रशांतं मनसं (ज्याचें मन निर्विकार, शांत, त्याला) **हि** (खरोखर) **एनं** (हा) **योगिनं** ( योगी ) **सुखं** ( सुख ) **उत्तमम्** ( उत्तम प्रकारचें ) **उपैति** (येतें) **शांतरजसं**=शातं रजः यस्य तं ( ज्याची रजोगुण वृत्ति नाहींशी झाली त्याला ) **ब्रह्मभूतं** ( ब्रह्मरूप झालेला ) **अकल्मषं** ( पापरहित ).

प्रशांतमनसं शातरजसं ब्रह्मभूतं अकल्मषं एनं योगिनं उत्तमं सुखं उपैति हि.

अशा रीतीनें मन निर्विकार होऊन ज्याची रजोगुणवृत्ति शून्य झाली, जो ब्रह्मरूप होऊन निष्पाप झाला, त्या योग्याला परम सुख प्राप्त होतें ।२७।

**युंजन्नेवं सदाऽऽत्मानं योगी विगतकल्मषः ।**
**सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते ॥ २८ ॥**

**युंजन्** ( निमग्न राहून ) **एवं** ( याप्रमाणें ) **सदा** ( सर्वकाळ ) **आत्मानं** (आत्म्याशीं, आत्मस्वरूपाशीं) **योगी** (योगी) **विगतकल्मषः**= विगतः कल्मषः यस्य सः ( ज्याचें पाप गेलें तो ) **सुखेन** ( सहज ) **ब्रह्मसंस्पर्शं**=ब्रह्मणा संस्पर्शः यस्य तत् ( ज्याचा ब्रह्माशीं स्पर्श तें )

अत्यंतं ( अगदीं शेवटलें, उत्कृष्ट ) सुखं (सुख) अश्नुते (उपभोगतो).

एवं सदा आत्मानं युंजन् विगतकल्मषः योगी ब्रह्मसंस्पर्शं अत्यंतं सुखं सुखेन अश्नुते.

याप्रमाणें सर्वकाळ आत्मस्वरूपीं निमग्न राहून निष्पाप झालेला योगी ब्रह्माशीं निकट असल्यानें त्या ब्रह्मापासून होणारें उत्कृष्ट सुख सहज अनुभवितो ॥ २८ ॥

**सर्व भूतस्थमात्मानं सर्व भूतानि चात्मनि ।**
**ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ २९ ॥**

**सर्वभूतस्थ**=सर्वेषु भूतेषु तिष्ठतिं तं ( सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं असणारा त्याला ) **आत्मानं** ( आत्म्याला, ईश्वराला ) **सर्वभूतानि**= सर्वाणि भूतानि ( सर्व भूतमात्र ) **च** ( आणि ) **आत्मनि** (आत्म्याच्या ठिकाणीं, ईश्वराच्या ठिकाणीं ) **ईक्षते** ( पहातो ) **योगयुक्तात्मा** =योगेन युक्तः आत्मा यस्य सः ( योगाभ्यासानें ज्याचा आत्मा समाधिष्ठ तो ) **सर्वत्र** ( सर्वत्र ठिकाणीं ) **समदर्शनः** ( सारख्या दृष्टीनें पहाणारा )

योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः आत्मानं सर्वभूतस्थं आत्मनि च सर्व भूतानि ईक्षते.

योगाभ्यासांत गढलेला, सर्वत्र समदृष्टि असा तो योगी सर्वभूतमात्रांच्या ठिकाणीं ईश्वर आहे आणि ईश्वराच्या ठिकाणीं सर्व भूतमात्र आहेत असें पाहतो ॥ २९ ॥

**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।**
**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ३० ॥**

**यः** ( जो ) **मां** ( मला ) **पश्यति** ( पहातो ) **सर्वत्र** (सर्व ठिकाणीं) **सर्वं** ( सर्व ) **च** ( आणि ) **मयि** ( माझ्या ठिकाणीं ) **पश्यति** (पहातो) **तस्य** ( त्याला ) **अहं** ( मी ) **न प्रणश्यामि** (नाहींसा होत नाहीं). **सः** ( तो ) **च** (आणि) **मे** (मला) **न प्रणश्यति** (नाहींसा होत नाहीं).

यः मां सर्वत्र पश्यति, सर्वं च मयि पश्यति, तस्य अहं न प्रणश्यामि, सः च मे न प्रणश्यति.

सर्वांच्या ठिकाणीं मी आहें आणि माझ्या ठिकाणीं सर्व आहेत असें जो पहातो त्याला माझा, किंवा मला त्याचा, वियोग मुळींच होत नाहीं ॥३०॥

**सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः ।**
**सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥ ३१ ॥**

**सर्वभूतस्थितं**=सर्वेषु भूतेषु स्थितं ( सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं असलेला ) **यः** ( जो ) **मां** ( मला ) **भजति** ( भजतो , पूजन करतो) **एकत्वं** ( एकच अशा भावनेला, ऐक्याला ) **आस्थितः** (निष्ठा ठेवणारा) **सर्वथा** ( सर्व प्रकारें )**वर्तमानः** ( जगांत वावरणारा ) **अपि** ( सुद्धां ) **सः** ( तो ) **योगी** ( योगी ) **मयि** ( माझ्यांत ) **वर्तते** ( राहतो )

यः एकत्वं आस्थितः सर्वभूतस्थितं मां भजति, सः योगी सर्वथा वर्तमानः अपि मयि वर्तते.

सर्व भूतांविषयीं ज्याचा एकात्मभाव झालेला असा जो योगी सर्व भूतमात्रांत असणाऱ्या मला भजतो, तो सर्व प्रकारें ( जगांत ) वागत असला तरी मजमध्येंच असतो ॥ ३१ ॥

**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।**
**सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥ ३२ ॥**

**आत्मौपम्येन**=आत्मनः औपम्येन ( आपल्या उपमेनें, आपल्याप्रमाणें ) **सर्वत्र** ( सर्व ठिकाणीं )**समं** ( समत्वानें, एकदृष्टीनें ) **पश्यति** ( पाहतो ) **यः** ( जो ) **अर्जुन** ( अर्जुना ) **सुखं** ( सुख ) **वा** (अथवा) **यदि** ( जरी ) **वा** ( अथवा ) **दुःखं** ( दुःख ) **सः** ( तो ) **योगी** ( योगी ) **परमः** ( उत्तम ) **मतः** ( मानला जातो ).

अर्जुन, ( यदि ) सुखं वा यदि दुःखं वा यः आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति सः योगी परमः मतः.

आपल्याप्रमाणेंच सर्वांचा आत्मा आहे अशा समदृष्टीनें दुसऱ्यास जें सुख-दुःख तेंच आपल्यास होत आहे असें जो समजतो ( आणि दयाळूपणानें परदुःख निवारण करतो ), तो योगी सर्वांत श्रेष्ठ होय ॥ ३२ ॥

अर्जुन उवाच—योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन ।

**एतस्याहं न पश्यामि चंचलत्वात्स्थितिं स्थिराम् ॥ ३३ ॥**

**यः** ( जो ) **अयं** ( हा ) **योगः** ( योग ) **त्वया** ( तुवां ) **प्रोक्तः** ( सांगितला ) **साम्येन** ( समानबुद्धीनें प्राप्त होणारा ) **मधुसूदन** ( हे कृष्ण ) **एतस्य** ( ह्याचा ) **अहं** ( मी ) **न पश्यामि** ( पहात नाहीं ) **चंचलत्वात्** ( अस्थिर असल्यापासून ) **स्थितिं** ( स्थाईक राहणें ) **स्थिराम्** ( दृढ ).

मधुसूदन, त्वया यः अयं योगः साम्येन प्रोक्तः एतस्य ( तस्य ) स्थिरां स्थितिं चंचलत्वात् ( मनसः ) अहं न पश्यामि.

अर्जुन म्हणालाः—हे मधुसूदना, समान बुद्धि ठेवून प्राप्त होणारा हा योग तुम्हीं सांगितला, तो मनाच्या चंचलपणामुळें कायमचा राहील असें मला दिसत नाहीं ॥ ३३ ॥

**चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवत् दृढम् ।**
**तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ३४ ॥**

**चंचलं** ( चळवळ करणारें ) **हि** ( खरोखर ) **मनः** ( मन ) **कृष्ण** ( हे कृष्ण ) **प्रमाथि** ( तक्रारी ) **बलवत्** ( बळानें भारी ) **दृढं** (हट्टी) **तस्य** ( त्याचा ) **अहं** (मी) **निग्रहं** ( आंवरून धरणें ) **मन्ये** (समजतों) **वायोः** ( वाऱ्याच्या ) **इव** ( प्रमाणें ) **सुदुष्करम्** ( करण्याला कठीण, असाध्य ).

कृष्ण, मनः चचलं प्रमाथि बलवत् दृढं ( अस्ति ) हि तस्य निग्रहं वायोः ( निग्रहं ) इव दुष्करं अहं मन्ये.

हे कृष्ण ! मन हें चंचल, तक्रारी, बलिष्ठ आणि हट्टी आहे, त्याला आंवरून धरणें हें वारा आंवरून धरण्यासारखें ( वाऱ्याची मोठ बांधण्यासारखें ) फार अवघड आहे असें मला वाटतें ॥ ३४ ॥

श्रीभगवानुवाच—**असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।**
**अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥**

**असंशयं** ( निःसंशय ) **महाबाहो** ( हे अजानुबाहो, अर्जुना ) **मनः** ( मन ) **दुर्निग्रहं** ( आंवरण्याला कठीण ) **चलम्** ( चंचल ) **अभ्यासेन**

( अभ्यानें ] तु [ परंतु ] कौंतेय [ कुंतिपुत्रा, अर्जुना ] वैराग्येण ( वैराग्यानें ) च (आणि ) गृह्यत ( आंवरतां येतें).

महाबाहो, असंशयं मनः चलं दुर्निग्रहं, कौंतेय, तु अभ्यासेन वैराग्येण च गृह्यते.

श्रीभगवान् म्हणालेः—हे महाबाहो, मन हें आवरण्याला कठीण असून फार चंचळ आहे हें निःसंशय खरें आहे; परंतु अर्जुना, अभ्यासानें आणि वैराग्यानें तें स्वाधीन ठेवतां येतें ॥ ३५ ॥

**असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः ।**
**वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥ ३६ ॥**

**असंयतात्मना** = असंयतः आत्मा यस्य सः ( ज्याचें मन स्वाधीन नाहीं त्याच्यानें ) **योगः** ( योग ) **दुष्प्रापः** ( साध्य होण्याला कठीण ) **इति** ( याप्रमाणें ) **मे** ( माझें ) **मतिः** ( मत ) **वश्यात्मना** = वश्यः आत्मा यस्य तेन ( ज्याचें मन स्वाधीन आहे त्यानें ) **तु** (परंतु) **यतता** ( प्रयत्न करणाऱ्याला ) **शक्यः** ( साधण्याजोगें ) **अवाप्तुम्** ( मिळविण्याला ) **उपायतः** ( उपायांनीं ).

असंयतात्मना योगः दुष्प्रापः वश्यात्मना तु यतता उपायतः अवाप्तुं शक्यः, इति मे मतिः.

ज्याला मन स्वाधीन ठेवतां येत नाहीं त्याच्यानें योगसाधन होणें दुःसाध्य आहे; परंतु जो आत्मनिग्रही आहे त्यानें प्रयत्न केल्यास त्याला उपायांनीं योग साध्य करतां येईल असें माझें मत आहे ॥ ३६ ॥

अर्जुन उवाच— **अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलित मानसः ।**
**अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥ ३७ ॥**

**अयतिः** ( इंद्रियनिग्रह करण्यास असमर्थ ) **श्रद्धया** ( भक्तीनें ) **उपेतः** ( युक्त झालेला ) **योगात्** ( योगापासून ) **चलितमानसः** = चलितं मानसः यस्य सः ( ज्याचें मन चंचल तो ) **अप्राप्य** (न मिळतां) **योगसंसिद्धिं** = योगस्य संसिद्धिं ( योगाची पूर्णता ) **कां** ( कोणत्या ) **गतिं** ( गतीला ) **कृष्ण** ( अहो कृष्ण ) **गच्छति** ( जातो ).

कृष्ण, श्रद्धया उपेतः अयतिः योगात् चलितमानसः योगसंसिद्धिं अप्राप्य कां गतिं गच्छति ?

अहो कृष्ण ! श्रद्धेनें युक्त असूनहि चंचल मन आंवरतां न आल्यामुळें योगप्राप्ति न होतां जो योगापासून ढळतो तो कोणत्या गतीला जातो ? ।३७।

**कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।**
**अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥ ३८ ॥**

**कच्चित्** ( तेंच काय ) **न** ( नाहीं ) **उभयविभ्रष्टः** = उभयतः विभ्रष्टः ( दोहोंकडून पतन पावलेला ) **छिन्नाभ्रम्** = छिन्नं अभ्रं ( विसकटलेला ढग ) **इव** ( याप्रमाणें ) **नश्यति** ( नाश पावतो ) **अप्रतिष्ठः** ( चळणारा ) **महाबाहो** ( अजानुबाहो, कृष्णा ) **विमूढः** ( मतिभ्रष्ट ) **ब्रह्मणः** ( ब्रह्माच्या ) **पथि** ( मार्गांत ).

महाबाहो, ब्रह्मणः पथि अप्रतिष्ठः विमूढः, उभयविभ्रष्टः छिन्नाभ्रं इव न नश्यति कच्चित् ?

हे महाबाहो, मोक्षमार्गापासून चळणारा मतिभ्रष्ट दोन्हीहि ( कर्ममार्ग आणि योगमार्ग ) मार्गांपासून भ्रष्ट झालेला पुरुष विसकटलेल्या ढगाप्रमाणें नाश पावत नाहींना ? ॥ ३८ ॥

**एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः ।**
**त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता नह्युपपद्यते ॥ ३९ ॥**

**एतत्** = एतं (हा) **मे** ( माझा ) **संशयं** ( संशय ) **कृष्ण** (हे कृष्ण) **छेत्तुम् अर्हसि** ( त्वां काढून टाकला पाहिजे ) **अशेषतः** ( समूळ ) **त्वदन्यः** = त्वत्तः अन्यः ( तुझ्याकडून दुसरा ) **संशयस्य** (संशयाचा) **अस्य** ( याचा ) **छेत्ता** (तोडून टाकणारा, काढून टाकणारा) **न** (नाहीं) **हि** ( खरोखर ) **उपपद्यते** ( मिळावयाचा आहे ).

कृष्ण, एतत् ( एतं ) मे संशयं अशेषतः छेत्तुम् अर्हसि; त्वदन्यः अस्य संशयस्य छेत्ता न हि उपपद्यते.

अहो कृष्ण, माझा हा संशय तुम्हीं समूळ काढून टाकला पाहिजे, या संशयाचा उलगडा करणारा तुमच्यावांचून दुसरा कोणी मला मिळणार नाहीं ॥ ३९ ॥

श्रीभगवानुवाच—पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ।
न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥ ४० ॥

पार्थ ( अर्जुना ) न ( नाहीं ) एव ( केवळ ) इह ( येथें ) न ( नाहीं ) अमुत्र ( जन्मांतरीं ) विनाशः ( नाश ) तस्य ( त्याचा ) विद्यते ( आहे ) न ( नाहीं ) हि ( कारण ) कल्याणकृत् ( चांगलीं कर्में करणारा ) कश्चित् ( कोणीहि ) दुर्गतिं ( वाईट गतीला = नीच योनीला ) तात ( बाबा ) गच्छति ( जातो ).

पार्थ, न इह एव न अमुत्र तस्य विनाशः विद्यते, हि, तात कल्याणकृत् कश्चित् दुर्गतिं न गच्छति.

श्रीभगवान् म्हणालेः— अर्जुना, त्याचा (योगभ्रष्टाचा) या लोकीं किंवा परलोकीं नाश होत नाहीं; कारण कल्याणदायक कर्में करणारा कोणीहि, बा अर्जुना, अधोगतीला जात नाहीं ॥ ४० ॥

प्राप्य पुण्यकृतां लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।
शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ ४१ ॥

प्राप्य ( मिळवून ) पुण्यकृतां ( पुण्यकर्में करणारांचा ) लोकान् ( स्वर्गादि लोक ) उषित्वा ( वास्तव्य करून ) शाश्वतीः ( पुष्कळ ) समाः ( वर्षें ) शुचीनां ( पवित्र ) श्रीमतां ( भाग्यवंत, श्रीमंत ) गेहे ( घरीं ) योगभ्रष्टः = योगात् भ्रष्टः ( योगापासून ढळलेला ) अभिजायते ( जन्म पावतो )

योगभ्रष्टः पुण्यकृतां लोकान् प्राप्य, शाश्वतीः समाः उषित्वा शुचीनां श्रीमतां गेहे अभिजायते.

पुण्यकर्में करणाऱ्या पुरुषांना प्राप्त होणारा उत्तम लोक योगभ्रष्टाला मिळून तेथें तो पुष्कळ वर्षें वास करतो, नंतर पवित्र अशा भाग्यवानाच्या घरीं जन्म पावतो ॥ ४१ ॥

अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।
एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥ ४२ ॥

अथवा ( किंवा ) योगिनाम् ( योग्यांच्या ) एव ( देखील )

कुले ( कुटुंबांत ) भवति ( होतो, जन्म घेतो ) धीमतां ( बुद्धिवान् लोकांच्या ) एतत् ( हें ) हि ( कारण ) दुर्लभतरं ( प्राप्त होणें फार अवघड ) लोके ( ह्या लोकीं ) जन्म ( जन्म ) यदीदृशम् = यस्य ईदृशम् ( ज्यासारखें ).

अथवा धीमतां योगिनाम् एव कुले ( जन्म ) भवति; हि यदीदृशं एतत् जन्म लोके दुर्लभतरं.

अथवा बुद्धिमान् अशा योग्यांच्याच कुटुंबांत जन्म घेतो; अशा कुटुंबांत या लोकीं जन्म येणें फार दुर्लभ आहे ॥ ४२ ॥

तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।
यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥ ४३ ॥

तत्र ( तेथें ) तं ( त्याला ) बुद्धिसंयोगं = बुद्धेः संयोगं ( बुद्धीची जोड ) लभते ( मिळवितो ) पौर्वदेहिकं ( पूर्व जन्माची ) यतते ( यत्न करतो ) च ( आणि ) ततः ( तेथून ) भूयः (पुनः) संसिद्धौ ( पूर्णतेविषयीं ) कुरुनंदन ( अर्जुना ).

कुरुनंदन, तत्र तं पौर्वदेहिकं बुद्धिसंयोगं लभते; च ततः संसिद्धौ भूयः यतते.

अर्जुना, तेथें ( योग्यांच्या कुटुंबांत ) त्याला पूर्व जन्माच्या बुद्धीची जोड मिळते आणि तेथून पूर्णत्वाला पावण्याकरतां ( योगसिद्धीकरतां ) पुनः प्रत्यन करतो ॥ ४३ ॥

पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ।
जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥ ४४ ॥

पूर्वाभ्यासेन = पूर्वेण अभ्यासेन (पूर्वीच्या अभ्यासानें) तेन (त्यानें) एव ( केवळ ) ह्रियते ( ओढला जातो ) हि ( खरोखर ) अवशः ( निर्बळ होऊन ) अपि ( सुद्धां ) सः ( तो ) जिज्ञासुः ( जाणण्याची उत्सुकता ज्याला तो ) अपि ( सुद्धां ) योगस्य ( योगाच्या ) शब्दब्रह्म ( कर्मफलप्रतिपादक = सकाम कर्मप्रेरक वेद ) अतिवर्तते ( पलीकडे जातो ).

सः अवशः अपि तेन एव पूर्वाभ्यासेन ह्रियते; योगस्य जिज्ञासुः अपि शब्दब्रह्म अतिवर्तते.

पूर्व जन्मींच्या अभ्यासामुळें त्याची इच्छा नसतांहि तो (योगाभ्यासाकडे) ओढला जातो; योग काय आहे इतकेंच समजून घेण्याची उत्कट इच्छा असली तरी ( क्रमाक्रमानें ) तो शब्दब्रह्मापलीकडे जातो ( आत्मज्ञानास अधिकारी होतो ) ॥ ४४ ॥

**प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ।**
**अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परांगतिम् । ४५ ॥**

**प्रयत्नात्** ( एकसारखा प्रयत्न करीत असल्यानें ) **यतमानः** ( इंद्रियनिग्रह करून योगाभ्यास करणारा ) **तु** ( खरोखर ) **योगी** ( योगी ) **संशुद्धकिल्बिषः** = संशुद्धं किल्बिषं यस्य सः ( ज्याचें पाप पूर्णपणें धुऊन जाऊन पवित्र झाला तो ) **अनेकजन्मसंसिद्धः** (पुष्कळ जन्मांनीं पूर्णतेस पावलेला ) **ततः** ( तेथून ) **याति** ( जातो ) **पराम्** ( उत्कृष्ट ) **गतिम्** ( गतीला ).

प्रयत्नात् यतमानः संशुद्धकिल्बिषः योगी तु अनेकजन्मसंसिद्धः ततः परां गतिं याति.

इंद्रियनिग्रह करून निरिच्छ व निर्मळ बुद्धीनें योगाभ्यास करणारा योगी एकसारखा प्रयत्न करीत असल्यामुळें सर्व पापापासून मुक्त होऊन अनेक जन्मांत असें करितां करितां सिद्धि पावून शेवटीं उत्तम गतीला जातो ।४५।

**तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।**
**कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥४६ ॥**

**तपस्विभ्यः** ( तपस्व्यांहून ) **अधिकः** ( श्रेष्ठ ) **योगी** ( योगी ) **ज्ञानिभ्यः** ( ज्ञान्यांपेक्षां ) **अपि** ( सुद्धां ) **मतः** ( मानलेला आहे ) **अधिकः** ( श्रेष्ठ ) **कर्मिभ्यः** ( कर्म आचरणारांपेक्षां, कर्मठांपेक्षां ) **च** ( आणि ) **अधिकः** ( श्रेष्ठ ) **योगी** ( योगी ) **तस्मात्** ( म्हणून ) **योगी** ( योगी ) **भव** ( हो ) **अर्जुन** ( अर्जुना )




योगी तपस्विभ्यः अधिकः, ज्ञानिभ्यः अपि अधिकः मतः, च कर्मिभ्यः योगी अधिकः, तस्मात् अर्जुन ! योगी भव.

केवळ जे तपस्वी, त्यांहून योगी श्रेष्ठ; तसेंच जे नुसते ज्ञानी त्यापेक्षां तो ( योगी ) श्रेष्ठ मानलेला आहे, आणि कर्मठांपेक्षांहि तो श्रेष्ठ आहे; याकरतां अर्जुना ! तूं योगी ( ज्ञान प्राप्त होऊनहि निष्काम व अहंकारबुद्धीनें कर्म करीत असणारा ) हो ॥ ४६ ॥

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना ।**
**श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥ ४७ ॥**

**योगिनाम्** ( योग्यांच्या ) **अपि** ( सुद्धां ) **सर्वेषां** ( सर्वांच्या ) **मद्गतेन** = **मां गतेन** ( माझ्या ठिकाणीं गेलेला ) **अंतरात्मना** ( पूर्ण अंतःकरणानें ) **श्रद्धावान्** ( भाव ठेवून ) **भजते** ( भजतो ) **यः** (जो) **मां** ( मला ) **सः** ( तो ) **मे** ( मला ) **युक्ततमः** ( निश्चित उत्तम ) **मतः** ( मान्य असलेला ).

सर्वेषां योगिनां अपि, यः श्रद्धावान् मद्गतेन अंतरात्मना मां भजते, सः मे युक्ततमः मतः.

जो निष्ठापूर्वक शुद्ध अंतःकरणानें माझ्या स्वरूपीं लक्ष ठेवून मला भजतो, तो माझ्या मतें सर्व योग्यांमध्यें श्रेष्ठ होय ॥ ४७ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अध्यात्मयोगो नाम षष्ठोऽध्यायः

---

# अध्याय सातवा.

श्रीभगवानुवाच—मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन्मदाश्रयः ।
असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥ १ ॥

मयि ( माझ्या ठिकाणीं ) आसक्तमनाः = ( आसक्तं मनः यस्य सः ( ज्याचें मन आसक्त आहे तो ) पार्थ ( अर्जुना ) योगं ( योग ) युञ्जन् ( अनुष्ठान करणारा ) मदाश्रयः = अहं आश्रयः यस्य सः ( ज्याचा आश्रय मी आहें असा जो तो ) असंशयं ( निश्चयात्मक ) समग्रं ( सर्व ) मां ( मला ) यथा ( जसें ) ज्ञास्यसि ( जाणशील ) तत् ( तें ) श्रृणु ( ऐक ).

पार्थ मयि आसक्तमनाः मदाश्रयः ( त्वं ) योगं युञ्जन् असशयं समग्रं यथा ज्ञास्यसि तत् श्रृणु.

भगवान् म्हणालेः—अर्जुना, माझ्या ठिकाणीं मन सर्वथा लीन करून व माझाच आश्रय धरून तूं योगाभ्यास करूं लागलास तर माझ्या स्वरूपाचें निःसंशय व पूर्ण ज्ञान कसें होईल तें ( सांगतों ) ऐक ॥ १ ॥

ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः ।
यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥

ज्ञानं ( ज्ञान ) ते ( तुला ) अहं ( मी ) सविज्ञानम् = विज्ञानेन सह ( अनुभवयुक्त ज्ञानासुद्धां ) इदं ( हें ) वक्ष्यामि ( उघड करून दाखवीन ) अशेषतः ( समग्र ) यत् ( जें ) ज्ञात्वा (जाणलें असतां) न ( नाहीं ) इह ( येथें ) भूयः ( आणखी ) अन्यत् (दुसरें) ज्ञातव्यं ( जाणण्याजोगें ) अवशिष्यते ( राहतें ).

अहं ते इदं सविज्ञानं ज्ञानं अशेषतः वक्ष्यामि; यत् ज्ञात्वा इह भूयः अन्यत् ज्ञातव्यं न अवशिष्यते.

मी तुला अनुभवयुक्त ज्ञानासह हें ज्ञान संपूर्णत्वानें सांगतों; तें समजलें ह्मणजे दुसरें आणखी कांहीं येथें जाणण्याजोगें उरत नाहीं ॥२॥

मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।
यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्वतः ॥ ३ ॥

**मनुष्याणां** ( मनुष्यांमध्यें ) **सहस्रेषु** (हजारांत) **कश्चित्** (एखादा) **यतति** ( यत्न करतो ) **सिद्धये** ( पूर्णत्वाकरितां ) **यततां** (यत्न करणारांपैकीं ) **अपि** ( सुद्धां ) **सिद्धानां** ( पूर्णत्व पावलेल्यांत ) **कश्चित्** ( एखादा ) **मां** ( मला ) **वेत्ति** ( जाणतो ) **तत्वतः** (खऱ्या स्वरूपानें).

मनुष्याणां सहस्रेषु कश्चित् सिद्धये यतति; यतताम् सिद्धानाम् अपि कश्चित् मां तत्वतः वेत्ति.

हजारों मनुष्यांत एखदाच पूर्णत्व मिळण्याकरितां यत्न करतो; व यत्न करणारांपैकीं पूर्णत्व पावलेल्यांत ( सिद्धांत ) सुद्धां मला खऱ्या स्वरूपानें जाणणारा एखादाच असतो ॥ ३ ॥

भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥

**भूमिः** ( पृथ्वी ) **आपः** ( जल ) **अनलः** ( अग्नि ) **वायुः** ( वायु ) **खं** ( आकाश ) **मनः** ( मन ) **बुद्धिः** ( बुद्धि ) **एव** ( देखील ) **च** ( आणि ) **अहंकारः** ( अहं प्रत्यय ) **इति** ( याप्रमाणें ) **इयं** ( ही ) **मे** ( माझी ) **भिन्ना** ( निराळी झालेली ) **प्रकृति** ( स्वरूप ) **अष्टधा** ( आठ प्रकारची ).

भूमिः आपः अनलः वायुः खं मनः बुद्धिः एव च अहंकार इति अष्टधा भिन्ना मे इयं प्रकृतिः ( अस्ति ).

---

१ ईश्वरी स्वरूपाचें यथार्थ ज्ञान, तें ज्ञान; ईश्वरी मायेचें जें ज्ञान, तें विज्ञान; आणि प्रपंच खरा भासणें हें अज्ञान.

भूमि, जल, अग्नि, वायु, आकाश, मन, बुद्धि आणि अहं-प्रत्यय अशा आठ प्रकारांनीं माझें स्वरूप निरनिराळें प्रगट झालें आहे ॥ ४ ॥

**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।**
**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥**

अपरा ( कनिष्ठ दर्जाची ) इयं ( ही ) इतः ( इच्यापेक्षां ) तु ( खरोखर ) अन्यां ( दुसरी ) प्रकृतिं ( स्वरूप ) विद्धि ( जाण ) मे ( माझी ) पराम् ( वरची, श्रेष्ठ ) जीवभूतां ( चैतन्ययुक्त ) महाबाहो ( अर्जुना ) यया ( ज्यानें ) इदं ( हें ) धार्यते ( आधारिलें आहे ) जगत् ( जग ).

महाबाहो, इयं अपरा इतः तु अन्यां यया इदं जगत् धार्यते ( तां ) जीवभूतां मे पराम् प्रकृतिं विद्धि.

हे महाबाहो, हें ( वर सांगितलेलें ) स्वरूप कनिष्ठ दर्जाचें होय. या स्वरूपाहून दुसरें, जें या सर्व जगास आधारभूत झालें आहे तें, माझें चैतन्ययुक्त श्रेष्ठ स्वरूप समजून घे ॥५॥

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।**
**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥**

एतद्योनीनि = एषा योनिः येषां तानि ( हें उत्पत्तिस्थान ज्यांचें अशीं ) भूतानि ( चराचर वस्तू ) सर्वाणि ( सर्व ) इति ( याप्रमाणें ) उपधारय ( समज ) अहं ( मी ) कृत्स्नस्य ( सर्व ) जगतः ( जगाच्या ) प्रभवः ( उत्पन्नकर्ता ) प्रलयः ( लयकर्ता ) तथा ( त्याप्रमाणें ).

सर्वाणि भूतानि एतद्योनीनि इति उपधारय, अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः तथा प्रलयः.

या ( दोन्ही प्रकृति ) सर्व चराचर वस्तुमात्राचें उत्पत्तिस्थान आहेत हें लक्षांत ठेव, व ह्मणूनच माझ्यापासून सर्व जगाची उत्पत्ति आहे, तसेंच माझ्या ठिकाणीं सर्व लय पावतें ॥ ६ ॥

मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ।
मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥

मत्तः ( माझ्यापेक्षां ) परतरं ( श्रेष्ठ ) न ( नाहीं ) अन्यत् (दुसरें) किंचित् ( कांहींही ) अस्ति ( आहे ) धनंजय ( अर्जुना ); मयि ( माझ्यामध्यें ) सर्वं ( सर्व ) इदं ( हें ) प्रोतं ( ओवलेलें आहे ) सूत्रे ( सुतांत ) मणिगणाः ( मण्यांच्या पंक्ति ) इव ( प्रमाणें ).

धनंजय, मत्तः परतरं अन्यत् किंचित् न अस्ति; सूत्रे मणिगणाः इव इदं सर्वं मयि प्रोतं.

हे धनंजया, माझ्याहून श्रेष्ठ असें दुसरें कांहीं नाहीं; ज्याप्रमाणें माळेच्या दोऱ्याचा आधार सर्व मण्यांस ( असतो ), त्याप्रमाणें सर्वांला माझा आधार आहे ॥ ७ ॥

रसोऽहमप्सु कौंतेय प्रभाऽस्मि शशिसूर्ययोः ।
प्रणवः सर्व वेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥

रसः ( रस ) अहं ( मी ) अप्सु (पाण्यांतील) कौंतेय (अर्जुना) प्रभा ( तेज ) अस्मि ( मी आहें ) शशिसूर्ययोः = शशिनः च सूर्यस्य च ( चंद्राचें आणि सूर्याचें ) प्रणवः ( प्रणव, ॐकार, पूज्यत्व ) सर्व वेदेषु ( सर्व वेदांतील ) शब्दः ( शब्द, ध्वनि ) खे ( आकाशांतील ) पौरुषं ( पुरुषतेज = पुरुषपराक्रम ) नृषु ( मनुष्यांतील ).

कौंतेय, अहं अप्सु रसः, शशिसूर्ययोः प्रभा अस्मि; सर्व वेदेषु प्रणवः, खे शब्दः, नृषु पौरुषम् ( अस्मि ).

हे कुंतपुत्रा, मी जलांतील रस आहें, चंद्र, सूर्य यांच्यांतील तेज मी आहें, सर्व वेदांतील पूज्यत्व, आकाशांतील शब्द आणि मनुष्यांतील पराक्रम हीं सर्व मी आहें ॥ ८ ॥

पुण्यो गंधः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ।
जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥

पुण्यः ( शुद्ध ) गंधः ( सुवास ) पृथिव्याम् ( पृथ्वींतील ) च



( आणि ) तेजः ( प्रकाश ) च (आणि) अस्मि (मी आहें) विभावसौ

( अग्नींतील ) जीवनं ( जीवित्व ) सर्वभूतेषु ( सर्व प्राण्यांतील ) तपः ( तप ) च ( आणि ) अस्मि ( मी आहें ) तपस्विषु (तपस्व्यांतील).

च ( अहं ) पृथिव्यां पुण्यः गंधः, च विभावसौ तेजः अस्मि, सर्वभूतेषु जीवनं, च तपस्विषु तपः अस्मि.

आणि पृथ्वींतील शुद्ध सुवास तो मी आहें; अग्नींतील तेज मी होय; सर्व प्राण्यांतील जीवित्व ( प्राण ) आणि तपस्व्यांतील तप मी आहें ॥ ९ ॥

**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् ।**
**बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥ १० ॥**

**बीजं** ( बीज ) **मां** (मला) **सर्वभूतानां** (सर्व चराचर वस्तुमात्रांचें) **विद्धि** ( जाण ) **पार्थ** ( अर्जुना ) **सनातनम्** ( चिरंतन ) **बुद्धिः** ( बुद्धि ) **बुद्धिमताम्** ( बुद्धिमंत लोकांची ) **अस्मि** ( मी आहें ) **तेजः** ( तेज ) **तेजस्विनाम्** ( तेजस्वी लोकांचें ) **अहं** ( मी ).

पार्थ मां सर्वभूतानां सनातनं बीजं विद्धि; अहं बुद्धिमतां बुद्धिः अस्मि; अहं तेजस्विनां तेजः अस्मि.

पार्थ ! सर्व चराचर वस्तुमात्रांचें चिरंतन बीज मी आहें, असें समज; बुद्धिवंत लोकांची बुद्धि, तसेंच तेजस्वी लोकांचें तेज मी आहें ॥ १० ॥

**बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम् ।**
**धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥ ११ ॥**

**बलं** ( शक्ति ) **बलवतां** ( बलवानांची ) **च** ( आणि ) **अहं** (मी) **कामरागविवर्जितं**=कामेन च रागेण च विवर्जितं ( इच्छेनें व प्रीतीनें विरहित ) **धर्माविरुद्धः**=धर्मेण अविरुद्ध ( धर्माला सोडून नसणारी ) **भूतेषु** ( प्राणिमात्रांतील ) **कामः** ( इच्छा ) **अस्मि** ( मी आहें ) **भरतर्षभ** ( भरतकुलश्रेष्ठा ).

च अहं बलवतां कामरागविवर्जितं बलं अस्मि; ( हे ) भरतर्षभ, भूतेषु धर्माविरुद्धः कामः अहं अस्मि.

इच्छेनें आणि तृष्णेनें विरहित जी बलवानाची शक्ति ती मी आहें; हे भरतकुलश्रेष्ठा ! प्राण्यांतील धर्माला विरुद्ध नसणारी जी इच्छा ती मीच आहें ॥ ११ ॥

**ये चैव सात्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।**
**मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥ १२ ॥**

**ये** ( जे ) **च** ( आणि ) **एव** ( सुद्धां ) **सात्विकः** ( शुद्ध ) **भावाः** ( स्वभाव ) **राजसाः** ( राजस ) **तामसाः** ( तामस ) **च** ( आणि ) **ये** ( जे ) **मत्तः** ( माझ्यापासून ) **एव** ( केवळ ) **इति** ( याप्रमाणें ) **तान्** ( हीं ) **विद्धि** ( जाण ) **न** ( नाहीं ) **तु** ( खरोखरी ) **अहं** ( मी ) **तेषु** ( त्यांमध्यें ) **ते** ( ते ) **मयि** ( माझ्यामध्यें ).

ये एव सात्विकाः भावाः च राजसाः च ये तामसाः (भावाः संति) तान् मत्तः एव इति विद्धि; अहं तु तेषु न ( अस्मि ) ते मयि ( वर्तंते ).

जे जे ह्मणून सात्विक, राजस आणि तामस भाव आहेत, ते सर्व केवळ माझ्यापासून उत्पन्न झाले आहेत असें समज; खरोखरीं मी त्यांच्यामध्यें नाहीं ( मीं त्यांच्या स्वाधीन नसतों ). ते माझ्यामध्यें आहेत ( ते माझ्या स्वाधीन आहेत) ॥ १२ ॥

**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।**
**मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ १३ ॥**

**त्रिभिः** ( तिहींनीं ) **गुणमयैः** ( गुणात्मक ) **भावैः** ( भावनांनीं ) **एभिः** ( ह्यांनीं ) **सर्वम्** ( सर्व ) **इदं** ( हें ) **जगत्** ( जग ) **मोहितं** ( मोहून गेलें आहे ) **न** ( नाहीं ) **अभिजानाति** ( ओळखीत ) **माम्** ( मला ) **एभ्यः** ( यांच्यापेक्षां ) **परम्** ( श्रेष्ठ ) **अव्ययम्** ( अविनाशी)

एभिः त्रिभिः गुणमयैः भावैः इदं सर्वं जगत् मोहितं; ( यतः ) एभ्यः परं अव्ययं मां न अभिजानाति.

या त्रिगुणात्मक विकारांनीं हें सर्व जग मोहून गेलें आहे, त्यामुळें त्यांच्यापेक्षां श्रेष्ठ व अविनाशी असा जो मी त्या मला हें (जग) ओळखीत ( जाणत ) नाहीं ॥ १३ ॥

दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।
मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ॥ १४

दैवी ( परमेश्वरी ) हि ( खरोखर ) एषा ( ही ) गुणमयी ( गुणात्मक ) मम ( माझी ) माया ( माया ) दुरत्यया ( उल्लंघून जाण्याला कठीण ) माम् ( मला ) एव ( च ) ये ( जे ) प्रपद्यंते ( पोंचतात ) मायां ( मायेला) एतां ( या ) तरंति ( उल्लंघून जातात ) ते ( ते ).

एषा दैवी गुणमयी मम माया हि दुरत्यया (अस्ति); ये मां एव प्रपद्यंते ते एतां मायां तरंति.

ही परमेश्वरी त्रिगुणात्मक माझी माया उल्लंघून जाण्याला खरोखर फार अवघड आहे; जे मलाच शरण येतात ते या मायेला तरून जातात. ।१४।

न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यंते नराधमाः ।
माययाऽपहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥ १५ ॥

न ( नाहीं ) मां ( मला ) दुष्कृतिनः ( दुष्ट कर्त्यें करणारे ) मूढाः ( मूर्ख ) प्रपद्यंते ( पोंचतात ) नराधमाः (मनुष्यांत अधम) मायया ( मायेच्या योगानें ) अपहृतज्ञानाः ( ज्यांचें ज्ञान नष्ट झालें आहे असे ) आसुरं ( राक्षसी ) भावं ( स्वभाव ) आश्रिताः ( आश्रय केलेले ).

मायया अपहृतज्ञानाः आसुरं भावं आश्रिताः दुष्कृतिनः मूढाः नराधमाः मां न प्रपद्यंते.

मायेच्या योगानें ज्यांचें ज्ञान नष्ट झालें आहे, ज्यांचा स्वभाव राक्षसी आहे, जे दुष्ट कृत्यें करणारे मूर्ख आणि मानवयोनींत येऊन अधमवृत्तीनें वागणारे असे आहेत, ते मजकडे ( मला शरण ) येत नाहींत ॥ १५ ॥

चतुर्विधा भजंते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।
आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १६ ॥

चतुर्विधाः ( चार प्रकारचे ) भजंते ( भजतात ) मां ( मला ) जनाः ( लोक ) सुकृतिनः (चांगलें कर्म करणारे) अर्जुन (हे अर्जुना) आर्तः ( दुःखपीडित ) जिज्ञासुः ( ज्ञान मिळवूं इच्छिणारे ) अर्थार्थी

( धन मिळवूं इच्छिणारे ) ज्ञानी (परमेश्वराचें तत्व जाणणारे) च (आणि) भरतर्षभ ( भरतकुलश्रेष्ठा ).

( हे ) अर्जुन, ( हे ) भरतर्षभ, आर्तः जिज्ञासुः अर्थार्थी च ज्ञानी (इति) चतुर्विधा सुकृतिनः जनाः मां भजंते.

हे भरतकुलश्रेष्ठा अर्जुना, चांगलें कर्म करणारे ( पुण्यवान् ) जे मला भजतात, ते चार प्रकारचे म्हणजे दुःखपीडित, ज्ञान मिळवूं इच्छिणारे, धन मिळवूं इच्छिणारे आणि परमेश्वराचें तत्व जाणणारे ( ज्ञानी ) असे चार प्रकारचे असतात ॥ १६ ॥

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एक भक्तिर्विशिष्यते ।**
**प्रियोहि ज्ञानियोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥ १७ ॥**

**तेषां** ( त्यांमध्यें ) **ज्ञानी** (परमेश्वराचें तत्व जाणणारा) **नित्ययुक्तः** ( निरंतर माझ्या ठिकाणीं निष्ठा ठेऊन असणारा ) **एकभक्तिः** ( एका परमेश्वराच्या ठिकाणीं ज्याची भक्ति आहे तो ) **विशिष्यते** (श्रेष्ठ आहे) **प्रियः** ( आवडता ) **हि** ( खरोखर ) **ज्ञानिनः** ( ज्ञान्यांला ) **अत्यर्थं** ( अतिशय , **अहं** ( मी ) **सः** ( तो ) **च** ( आणि ) **मम** ( मला ) **प्रियः** ( आवडता ).

तेषां नित्ययुक्तः एकभक्तिः ज्ञानी विशिष्यते, अहं हि ज्ञानिनः अत्यर्थं प्रियः ( अस्मि ) च सः मम प्रियः ( अस्ति ).

त्यांमध्यें ज्ञानी हा जो माझे ठिकाणीं निरंतर निष्ठा ठेऊन माझीच भक्ति करतो तो श्रेष्ठ होय. ज्ञानी पुरुषाला मी अत्यंत प्रिय असतों व तो मला प्रिय असतो ॥ १७ ॥

**उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।**
**आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥ १८ ॥**

**उदाराः** ( थोर ) **सर्वे** ( सर्व ) **एव** ( देखील ) **एते** ( हे ) **ज्ञानी** ( ज्ञानी ) **तु** ( खरोखर ) **आत्मा** ( स्वतां ) **एव** ( देखील ) **मे** ( माझें ) **मतम्** ( मत ) **आस्थितः** ( स्थिर झालेला ) **सः** ( तो ) **हि** ( खरोखर ) **युक्तात्मा** ( समाधिनिष्ठ ) **मां** ( मला ) **एव** (देखील) **अनुत्तमां** ( ज्याहून श्रेष्ठ नाहीं ) **गतिम्** ( गति ).

एते सर्वे एव उदाराः ( संति; ) ज्ञानी तु ( मम ) आत्मा एव ( अस्ति इति ) मे मतं; हि, युक्तात्मा सः अनुत्तमां गतिं मां एव आस्थितः ( अस्ति ).

हे सर्वही थोर आहेत, परंतु त्यांत ज्ञानी तर माझा आत्मा असें मी समजतों; कारण ज्यापेक्षां श्रेष्ठ गति नाहीं असा जो मी त्या माझे ठिकाणीं तो समाधिनिष्ठ असा राहतो ॥ १८ ॥

**बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते ।**
**वासुदेवः सर्वमिती स महात्मा सुदुर्लभः ॥ १९ ॥**

**बहूनां** ( पुष्कळ ) **जन्मनां** ( जन्मांचे ) **अंते** (शेवटीं) **ज्ञानवान्** ( ज्ञानी ) **मां** ( मला ) **प्रपद्यते** ( पावतो ) **वासुदेवः** ( वासुदेव ) **सर्वं** ( सर्व ) **इति** ( याप्रमाणें ) **सः** ( तो ) **महात्मा** ( ज्याचा आत्मा श्रेष्ठ आहे तो ) **सुदुर्लभः** ( फार क्वचित् आढळणारा ).

ज्ञानवान् बहूनां जन्मनां अंते ' सर्वं वासुदेव ' इति मां प्रपद्यते; सः महात्मा सुदुर्लभः ( अस्ति ).

ज्ञानी पुष्कळ जन्मांच्या शेवटीं माझ्याशीं तादात्म्य पावतो; ' सर्व कांहीं वासुदेव आहे' असें तो समजतो, असा महात्मा फार क्वचित् आढळतो ।१९।

**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यंतेऽन्यदेवताः ।**
**तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥ २० ॥**

**कामैः** ( इच्छांच्या योगानें ) **तैः तैः** ( त्या त्या ) **हृतज्ञानाः** ( ज्यांचें ज्ञान नष्ट झालें आहे ते ) **प्रपद्यंते** (प्राप्त होतात) **अन्य देवताः** ( दुसऱ्या देवता ) **तं, तं** ( त्या, त्या ) **नियमं** (नियमाला) **आस्थाय** ( पाळून ) **प्रकृत्या** ( स्वभावानें ) **नियताः** ( बद्ध झालेले ) **स्वया** ( आपापल्या ).

तैः तैः कामैः हृतज्ञानाः स्वया प्रकृत्या नियताः ( अज्ञानिनः ) तं तं नियमं आस्थाय अन्यदेवताः प्रपद्यंते.

निरनिराळया वासना प्रबळ झाल्यामुळें ज्यांचें ज्ञान नष्ट झालें आहे ते आपापल्या स्वभावानुसार देवता विशेषांचे निरनिराळे नियम पाळून इतर देवतांना भज[illegible]त ॥ २० ॥

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयाऽर्चितुमिच्छति ।**
**तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥ २१ ॥**

**यः यः** ( जो, जो ) **यां यां** ( जी जी) **तनुं** ( मूर्ति ) **भक्तः** ( भक्त ) **श्रद्धया** ( श्रद्धेनें ) **अर्चितुं** ( पूजा करण्याला ) **इच्छति** ( इच्छा करतो ) **तस्य, तस्य** ( त्याची त्याची ) **अचलां** ( दृढ ) **श्रद्धा** ( श्रद्धा ) **तां** ( त्या ) **एव** ( देखील ) **विदधामि** ( देतों ) **अहं** (मी).

यः यः भक्तः यां यां तनुं श्रद्धया अर्चितुं इच्छति, तां एव तस्य तस्य श्रद्धां अहं अचलां विदधामि.

जो जो भक्त ज्या ज्या देवतेच्या स्वरूपाची श्रद्धेनें पूजा करण्याची इच्छा करतो, त्याची त्या त्या देवतेच्या ठिकाणीं श्रद्धा मी दृढ करतों ॥ २१ ॥

**स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते ।**
**लभते च ततः कामान्मयैव विहितान्हि तान् ॥ २२ ॥**

**सः** ( तो ) **तया** ( त्या ) **श्रद्धया** ( श्रद्धेनें ) **युक्तः** ( युक्त होऊन ) **तस्याः** ( तिची ) **राधनं** ( पूजा ) **ईहते** ( प्रयत्न करतो ) **लभते** ( मिळवितो ) **च** ( आणि ) **ततः** ( त्यापासून ) **कामान्** ( इच्छा ) **मया** ( माझ्यानें ) **एव** ( खरोखर ) **विहितान्** ( नेमून दिलेल्या ) **हि** ( कारण ) **तान्** ( त्या इच्छांप्रत ).

सः तया श्रद्धया युक्तः तस्याः राधनं ईहते च ततः मया एव विहितान् तान् कामान् लभते हि.

तो त्या श्रद्धेनें युक्त होऊन त्या देवतेचें आराधन करतो आणि त्या योगानें खरोखर मींच पूर्वी नेमून दिल्याप्रमाणें त्यानें इच्छिलेल्या गोष्टी त्यास प्राप्त होतात ॥ २२ ॥

**अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।**
**देवान्देवयजो यांति मद्भक्ता यांति मामपि ॥ २३ ॥**

**अंतवत्** ( नाश पावणारे ) **तु** ( खरोखर ) **फलं** ( फल ) **तेषां** ( त्यांचें ) **तत्** ( तें ) **भवति** ( होतें ) **अल्पमेधसाम्** ( ज्यांची बुद्धि अल्प आहे असे ) **देवान्** ( देवांना ) **देवयजः** ( देवांची आराधना करणारे) **यांति** ( जातात ) **मद्भक्ताः** ( माझे भक्त ) **यांति** (जातात) **माम्** ( माझ्याकडे ) **अपि** ( सुद्धां ).

अल्पमेधसां तेषां तत् फलं तु अन्तवत् भवति, देवयजः देवान् यांति मद्भक्ताः अपि मां यांति.

अल्प बुद्धि अशा त्या भक्तांना प्राप्त होणारें फळ नाशवंत असतें. देवतांचे भक्त देवतांना जाऊन मिळतात आणि माझे भक्त मलाच येऊन मिळतात ॥ २३ ॥

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यंते मामबुद्धयः ।**
**परं भावमजानंतो ममाव्ययमनुत्तमम् ॥ २४ ॥**

**अव्यक्तं** ( उघड न होणारा ) **व्यक्तिम्** ( उघडकीस ) **आपन्नं** ( आला ) **मन्यंते** ( समजतात ) **माम्** ( मला ) **अबुद्धयः** ( अविचारी, अविवेकी ) **परं** ( अत्युच्च ) **भावं** ( स्वभाव ) **अजानंतः** ( न जाणून ) **मम** ( माझें ) **अव्ययं** (अविनाशी) **अनुत्तमम्** = नास्ति उत्तमः यस्मात् ( ज्यापेक्षां दुसरा उत्तम नाहीं, सर्वोत्तम).

मम परं अव्ययं अनुत्तमं भावं अजानंतः अबुद्धयः अव्यक्तं मां व्यक्तिं आपन्नं मन्यन्ते.

माझें अविनाशी अत्युच्च सर्वोत्तम स्वरूप न जाणून अविवेकी लोक अगोचर असा जो मी त्या मला देहधारी मानतात ॥ २४ ॥

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥ २५ ॥**

**न** ( नाहीं ) **अहं** ( मी ) **प्रकाशः** ( दृश्य, गोचर ) **सर्वस्य** ( सर्वांचा ) **योगमायासमावृतः** ( योगमायेनें वेष्टिलेला ) **मूढ** ( अज्ञानी ) **अयं** ( हा ) **न** ( नाहीं ) **अभिजानाति** ( समजत ) **लोकः** ( लोक ) **मां** ( मला ) **अजम्** ( जन्मरहित ) **अव्ययम्** ( अविनाशी ).

योगमायासमावृतः अहं सर्वस्य प्रकाशः न ( अस्मि ) अयं मूढः लोकः अजं अव्ययं मां न अभिजानाति.

योगमायेनें वेष्टिलेला असल्यामुळें मी सर्वांसच गोचर होतों असें नाहीं. जन्मरहित व अविनाशी असा जो मी त्या मला हे मूढ लोक पुरे ओळखीत नाहींत ॥ २५ ॥

वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।
भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥ २६ ॥

वेद ( जाणतों ) अहं ( मी ) समतीतानि ( गेलेले ) वर्तमानानि ( हल्लीं असलेले ) च ( आणि ) अर्जुन ( अर्जुना ) भविष्याणि ( पुढें होणारे ) च ( आणि ) भुतानि ( चराचरवस्तुमात्र ) मां ( मला ) तु ( खरोखरी ) वेद ( जाणीत ) न ( नाहीं ) कश्चन ( कोणीही ).

अर्जुन, अहं समतीतानि च वर्तमानानि च भविष्याणि भूतानि वेद; कश्चन मां तु न वेद.

अर्जुना ! मी पूर्वी होऊन गेलेले आणि हल्लीं असलेले आणि पुढें होणारे चराचर वस्तुमात्र जाणतों; परंतु मला कोणी जाणीत नाहींत ॥ २६ ॥

इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत ।
सर्वभूतानि संमोहं सर्गे यांति परंतप ॥ २७ ॥

इच्छाद्वेषसमुत्थेन ( इच्छा आणि द्वेष यांपासून उद्भवणाऱ्या ) द्वंद्व ( जोडी ) मोहेन ( मोहानें ) भारत ( अर्जुना , सर्वभूतानि ( सर्व जीव ) संमोहं ( अज्ञानवश ) सर्गे ( जन्माच्या वेळीं ) यांति ( जातात ) परंतप ( हे शत्रुतापना ).

हे परंतप भारत, सर्वभूतानि इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन सर्गे संमोहं यांति.

हे भरतकुलोत्पन्ना शत्रुतापना ! इच्छा आणि द्वेष, सुखदुःख अशा प्रकारच्या द्वंद्वापासून उद्भवणाऱ्या मोहानें सर्व जीव जन्मतःच अज्ञानवश होतात ।। २७ ॥

येषां त्वंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।
ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजंते मां दृढव्रताः ॥ २८ ॥

येषां ( ज्यांचें ) तु ( परंतु ) अंतगतं ( लयास गेलेलें आहे ) पापं ( पाप ) जनानां ( लोकांचें ) पुण्यकर्मणाम् ( पुण्यकर्म करणारांचें ) ते ( ते ) द्वंद्वमोहनिर्मुक्ताः ( द्वंद्वाच्या मोहांतून सुटलेले ) भजंते ( भजतात ) मां ( मला ) दृढव्रताः ( निश्चयी ).

तु येषां पुण्यकर्मणाम् जनानां पापं अंतगतं ( भवति ) ते दृढव्रताः ( जनाः ) द्वंद्वमोहनिर्मुक्ताः ( संतः ) मां भजन्ते.

पुण्यकर्म करणाऱ्या अशा लोकांचें पाप लयास गेलें आहे ते दृढनिश्चयी जन द्वंद्वाच्या मोहांतून सुटून मला भजतात ॥ २८ ॥

**जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतंति ये ।**
**ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥ २९ ॥**

**जरामरणमोक्षाय** ( वृद्धापकालापासून आणि मरणापासून मुक्त होण्याकरितां ) **मां** ( मला ) **आश्रित्य** ( आश्रय धरून ) **यतंति** ( यत्न करितात ) **ये** ( जे ) **ते** ( ते ) **ब्रह्म** ( ब्रम्ह ) **तत्** ( तें ) **विदुः** ( जाणतात ) **कृत्स्नम्** ( सर्व ) **अध्यात्मं** ( वेदान्त ) **कर्म** ( कर्म ) **च** ( आणि ) **अखिलं** ( सर्व ).

ये मां आश्रित्य जरामरणमोक्षाय यतंति, ते तत् ब्रह्म, कृत्स्नं अध्यात्मं अखिलं कर्म च विदुः.

जे जन्ममरणापासून सुटका करून घेण्यासाठीं माझा आश्रय धरून यत्न करितात, त्यांसच श्रेष्ठ असें जें परब्रह्म तें समजून उमजतें, आणि सर्व अध्यात्म आणि सर्व कर्म त्यानांच समजतें ॥ २९ ॥

**साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः ।**
**प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ॥ ३० ॥**

**साधिभूताधिदैवं** ( अधिभूत आणि अधिदैव यांसह ) **मां** ( मला ) **साधियज्ञ** ( अधियज्ञासह ) **च** ( आणि ) **ये** ( जे ) **विदुः** ( जाणतात ) **प्रयाणकाले** ( जाण्याचे वेळीं ) **अपि** ( सुद्धां ) **च** ( आणि ) **मां** ( मला ) **ते** ( ते ) **विदुः** ( जाणतात ) **युक्तचेतसां** ( ज्याचें मन स्थिर झालें आहे असे जे = समाधिनिष्ठ ).

ये साधिभूताधिदैवं साधियज्ञं च मां विदुः, ते युक्तचेतसः प्रयाणकाले अपि च मां विदुः.

अधिभूत, अधिदैव आणि अधियज्ञ यांसह ज्यांनीं माझें स्वरूप जाणलें, ते समाधिनिष्ठ प्रयाणाचे वेळीं सुद्धां मला पूर्णपणें ओळखतात.

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः ॥७॥

# अध्याय आठवा.

अर्जुन उवाच—किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम ।
अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ॥ १ ॥

किं ( काय ) तत् ( तें ) ब्रह्म ( ब्रह्म ) किं ( काय ) अध्यात्मं ( अध्यात्म ) किं ( काय ) कर्म ( कर्म ) पुरुषोत्तम = पुरुषेषु उत्तम ( पुरुषांमध्यें उत्तम अशा कृष्णा ) अधिभूतं ( अधिभूत ) च ( आणि ) किं ( कशाला ) प्रोक्तं ( म्हटलें आहे ) अधिदैवं ( अधिदैव ) किं ( काय ) उच्यते ( म्हटलें जातें ).

( हे ) पुरुषोत्तम, तत् ब्रह्म किं, अध्यात्म किं, कर्म किं च, अधिभूतं किं प्रोक्तं, अधिदैवं किं उच्यते.

अर्जुन म्हणाला—हे पुरुषोत्तमा ! 'ब्रह्म' तें काय, 'अध्यात्म' तें काय 'कर्म' तें काय, 'अधिभूत' कशाला म्हणतात, आणि 'अधिदैव' शब्दानें काय समजावें ? ॥ १ ॥

अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन ।
प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥ २ ॥

अधियज्ञः ( अधियज्ञ ) कथं ( कसा ) कः ( कोण ) अत्र (येथें) देहे ( शरिरांत ) अस्मिन् ( यांत ) मधुसूदन ( मधुसूदना ) प्रयाणकाले ( देह सोडून जातानां, मरणसमयीं ) च ( आणि ) कथं ( कोणत्या रीतीनें ) ज्ञेयः ( जाणता येण्याजोगा ) असि ( आहेस ) नियतात्मभिः = नियतः आत्मा येषां तैः ( आत्म्याचें संयमन केलें आहे त्यांनीं, आत्मसंयमी पुरुषांनीं ).

( हे ) मधुसूदन, अधियज्ञः कथम्; अत्र अस्मिन् देहे कः ( अस्ति ) ? च, प्रयाणकाले नियतात्मभिः कथं ज्ञेयः असि ( त्वम् ).

हे मधुसूदना (मधुनामक दैत्यास मारणाऱ्या), अधियज्ञ कसा ? (असतो) येथें या देहामध्यें कोण ? ( असतो ) आणि मरणसमयीं आत्मसंयमी पुरुषांनीं ( तुला ) कसें जाणावें ? ॥ २ ॥

श्रीभगवानुवाच—**अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ।**
**भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥ ३ ॥**

**अक्षरं** ( अविनाशी ) **ब्रह्म** ( ब्रह्म ) **परमं** ( श्रेष्ठ ) **स्वभावः** ( स्वतः सिद्धपणा ) **अध्यात्मं** ( अध्यात्म ) **उच्यते** ( म्हटलें जातें ) **भूतभावोद्भवकरः** = भूतानां भावस्य उद्भवं करोति इति सः ( प्राणिमात्रांच्या अस्तित्वाची उत्पत्ति करणारा, प्राणिमात्रांच्या उत्पत्तीचें आदि-कारण ) **विसर्गः** ( उत्पादन क्रिया ) **कर्मसंज्ञितः** = कर्म संज्ञा यस्य सः ( ' कर्म ' असें नांव ज्याचें तो ).

ब्रह्म परमं अक्षरं, स्वभावः अध्यात्मं उच्यते, भूतभावोद्भवकरः विसर्गः कर्म संज्ञितः.

श्रीभगवान् म्हणाले—'ब्रह्म' जें अत्यंत अविनाशी त्याला 'ब्रह्म' म्हणतात; त्याच्या स्वतःसिद्ध स्वभावाला ' अध्यात्म ' असें म्हणतात; प्राणिमात्रांचें अस्तित्व निर्माण करणारी जी ब्रह्माची प्रसवक्रिया, ( सृष्टि उत्पन्न करणें ) तिला ' सर्ग ' असें म्हणतात ॥ ३ ॥

**अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् ।**
**अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥ ४ ॥**

**अधिभूतं** ( अधिभूत ) **क्षरः** (विनाशी, नाशवंत) **भावः** (स्वभाव) **पुरुषः** ( चिच्छक्ति, आत्मा ) **च** ( आणि ) **अधिदैवतं** ( अधिदैवत ) **अधियज्ञः** ( अधियज्ञ ) **अहं** ( मी ) **एव** ( मात्र ) **अत्र** ( येथें ) **देहे** ( देहामध्यें, शरिरांत ) **देहभृतां** = देहं बिभ्रति इति तेषां ( देह धारण करणारांमध्यें ) **वर** ( श्रेष्ठा ! )

अधिभूतं क्षरः भावः च अधिदैवतं पुरुषः देहभृतां वर अधियज्ञः अत्र देहे अहं एव ( अस्मि ).

नाशवंत स्वभावाला—विनाशी वस्तूंना अधिभूत असें म्हणावें, आणि

पुरुषाला म्हणजे चिच्छक्तीला ' अधिदैवत ' असें म्हणावें. हे देह धारण करणारांमध्यें श्रेष्ठ असणाऱ्या अर्जुना ! या शरीरांत राहणारा जो मी त्या मलाच ' अधियज्ञ ' असें म्हणतात ॥ ४ ॥

**अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।**
**यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ५ ॥**

**अंतकाले** = अंतस्य काले ( प्राणांतकाळीं, देहत्यागाच्या वेळीं ) **च** ( आणि ) **मां** ( मला ) **एव** ( मात्र ) **स्मरन्** ( आठवीत ) **मुक्त्वा** ( सोडून देऊन ) **कलेवरम्** ( देहाला, शरीराला ) **यः** (जो) **प्रयाति** ( जातो ) **सः** ( तो ) **मद्भावं** = मम भावं ( माझ्या स्वरूपाला ) **याति** ( जातो ) **न** ( नाहीं ) **अस्ति** ( आहे ) **अत्र** ( येथें ) **संशयः** ( संशय, शंका ).

च अंतकाले मां एव स्मरन् कलेवरं मुक्त्वा यः प्रयाति सः मद्भावं याति, अत्र संशयः न अस्ति.

आणि मरणकाळीं केवळ माझेंच स्मरण करीत देहत्याग करून जो ( हा मृत्युलोक सोडून ) जातो, तो माझ्या स्वरूपाला जाऊन मिळतो, यांत संशय नाहीं ॥ ५ ॥

**यं यं वाऽपि स्मरन्भावं त्यजत्यंते कलेवरम् ।**
**तं तमेवैति कौंतेय सदा तद्भावभावितः ॥ ६ ॥**

**यं** ( ज्या ) **यं** ( ज्या ) **वा** ( अथवा ) **अपि** ( सुद्धां ) **स्मरन्** ( स्मरण करीत ) **भावं** ( स्वरूप ) **त्यजति** ( टाकून देतो ) **अंते** ( शेवटीं ) **कलेवरं** ( देहाला ) **तं** ( त्या ) **तम्** ( त्या ) **एव** (मात्र) **एति** ( जातो ) **कौंतेय** ( कुंतिपुत्रा, अर्जुना ) **सदा** ( सर्वकाल ) **तद्भावभावितः** = तेन भावेन भावितः ( त्या स्वरूपाचें चिंतन करणारा )

वा यं यं अपि भावं अन्ते स्मरन् कलेवरं त्यजति, तं तं एव, हे कौंतेय, सदा तद्भावभावितः ( सः ) एति.

अथवा हे अर्जुना, मरणकाळीं ज्या ज्या भावाचें ( ज्या ज्या स्वरूपाचें ) स्मरण असतांना प्राणी देहत्याग करतो, त्या त्या स्वरूपाला ( सर्वकाल

त्याच स्वरूपाचें चिंतन करीत असल्यामुळें ) तो जाऊन मिळतो. सारांश, मरणकालीं ज्या स्वरूपाचें एकनिष्ठतेनें स्मरण होतें, तेंच स्वरूप त्याला प्राप्त होतें ॥ ६ ॥

**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ॥ ७ ॥**

**तस्मात्** ( यास्तव ) **सर्वेषु** ( सर्वांत ) **कालेषु** ( कालीं, वेळीं ) **मां** ( मला ) **अनुस्मर** ( एकसारखी आठवण ठेव ) **युध्य** ( युद्ध कर ) **च** ( आणि ) **मय्यर्पितमनोबुद्धिः** = मयि अर्पिते मनः च बुद्धिः च येन सः ( माझ्या ठायीं अर्पण केलीं आहेत मन व बुद्धि ज्यानें तो ) **मां** ( मला ) **एव** ( केवळ ) **एष्यसि** ( जाऊन पोंचशील ) **असंशयम्** ( निःसंशय )

तस्मात् सर्वेषु कालेषु मां अनुस्मर च युद्ध, मय्यर्पितमनोबुद्धिः एव असंशयम् एष्यसि.

---

१ कांहीं टीकाकारांनीं 'असंशय' असा पाठ देऊन 'मयि अर्पितं मनो बुद्धिः मां एव एष्यसि ' असा अन्वय लावला आहे. त्यामुळें 'माझ्या ठिकाणीं मन आणि बुद्धि अर्पण केलेला असा जर तूं निःसंशय असशील तर तूं मत्स्वरूपाला पावशील यांत शंका नाहीं ' असा अर्थ त्यांनीं केला आहे; परंतु श्रीशंकराचार्यांच्या भाष्यांत ' असंशयेन संशयोऽत्रविद्यते ' असें स्पष्ट कारण दिलें आहे, याकरतां ' असंशयः ' हें विशेषण अर्जुनाला लावण्याचें प्रयोजन संयुक्तिक वाटत नाहीं. मन व बुद्धि अर्पण केल्यानंतरही मनांत संशय असणें संभवनीय आहे असें असल्याचें या अर्थावरून भासतें. हें खरें असल्यास ' अर्पण शब्दाची मातब्बरी राहत नाहीं. ' अर्पण ' म्हणजे ' सर्वथा देणें ' ' देऊन टाकणें ' अर्थात् मन व बुद्धि देऊन टाकल्यानंतर, म्हणजे इतर विषयांची निर्मनस्कता प्राप्त झाल्यावर, संशयाचें स्फुरण कोठें होणार? 'यास्तव असंशयम् ' असाच पाठ वास्तविक समजून तें ' एष्यसि ' या क्रियापदाचें क्रियाविशेषण करणें जास्त अर्थद्योतक होईल असें वाटतें.

यास्तव सर्वकाळीं माझें स्मरण एकसारखें कर आणि युद्ध कर, माझ्या ठायीं आपलें मन व बुद्धि अर्पण करणारा तूं मलाच येऊन मिळशील यांत शंका नाहीं ॥ ७ ॥

**अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।**
**परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिंतयन् ॥ ८ ॥**

**अभ्यासयोगयुक्तेन** = अभ्यासेन च योगेन च युक्तेन (अभ्यास व योग यांनीं युक्त; अभ्यास व योग यांसह) **चेतसा** (अंतःकरणानें) **न** (नाहीं) **अन्यगामिना** = अन्यं गच्छति इति तेन (दुसरीकडे जाणा-ऱ्यानें) **परमं** (श्रेष्ठ) **पुरुषं** (चिच्छक्ति, परमात्मा) **दिव्यं** (स्वयं प्रकाशमान) **याति** (जातो) **पार्थ** (अर्जुना!) **अनुचिंतयन्** (सदो-दित ध्यान करणारा).

पार्थ न अन्यगामिना अभ्यासयोगयुक्तेन चेतसा अनुचिंतयन् परमं दिव्यं पुरुषं याति.

पार्थ न अन्यगामिना अभ्यसयोगयुक्तेन चेतसा अनुचिंतयन् परमं दिव्यं पुरुषं याति.

पार्था! दुसरीकडे कोठेंही मन जाऊं नदेतां–एकनिष्ठपणें–सतत् अभ्या-सानें, (माझें) एकसारखें चिंतन करणारा पुरुष, श्रेष्ठ व स्वयंप्रकाशमान परमात्मपदाला जाऊन मिळतो ॥ ८ ॥

**कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।**
**सर्वस्य धातारमचिन्त्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥९॥**

**कविं** (सर्वज्ञ) **पुराणं** (पुरातन) **अनुशासितारं** (सर्व शास्ता) **अणोः** (अणुपेक्षां) **अणियांसं** (लहान असा) **अनुस्मरेत्** (स्मरण करील) **यः** (जो) **सर्वस्य** (सर्वांचा) **धातारम्** (आधार) **अचि-न्त्यरूपम्** = अचिंत्यं रूपं यस्य सः (ज्याच्या रूपाचें यथार्थ चिंतन करतां येत नाहीं; मनास व बुद्धीस अगोचर) **आदित्यवर्णं** = आदित्यस्य वर्ण इव वर्णो यस्य सः (सूर्यासारखा देदीप्यमान) **तमसः** (अंधकाराच्या) **परस्तात्** (पलीकडचा अतीत).

कविं, पुराणं, अनुशासितारं, अणोः अणीयांसं, सर्वस्य धातारं, अचिन्त्यरूपं, आदित्यवर्णं, तमसः परस्तात् ( यः ) अनुस्मरेत्

सर्वज्ञ, सनातन, सर्वशास्ता, अणुंहूनही–लघुतम–सर्वाधार, मनास व बुद्धीस अगोचर, सूर्यासारखा देदीप्यमान, अंधःकाराच्या पलीकडचा, (अशा परमात्म्याचें ) जो सदोदित चिंतन करील, ( अन्वय पुढें आहे ).

**प्रयाणकाले मनसाऽचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।**
**भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् १०**

**प्रयाणकाले** ( देह सोडून जातांना, मरणकाळीं ) **मनसा** ( मनानें ) **अचलेन** ( अढळ ) **भक्त्या** ( भक्तीनें ) **युक्तः** ( युक्त, जोडलेला ) **योगबलेन** = योगस्य बलेन ( योगाच्या बळानें ) **च** ( आणि ) **एव** ( देखील ) **भ्रुवोः** ( भिवयांच्या ) **मध्ये** ( मध्यभागीं ) **प्राणं** ( प्राणवायूला ) **आवेश्य** ( ठेऊन ) **सम्यक्** ( योग्य रीतीनें ) **सः** ( तो ) **तं** ( त्या ) **परं** ( श्रेष्ठ ) **पुरुषं** ( चिच्छक्तीला ) **उपैति** (जाऊन पोंचतो) **दिव्यं** ( स्वयं प्रकाशमान ).

प्रयाणकाले अचलेन मनसा, भक्त्या योगबलेन च युक्तः भ्रुवोः मध्ये प्राणं सम्यक् आवेश्य सः तं परं दिव्यं पुरुषं उपैति.

तो देह सोडून जातांना ( मरणकाळीं ) आढळ मनानें, भक्तियुक्त अंतःकरणानें व योगबळानें आपल्या भिवयांच्या मध्यभागीं प्राणवायूला आणून ठेऊन त्या अति श्रेष्ठ आणि स्वयंप्रकाशमान चिच्छक्तीला (परमात्मपदाला) जाऊन पोंचतो ॥ १० ॥

**यदक्षरं वेदविदो वदंति विशंति यद्यतयो वीतरागाः ।**
**यदिच्छंतो ब्रह्मचर्यं चरंति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥ ११ ॥**

**यत्** ( ज्याला ) **अक्षरं** ( अविनाशी ) **वेदविदः** ( वेदवेत्ते, वेद जाणणारे ) **वदंति** ( म्हणतात ) **विशंति** ( शिरतात, प्रवेश करतात ) **यत्** ( ज्यामध्यें ) **यतयः** ( संन्यासी ) **वीतरागाः** = वीतः रागः येषां ते ( गेल्या आहेत इच्छा ज्यांच्या ते, निरिच्छ ) **यत्** ( जें ) **इच्छंतः** ( इच्छा धरून ) **ब्रह्मचर्यं** ( ब्रह्मचर्य ) **चरंति** ( पाळतात ) **तत्** ( ते )

ते ( तुला ) पदं ( पद, स्थान, धाम ) संग्रहेण ( संक्षेपानें ) प्रवक्ष्ये ( मी सांगतों ).

देह विदः यत् अक्षरं वदंति, वीतरागाः यतयः यत् विशंति, यत् इच्छंतः ब्रह्मचर्यं चरंति, तत् पदं ते संग्रहेण प्रवक्ष्ये.

वेदवेत्ते ज्याला ' अविनाशी ' असें म्हणतात, निष्काम यति ज्यामध्यें प्रवेश करतात आणि जें मिळविण्याच्या इच्छेनें ब्रह्मचर्य पाळतात, तें पद मी तुला संक्षेपानें सांगतों ॥ ११ ॥

सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च ।
मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणम् ॥ १२ ॥

**सर्वद्वाराणि** = सर्वाणि द्वाराणि ( सर्व दरवाजे, सर्व इंद्रियें ) **संयम्य** ( दमन करून ) **मनः** (मन) **हृदि** (हृदयांत) **निरुध्य** ( कोंडून ठेवून ) **च** ( आणि ) **मूर्ध्नि** ( मस्तकांत ) **आधाय** (ठेवून) **आत्मनः** ( आपला स्वतःचा ) **प्राणं** ( प्राणवायू ) **आस्थितः** ( स्थिर राहिलेला ) **योगधारणाम्** = योगस्य धारणाम् ( योगाच्या धारणेंत, एकाग्रतेंत. )

सर्वद्वाराणि संयम्य च हृदि मनः निरुध्य, आत्मनः प्राणं मूर्ध्नि आधाय योगधारणाम् आस्थितः.

सर्व ( अंतर्बाह्य, दोन्हीहि प्रकारच्या ) इंद्रियांचें दमन करून, मनाला हृदयामध्यें कोंडून ठेवून व आपल्या प्राणवायूला मस्तकांत स्थिर करून योगधारणेंत गढून गेलेला असा ॥ १२ ॥

ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।
यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥ १३ ॥

**ओम्** ( ॐ ) **इति** ( असें ) **एकाक्षरं** ( एक अक्षरानें युक्त ) **ब्रह्म** ( ब्रह्म ) **व्याहरन्** ( जप करतांना ) **मां** ( माझें ) **अनुस्मरन्** ( वारंवार स्मरण करून ) **यः** ( जो ) **प्रयाति** ( पुढें जातो ) **त्यजन्** ( टाकून देऊन, त्याग करून ) **सः** ( तो ) **याति** ( जातो ) **परमां** ( उत्तम ) **गतिम्** ( गतीला, पदाला ).

ओम् इति एकाक्षरं ब्रह्म व्याहरन् ( च ) मां अनुस्मरन् देहं त्यजन् यः प्रयाति सः परमां गतिं याति.

व जो ' ॐ ' या ब्रह्मसंज्ञक एकाक्षर ब्रह्माचा जप, व माझें वारंवार स्मरण करून देह सोडून जातो, तो उत्तम गतीला प्राप्त होतो ॥ १३ ॥

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ १४ ॥**

**अनन्यचेताः** = न अन्यस्मिन् चेतः यस्य सः ( दुसऱ्या कोणत्याही ठिकाणीं ज्याचें चित्त नाहीं तो; एकनिष्ठ, अनन्य भाव धारण करणारा ) **सततं** ( सर्वदा ) **यः** ( जो ) **मां** ( मला ) **नित्यशः** ( दररोज, अखंडत्वानें ) **तस्य** ( त्याला ) **अहं** ( मी ) **सुलभः** ( सोप्या रीतीनें प्राप्त होणारा ) **पार्थ** ( अर्जुना ! ) **नित्ययुक्तस्य** ( नित्ययोगनिष्ठ असणाऱ्याला ) **योगिनः** ( योग्याला ).

( हे ) पार्थ, अनन्यचेताः यः मां नित्यशः सततं स्मरति तस्य नित्ययुक्तस्य योगिनः अहं सुलभः ( अस्मि ).

हे पार्था ! जो दररोज अनन्यभावानें माझें सर्वकाल चिंतन करतो, त्या नेहमीं योगमग्न असणाऱ्या योग्याला मी फार सुलभपणें प्राप्त होतों ॥१४॥

**मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।**
**नाऽऽप्नुवंति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥ १५ ॥**

**मां** ( माझ्या ) **उपेत्य** ( जवळ जाऊन ) **पुनः** ( पुनः ) **जन्म** ( जन्मास येणें ) **दुःखालयम्** = दुःखानां आलयम् ( दुःखाचें आगर-घर ) **अशाश्वतम्** ( अनित्य, न टिकणारें ) **न** ( नाहीं ) **आप्नुवंति** ( मिळवितात ) **महात्मानः** ( महात्मे, उदार अंतःकरणाचे व अभेद वृत्तीचे सत्पुरुष ) **संसिद्धिं** ( चांगली सिद्धि, पूर्णता ) **परमां** ( श्रेष्ठ ) **गताः** ( गेले आहेत ).

परमां संसिद्धिं गताः महात्मानः मां उपेत्य पुनः अशाश्वतं दुःखालयं जन्म न आप्नुवन्ति.

अति श्रेष्ठ सिद्धि संपादन करणारे महात्मे माझ्याजवळ येऊन ( माझें सांनिध्य संपादून ) पुनः नश्वर दुःखांचें आगर, अशा जन्माला येत नाहींत ॥ १५ ॥

**आब्रह्म-भुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।**
**मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥ १६ ॥**

**आ** ( पर्यंत ) **ब्रह्मभुवनात्** = ब्रह्मणः भुवनात् ( ब्रह्मलोकापासून ) **लोकाः** ( लोक, सृष्टया ) **पुनरावर्तिनः** ( पुनः पुनः परत येणारे, पुनः पुनः जन्म-मरण पावणारे ) **अर्जुन** ( अर्जुना ) **मां** ( माझ्याकडे ) **उपेत्य** ( येऊन ) **तु** ( परंतु ) **कौंतेय** ( कुंतिपुत्रा, अर्जुना ) **पुनर्जन्म** ( पुनः जन्मास येणें ) **न** ( नाहीं ) **विद्यते** ( होतें ).

अर्जुन, आब्रह्मभुवनात् लोकः पुनरावर्तिनः तु कौंतेय मां उपेत्य पुनर्जन्म न विद्यते.

अर्जुना, ब्रह्मलोकापासून भूलोकापर्यंत सातेही[1] लोक उत्पन्न होऊन पुनः पुनः लय पावणारे ( पुनः पुनः जन्म घेणारे ) आहेत; परंतु हे कौंतेया, मला येऊन मिळाल्यानंतर पुनर्जन्म येऊं शकत नाहीं. सारांश, मला येऊन मिळणाऱ्याला पुनः जन्म घ्यावा लागत नाहीं ॥ १६ ॥

**सहस्रयुगपर्यंतमहर्यद्ब्रह्मणो विदुः ।**
**रात्रिं युगसहस्रांतां तेऽहोरात्रविदो जनाः ॥ १७ ॥**

**सहस्रयुगपर्यंतम्** = सहस्रं युगानि पर्यंतः यस्य तत् ( ज्याचा कालावधि एक हजार युगापर्यंत आहे तो; एक हजार युगांच्या कालावधि-इतका ) **अहः** ( दिवस ) **यत्** ( जें ) **ब्रह्मणः** ( ब्रह्मदेवाचा ) **विदुः** ( जाणतात ) **रात्रिं** ( रात्र ) **युगसहस्रांतां** = युगानां सहस्रेण अन्तः यस्याः ताम् ( एक हजार युगांच्या शेवटीं अंत होतो जिचा ती, युगसहस्राच्या शेवटीं पूर्ण होणारी ) **ते** ( ते ) **अहोरात्रविदः** = अहः च रात्रिं च विदंति इति ( याप्रमाणें दिवसरात्रीची मर्यादा जाणणारे ) **जनाः** ( लोक ).

यत् अहोरात्र-विदः जनाः ते ब्रह्मणः अहः सहस्रयुगपर्यंतम् ( तथा च ) रात्रिं युगसहस्रांतां ( इति ) विदुः.

---

१. भूः, भुवः, स्वः महः, जनः, तपः, सत्यं ( ब्रह्म ) असे सातही लोक कालांतरानें नष्ट होणारे आहेत. आठवा मोक्षलोक मात्र सर्व-व्यापी. व शाश्वत आहे. त्याला वैकुंठ किंवा विष्णुलोक असेंही म्हणतात.

ज्यांना अहोरात्रींचें ( रात्र आणि दिवस यांचें ) परिमाण अवगत आहे त्यांना ब्रह्मदेवाचा एक दिवस म्हणजे मानवी हजार युगें होतात, आणि ब्रह्मदेवाची एक रातही त्याचप्रमाणें मानवी एक हजार युगापर्यंत असते असें माहीत आहे ॥ १७ ॥

**अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे ।**
**रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥**

**अव्यक्तात्** ( अव्यक्तापासून, अदृश्यापासून ) **व्यक्तयः** ( व्यक्तत्वास आलेले, दृश्य पदार्थ ) **सर्वाः** ( सर्व ) **प्रभवंति** ( उत्पन्न होतात ) **अह-**

---

१ ब्रह्मदेवाचा एक दिवस म्हणजे मानवाचीं चार अब्ज बत्तीस कोटी वर्षें होतात; ब्रह्मदेवाचा एक दिवस म्हणजे देवाचीं हजार युगें होतात; मानवाची एक युगचौकडी ( कृत, त्रेत, द्वापार, कलि ) म्हणजे देवाचें एक युग होतें. या युगचौकडींचीं मानवीं वर्षें येणेंप्रमाणें आहेत:—

कृत = १७२८०००
त्रेत = १२९६०००
द्वापार = ८६४०००
कलि = ४३२०००

४३२००००×१०००=४३२००००००

हल्लीं म्हणजे शके १८३६ सालापर्यंत या कलियुगाचीं ५०१५ वर्षें झालीं. बाकी ४२६९८५ जातील तेव्हां देवाचें एक युग पुरें होईल. ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत १४ मन्वंतरें होतात, म्हणजे प्रत्येक मन्वंतर ब्रह्मदेवाच्या २$\frac{१}{७}$ घटका असतें. हल्लीं वैवस्वत मन्वंतर म्हणजे सातवें मन्वंतर आहे. हें संपेल तेव्हां ब्रह्मदेवाच्या १५ घटका होतील. वैवस्वत मन्वंतरानंतर मानवाचीं दोन अब्ज सोळा कोटी वर्षें जातील तेव्हां प्रळयकाळ होईल; व तो ( प्रळयकाळ ) ब्रह्मदेवाची एक रात्र म्हणजे मानवाचीं चार अब्ज बत्तीस कोटी वर्षें राहतील व नंतर पुनः सृष्टि उत्पन्न होईल. असा हा अबाधित क्रम चालावयाचा.

रागमे = अह्नः आगमे ( दिवस उगवला असतां ) रात्र्यागमे = रात्र्याः गमे ( रात्र पडली म्हणजे ) प्रलीयन्ते ( लीन होतात, नाहींसे होतात ) तत्र ( तेथें ) एव ( देखील ) अव्यक्तसंज्ञके = अव्यक्तं संज्ञा यस्य तस्मिन् ( ' अव्यक्त ' अशी ज्याला संज्ञा आहे त्यांत; अव्यक्तांत ).

अहरागमे अव्यक्तात् सर्वाः व्यक्तयः प्रभवन्ति, रात्र्यागमे तत्र एव अव्यक्तसंज्ञिके प्रलीयन्ते.

ब्रह्मदेवाच्या दिवसाला प्रारंभ झाला म्हणजे सर्व दृश्यवस्तु अव्यक्तापासून व्यक्तत्वास येतात ( दिसूं लागतात ); आणि ब्रह्मदेवाच्या रात्रीस प्रारंभ झाला असतां त्याच ' अव्यक्त ' संज्ञक तत्वामध्यें त्या वस्तु परत लीन होतात ( दिसेनाशा होतात ).

**भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।**
**रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥ १९ ॥**

भूतग्रामः = भूतानां ग्रामः ( चराचर वस्तुसमुदाय ) सः ( तो ) एव ( सुद्धां ) अयं ( हे ) भूत्वा ( जन्म पावून ) भूत्वा ( जन्म पावून ) प्रलीयते ( लीन होतो, नाश पावतो ) रात्र्यागमे ( रात्र पडली म्हणजे ) अवशः ( परतंत्रपणें ) पार्थ ( अर्जुना ) प्रभवति ( जन्मास येतो ) अहरागमे ( दिवस उगवला असतां ).

पार्थ सः एव अयं भूतग्रामः भूत्वा भूत्वा रात्रगमे अवशः प्रलीयते ( तथा च ) अहरागमे ( अवशः ) प्रभवति.

अर्जुना ! हाच तो चराचर वस्तुसमुदाय पुनः पुनः जन्मास येऊन रात्र आली ( प्रलय काल आला ) म्हणजे परस्वाधीन होऊन नाश पावतो. तसेंच दिवस उगवला ( सृष्ट्युत्पत्तिकाल आला ) म्हणजे पुनः परस्वाधीन होऊन उत्पन्न होतो. या वस्तुसमुदायाचे उत्पत्तिलय पराधीन ( कर्माधीन आहेत ) ॥ १९ ॥

**परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ।**
**यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥ २० ॥**

परः ( उच्च प्रतीचे ) तस्मात् ( त्याहून ) तु ( परंतु ) भावः

( रूप, स्वभाव ) अन्यः ( दुसरा ) अव्यक्तः ( अव्यक्त ) अव्यक्तात् ( अव्यक्ताहून ) सनातनः ( शाश्वत ) यः ( जो ) सः ( तो ) सर्वेषु ( सर्वांमध्यें ) भूतेषु ( प्राणिमात्रांत ) नश्यत्सु ( नाश पावणाऱ्यांमध्यें ) न ( नाहीं ) विनश्यति ( नाश पावतो ).

तु तस्मात् अव्यक्तात् परः यः अन्यः सनातनः अव्यक्तः भावः (आस्ति) सः सर्वेषु भूतेषु नश्यत्सु ( सत्सु ) न विनश्यति.

परंतु या ( भूतग्रामादिकांच्या म्हणजे प्रकृतीच्या, आदिमायेच्या )[1] अव्यक्ताहून उच्च प्रतीचें दुसरें सनातन असें अव्यक्ताचें स्वरूप आहे; तें सर्व प्राणिमात्रांचा नाश झाला तरी नष्ट होत नाहीं ॥ २० ॥

अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।
यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ २१ ॥

अव्यक्तः ( अव्यक्त ) अक्षरः ( अविनाशी ) इति ( याप्रमाणें ) उक्तः ( म्हटलें आहे ) तम् ( त्याला ) आहुः ( म्हणतात ) परमां ( अत्यंत श्रेष्ठ ) गतिम् ( गती, पद ) यं ( जे ) प्राप्य ( मिळालें असतां ) न ( नाहीं ) निवर्तन्ते ( परत येतात ) तत् ( तें ) धाम ( निवासस्थान ) परमं ( अत्यंत श्रेष्ठ ) मम ( माझें ).

( यः ) अव्यक्तः अक्षरः इति उक्तः तं परमां गतिं ( इति ) आहुः यं प्राप्य न निवर्तन्ते, तत् मम परमं धाम.

या अव्यक्ताला 'अक्षर' अविनाशी असें म्हटलें आहे. त्यालाच 'उत्तम गति'–श्रेष्ठ पद असें म्हणतात. ज्यांना हें उत्तम पद प्राप्त होतें ते तेथून परत येत नाहींत. तें माझें अत्यंत श्रेष्ठ निवासस्थान आहे ( यालाच परपुरुष किंवा परमात्मा म्हणतात ) ॥ २१ ॥

पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।
यस्यांतःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥ २२ ॥

पुरुषः ( आत्मा ) सः ( तो ) परः ( श्रेष्ठ ) पार्थ ( अर्जुना )

---

१ टीप–माया ही अव्यक्त खरी, परंतु सत्ताहीन अव्यक्त आहे. ब्रह्म हें शाश्वतसत्तारूप अव्यक्त म्हणून या मायेच्या अव्यक्ताहून दुसरें सनातन अव्यक्त ( ब्रम्ह ) श्रेष्ठ असें आहे. तें कधीं नष्ट होत नाहीं.

**भक्त्या** ( भक्ती केल्यानें ) **लभ्यः** ( मिळण्यासारखा ) **तु** ( खरोखर ) **अनन्यया** ( एकनिष्ठ ) **यस्य** ( ज्याच्या ) **अंतःस्थानि** = अंतः तिष्ठंति इति तानि ( अंतरीं राहणारे ) **भूतानि** ( प्राणिमात्र ) **येन** ( ज्यानें ) **सर्वं** ( सर्व ) **इदं** ( हें ) **ततम्** ( व्यापिलें आहे ).

पार्थ सः परः पुरुषः अनन्यया भक्त्या लभ्यः यस्य अंतःस्थानि भूतानि, (सन्ति) येन इदं सर्वं ततम् ( अस्ति ).

अर्जुना ! ज्याच्यामध्यें या सर्व चराचरवस्तुमात्रांचा अंतर्भाव होतो व ज्यानें हें सर्व ( जगत् ) भरलें आहे, तो परमात्मा एकनिष्ठभक्तीनें वश होण्यासारखा आहे ॥२२॥

**यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः ।**
**प्रयाता यांति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥ २३ ॥**

**यत्र** ( जेथें ) **काले** ( कालीं, समयीं ) **तु** ( आणि आतां ) **अनावृत्तिम्** ( पुन्हां जन्मास न येणें ) **आवृत्तिं** ( पुनः जन्म पावणें ) **च** ( आणि ) **एव** ( देखील ) **योगिनः** ( योगिजन ) **प्रयाताः** ( देहत्याग करून गेलेल ) **यांति** ( जातात ) **तं** ( तो ) **कालं** ( काळ ) **वक्ष्यामि** ( मी सांगतों )**भरतर्षभ** ( भरतकुलश्रेष्ठा, अर्जुना ).

तु भरतर्षभ प्रयाताः योगिनः यत्र काले आवृत्तिं च अनावृत्तिं एव यांति तं कालं वक्ष्यामि.

आणि आतां, हे अर्जुना ! देहत्याग करून गेलेले योगिजन कोणत्या कालीं पुनः जन्मास येतात आणि कोणत्याकालीं जन्म पावत नाहींत तो काल मी तुला सांगतों ॥२३॥

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।**
**तत्र प्रयाता गच्छंति ब्रह्म ब्रह्मविदोजनाः ॥ २४ ॥**

**अग्निः** ( अग्नि ) **जोतिः** ( प्रकाश ) **अहः** ( दिवस ) **शुक्लः** ( शुक्लपक्ष ) **षण्मासाः** ( सहा महिने ) **उत्तरायणम्** ( उत्तरायण ) **तत्र** ( तेथें ) **प्रयाताः** ( देहत्याग करून जाणारे ) **गच्छंति** ( जातात ) **ब्रह्म** ( ब्रह्माकडे ) **ब्रह्मविदः** ( ब्रह्म जाणणारे, ब्रह्मवेत्ते ) **जनाः** ( लोक ).

अग्निः, ज्योतिः, अहः, शुक्लः, षण्मासाः उत्तरायणम्: तत्र प्रयाताः ब्रह्मविदः जनाः ब्रम्ह गच्छंति.

अग्नि, प्रकाश, दिवस, शुक्लपक्ष, उत्तरायणांतील सहा महिने, या कालीं देहत्याग करून जाणारे ब्रह्मवेत्ते लोक ब्रम्हांत जाऊन मिळतात ॥२४॥

धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।
तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥ २५ ॥

धूमः ( धूर ) रात्रिः ( रात्र ) तथा ( तसेंच ) कृष्णः ( कृष्ण पक्ष ) षण्मासाः ( सहा महिने ) दक्षिणायनम् ( दक्षिणायन ) तत्र ( तेथें ) चांद्रमसं = चंद्रमसः इदं ( चंद्रसंबंधी , जोतिः ( प्रकाश ) योगि ( योगी पुरुष ) प्राप्य ( मिळवून ) निवर्तते ( परत येतो ).

धूमः रात्रिः, तथा कृष्णः, षण्मासाः दक्षिणायनम् , तत्र चांद्रमसं ज्योतिः प्राप्य योगी निवर्तते.

धूर, रात्र, तसेंच कृष्णपक्ष, आणि दक्षिणायनांतील सहा महिनें या

---

१ मानवांचे ( ६ ) सहा महिने म्हणजे देवाचा एक दिवस होतो. उत्तरायणाचे सहा महिने हा देवाचा दिवस व दक्षिणायनाचे सहा महिने ही देवाची रात्र. उत्तरायणात म्हणजे देवाच्या दिवसाचे वेळांत देहत्याग ज्या जीवांचा होतो त्याला दिवसाच्या ( काल किंवा ) प्रकाशदेवता म्हणजे अग्नि, प्रकाश, दिवस, शुक्लपक्ष, षण्मास ( देवांचा दिवस ) यांच्या देवता प्रकाशमार्ग दाखवून ब्रह्माकडे नेतात. ते जीव ब्रह्मवेत्ते असल्यामुळें त्यांचा देहत्याग उत्तरायणांतच होऊन या देवता त्यांना भेटून ब्रम्हाकडे जाण्याचा देवमार्ग दाखवितात.

२ टीप-दक्षिणायन ही देवाची रात्र असल्यामुळें धूर, रात्र, कृष्णपक्ष, षण्मास ( देवाची रात्र ) यांच्या देवता ( रात्रि-देवता ) दक्षिणायनांत म्हणजे देवाच्या रात्रींत देहत्याग करणाऱ्या जीवांना चंद्रलोक, पितृलोक, स्वर्गलोक इत्यादि उपभोग लोकांची वाट दाखवून त्या जीवाच्या कर्मानुरूप जो लोक त्याला भोगावयाचा असतो तेथें बिनचूक त्याला पोंचवितात.

कालीं ( देहावसान झालें असतां ) योग्याला चंद्रसंबंधीं प्रकाश प्राप्त होऊन ( उत्तम लोकांत गेल्यामुळें चंद्रकलामृताचें सेवन करून व तेथील उपभोग घेऊन पुण्यक्षय होतांच ) तो पुनः जन्मास येतो ॥२५॥

**शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते ।**
**एकया यात्यनावृत्तिमन्ययाऽवर्तते पुनः ॥ २६ ॥**

**शुक्लकृष्णे**=शुक्ला च कृष्णा च ( प्रकाशवंत व अंधारमय ) **गती** ( दोन गती ) **हि** ( कारण ) **एते** ( या दोन ) **जगतः** ( जगाच्या ) **शाश्वते** ( नित्य ) **मते** ( मत आहे ) **एकया** (एकीनें) **याति** ( जातो ) **अनावृत्तिम्** ( पुनर्जन्म नाहीं ) **अन्यया** ( दुसरीनें ) **आवर्तते** ( जन्म येतो ) **पुनः** ( पुनः )

हि एते शुक्लकृष्णे जगतः शाश्वते गती मते, एकया अनावृत्तिं याति अन्यया पुनः आवर्तते.

कारण, या शुक्ल, कृष्ण नांवाच्या, प्रकाशवंत व अप्रकाशवंत, अशा जगाच्या दोन शाश्वत गती आहेत असें ( श्रुतिस्मृत्यादिकांतील ) मत आहे. एका शुक्ल गतीनें ( देवमार्गानें जाण्यास वाट मिळून ) पुनर्जन्म येत नाहीं; दुसऱ्या ( कृष्ण ) गतीनें ( चंद्रमार्गानें जावें लागल्यामुळें पुण्यक्षय होतांच ) पुनः मनुष्य जन्मास येतो ॥२६॥

**नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन ।**
**तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥ २७ ॥**

**न** (नाहीं) **एते** ( या दोन ) **सृती** (गती, मार्ग) **पार्थ** ( अर्जुना )

---

१ यासंबंधाचें विशेष स्पष्टीकरण प्राचीनदृष्ट्या रा. रा. छापखाने एम्. ए. एल. एल. बी. यांनीं ' धर्मजागृति ' मासिक पुस्तकाच्या आगष्ट १९१४ च्या अंकांत केलें आहे तें जिज्ञासूंनीं अवश्य वाचावें. त्यावरून प्राचीन पद्धतीनेंच श्लोक २४ ते २६ च्या रहस्याचा बोध सुलभतेनें होतो.

२ या गती जे ब्रह्मवेत्ते व पुण्यकर्म करणारे योगी अशा अधिकारी प्राण्यांसंबंधानें आहेत, नास्तिक व पापकर्म करणारे प्राणी हे या गतींना अनधिकारी असल्यामुळें त्यांना हें मुळींच लागू नाहीं.

जानन् ( जाणणारा ) मुह्यति ( मोहित होतो ) कश्चन ( कोणीही ) तस्मात् (म्हणून) सर्वेषु ( सर्व ) कालेषु ( काळीं ) योगयुक्तः = योगेन युक्तः योगनिष्ठ, समाधिनिष्ठ ) भव ( हो ) अर्जुन ( अर्जुना ).

पार्थ एते सृती जानन् कश्चन योगी न मुह्यति तस्मात् अर्जुन सर्वेषु कालेषु योग युक्तः भव.

पार्था ! या दोन गती ज्यास अवगत आहेत तो योगी मोह पावत नाहीं; म्हणून अर्जुना ! सर्वकाल योगनिष्ठ हो ॥ २७ ॥

**वेदेषु यज्ञेषु तपस्सु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।**
**अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम्॥२८॥**

वेदेषु ( वेदांमध्यें ) यज्ञेषु ( यज्ञांमध्यें ) तपस्सु ( तपांमध्यें ) च ( आणि ) एव ( सुद्धां ) दानेषु ( दानांमध्यें ) यत् ( जें ) पुण्यफलं = पुण्यस्य फलं ( पुण्याचें फल ) प्रदिष्टं ( सांगितलें आहे ) अत्येति ( मागें टाकतो ) तत् ( तें ) सर्वं ( सर्व ) इदं ( हें ) विदित्वा ( जाणून ) योगी ( योगी ) परं ( श्रेष्ठ , स्थानं ( स्थानाला, धामाला ) उपैति ( जवळ जातो ) च ( आणि ) आद्यम् ( आदिकारणभूत, मूळच्या ).

वेदेषु, यज्ञेषु, तपःसु च एव, दानेषु यत् पुण्यफलं प्रदिष्टं, तत् सर्वं इदं विदित्वा योगी अत्येति च परं आद्यं स्थानं उपैति.

वेदांमध्यें, यज्ञांमध्यें, त्याचप्रमाणें तपांमध्यें, आणि दानांमध्यें पुण्यफल सांगितलें आहे, त्याच्यापलीकडे योगी जातो, ( ते सर्व फल, हें ज्ञान झाल्यावर योगी तुच्छ मानतो ), आणि श्रेष्ठ आणि आदिकारणभूत असें जें ब्रह्म त्याप्रत जाऊन मिळतो.

इति श्रीमद्भगवद्गीतासू. ब्र. योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अक्षरब्रह्म-योगो नाम अष्टमोऽध्यायः

———

# अध्याय नववा.

श्रीभगवानुवाच—इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ।
ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १ ॥

इदं (हें) तु (परंतु) ते (तुला) गुह्यतमं (अत्यंत गुप्त) प्रवक्ष्यामि (मी सांगेन) अनसूयवे (निर्मत्सर अशा तुला) ज्ञानं (ज्ञान) विज्ञानसहितं = विज्ञानेन सहितं (अनुभवयुक्त ज्ञानासहित) यत् (जें) ज्ञात्वा (जाणलें असतां) मोक्ष्यसे (मुक्त होशील) अशुभात् (अमंगलापासून).

तु, इदं गुह्यतमं विज्ञानसहितं ज्ञानं ते अनसूयवे प्रवक्ष्यामि, यत् ज्ञात्वा अशुभात् मोक्ष्यसे.

श्रीभगवान् म्हणाले— (पूर्वी सगुण ब्रह्माचें ज्ञान सांगितलें), परंतु आतां निर्मत्सर असा जो तूं त्या तुला अत्यंत गुप्त असें हें, अनुभवयुक्त ज्ञानासहित, ज्ञान सांगतों; हें समजलें असतां तूं अमंगल संसारबंधनापासून (जन्म-मरणापासून) मुक्त होशील ॥ १ ॥

राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।
प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २ ॥

राजविद्या = विद्यानां राजा (विद्यांचा राजा) राजगुह्यं = गुह्यानां राजा (गुह्यांमध्यें श्रेष्ठ) पवित्रं (शुद्ध करणारें) इदं (हें) उत्तमम् (अति श्रेष्ठ) प्रत्यक्षावगमं = प्रत्यक्षेण अवगमः यस्य तत् (साक्षात् समजून घेण्याचें जें ज्ञान तें) धर्म्यं (धर्मास अनुसरून) सुसुखं (फार सुखाचें) कर्तुम् (करण्याला) अव्ययम् (अविनाशी).

इदं (ज्ञानं) राजविद्या, राजगुह्यं, उत्तमं पवित्रं, प्रत्यक्षावगमं धर्म्यं, कर्तुं सुसुखं, अव्ययं (अस्ति).

हें ज्ञान सर्व विद्यांचा राजा, सर्व गुह्यांत श्रेष्ठ, अति पवित्र, साक्षात् सम-

जून घेण्याजोगें ( प्रत्यक्ष अनुभवास येणारें ) धर्मास अनुसरून असणारें, करण्याला ( त्याप्रमाणें आचरण करण्याला ) सुखकर व अविनाशी असें आहे ॥ २ ॥

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।**
**अप्राप्य मां निवर्तंते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥**

**अश्रद्दधानाः** ( विश्वास न ठेवणारे ) **पुरुषाः** ( पुरुष ) **धर्मस्य** ( धर्माचे ) **अस्य** ( ह्याचे ) **परंतप** ( अर्जुना ) **अप्राप्य** ( न मिळ-वितां ) **मां** ( मला ) **निवर्तंते** (परत फिरतात) **मृत्युसंसारवर्त्मनि** = मृत्योः संसारस्य च वर्त्मनि ( मृत्युयुक्त जो संसार त्याच्या मार्गांत ).

परंतप, अस्य धर्मस्य अश्रद्दधानाः पुरुषाः मां अप्राप्य मृत्युसंसारवर्त्मनि निवर्तन्त.

( शत्रूंस ताप देणाऱ्या ) अर्जुना, ह्या ज्ञानावर विश्वास न ठेवणारे पुरु-षांना माझी प्राप्ति न होतां ते मृत्युयुक्त संसारांत ( जन्ममरणाच्या फेऱ्यांत) पुनः पुनः फिरत राहातात ॥ ३ ॥

**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।**
**मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥ ४ ॥**

**मया** ( म्यां ) **ततम्** ( व्यापून टाकलेलें ) **इदं** ( हें ) **सर्वं** ( सर्व ) **जगत्** ( जग ) **अव्यक्तमूर्तिना** = अव्यक्ता मूर्तिः यस्य तेन ( ज्याचें स्वरूप उघड नाहीं त्यानें, इंद्रियांस अगोचर त्यानें ) **मत्स्थानि** = मयि तिष्ठंति इति तानि ( माझ्यामध्यें राहणारे असे ) **सर्वभूतानि** = सर्वाणि भूतानि ( सर्व प्राणिमात्र ) **न** ( नाहीं ) **च** ( आणि ) **अहं** (मी) **तेषु** ( त्यांच्यांत ) **अवस्थितः** ( राहिलेला ).

अव्यक्तमूर्तिना मया इदं सर्वं जगत् ततं (अस्ति); सर्वभूतानि मत्स्थानि ( संति ) अहं तेषु न च अवस्थितः.

मीं आपल्या अव्यक्त ( इंद्रियांस न दिसणाऱ्या ) स्वरूपानें हें सर्व जग

व्यापून ठाकलेलें आहे. सर्व भूतें ( प्राणिमात्र ) माझ्यामध्यें आहेत. मी त्यांच्यांतच ( त्यांच्यांतच असूनही आणखी जास्त आहे ) नाहीं ॥ ४ ॥

**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।**
**भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५ ॥**

न ( नाहीं ) च (आणि) **मत्स्थानि** = मयि तिष्ठंति इति ( माझ्यामध्यें राहणारे ) **भूतानि** ( जीवमात्र ) **पश्य** ( पहा ) **मे** ( माझा ) **योगम्** ( योगसामर्थ्य ) **ऐश्वरम्** ( अद्वितीय, इश्वरीय ) **भूतभृत्** = भूतानि बिभर्ति इति ( भूतमात्रांना आधार देतो असा ) **न** ( नाहीं ) **च** ( आणि ) **भूतस्थः** ( भूतेषु तिष्ठति इति ( भूतमात्रांत राहणारा असा ) **मम** ( माझा ) **आत्मा** ( आत्मा ) **भूतभावनः** = भूतानि भावयति इति ( भूतांचें पोषण करणारा इतकेंच ).

च मत्स्थानि भूतानि न ( संति ) मे ऐश्वरं योगं पश्य, भूतभृत् न च भूतस्थः, मम आत्मा भूतभावनः ( अस्ति ).

आणि ( ज्ञानयुक्त दृष्टीनें पाहतां वस्तुतः ) हीं सर्व भूतें मजमध्यें राहतात असेंही नाहीं, माझें महान् योगसामर्थ्य ( माया ) कसें आहे तें पहा ! मी भूतमात्रांचा आधार आहें, तथापि त्यांच्यांत मी नाहीं. माझा आत्मा भूतमात्रांची उत्पत्ति व वर्धन करणारा आहे ॥ ५ ॥

**यथाऽऽकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।**
**तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥**

**यथा** ( ज्याप्रमाणें ) **आकाशस्थितः** = आकाशे स्थितः आकाशांत असलेला ) **नित्यं** ( सतत ) **वायुः** (वायु) **सर्वत्रगः** = सर्वत्र गच्छति इति ( सर्व ठिकाणीं जातो ) **महान्** ( मोठा ) **तथा** ( त्याप्रमाणें ) **सर्वाणि** ( सर्व ) **भूतानि** ( भूतमात्र ) **मत्स्थानि** ( माझ्यांत असणारीं ) **इति** ( त्याप्रमाणें ) **उपधारय** ( समज ).

---

१ टीप–मी त्यांच्यांतच केवळ नाहीं, म्हणजे त्यांच्या असण्यानें मी मर्यादित झालेला असा नाहीं. ( मी त्यांच्यावर अवलंबून नाहीं ); भूतें नष्ट झालीं तर मी नष्ट होईन असें नाहीं. ( अ. ७ श्लोक ६।७।१२ पाहावेत. )

यथा नित्यं आकाशस्थितः महान् वायुः सर्वत्रगः, तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानि इति उपधारय.

ज्याप्रमाणें आकाशांतील प्रत्यक्ष अनुभवास येणारा महान् वायु आकाशांत सर्वत्र भरलेला असतो, त्याप्रमाणें सर्व भूतमात्र माझ्या ठिकाणीं स्थित आहे असें तूं समज ॥ ६ ॥

**सर्वभूतानि कौंतेय प्रकृतिं यांति मामिकाम् ।**
**कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ ७ ॥**

**सर्वभूतानि** ( सर्व भूतमात्र ) **कौन्तेय** ( हे कुंतिपुत्रा, अर्जुना ) **प्रकृतिं** ( आदिमायेप्रत ) **यांति** ( जातात ) **मामिकाम्** ( माझ्या ) **कल्पक्षये** = कल्पस्य क्षये ( कल्पाच्या शेवटीं ) **पुनः** ( पुनः ) **तानि** ( त्यांना ) **कल्पादौ** = कल्पस्य आदौ (कल्पाच्या प्रारंभीं) **विसृजामि** ( उत्पन्न करतों ) **अहं** ( मी ).

कौन्तेय, सर्वभूतानि कल्पक्षये मामिकां प्रकृतिं यांति, पुनः कल्पादौ अहं तानि विसृजामि.

अर्जुना, कल्पाच्या शेवटीं सर्व भूतें माझ्या मूळमायेच्या ठिकाणीं लीन होतात व पुनः कल्पाच्या सुरुवातीला मी त्यांना उत्पन्न करीत असतों । ७ ।

**प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः ।**
**भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥ ८ ॥**

**प्रकृतिं** ( आदिमाया ) **स्वाम्** ( स्वतांच्या ) **अवष्टभ्य** ( वर सत्ता चालवून, स्वाधीन ठेऊन ) **विसृजामि** ( उत्पन्न करतों ) **पुनः पुनः**

---

१ कृतत्रेतादि चार युगांची एक चौकडी झाली म्हणजे देवाचें एक वर्ष होतें. अशीं हजार देवाचीं वर्षें म्हणजे ब्रह्मदेवाची एक अहोरात्र होते, ब्रह्मदेवाच्या एका अहोरात्रींत दोन कल्पकाळ होतात. ब्रह्मदेवाचा दिवस म्हणजे सर्व सृष्टी स्थिति कल्पकाळ आणि रात्र म्हणजे प्रळय कल्पकाळ होय. याप्रमाणें एक स्थिति-कल्पकाळ चार अब्ज बत्तीस कोटि वर्षें (मानवी) असतो व नंतर प्रळय कल्पकाळ चार अब्ज बत्तीस कोटि वर्षेंपर्यंत असतो. त्या ब्रह्मदेवाच्या दिवसाला व रात्रीला कल्प असें म्हणतात.

( पुनः पुनः ) भूतग्रामं = भूतानां ग्रामम् ( भूतमात्रांचा समुदाय ) इमं ( ह्या ) कृत्स्नं ( सर्व ) अवशं ( पराधीन, दुर्बळ ) प्रकृतेः (मायेच्या) वशात् ( ओढीनें, बळानें ).

( अहं ) स्वां प्रकृतिं अवष्टभ्य प्रकृतेः वशात् अवशं इमं कृत्स्नं भूतग्रामं पुनः पुनः विसृजामि.

माझी जी प्रकृति तीवर सत्ता चालवून तिच्या बळानें, प्रकृतिवश व पराधीन असलेला भूतमात्रांचा समूह मी पुनः पुनः निर्माण करतों ॥ ८ ॥

**न च मां तानि कर्माणि निबध्नंति धनंजय ।**
**उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥ ९ ॥**

**न** ( नाहीं ) **च** ( आणि ) **मां** ( मला ) **तानि** ( तीं ) **कर्माणि** ( कर्में ) **निबध्नंति** ( बांधतात ) **धनंजय** (हे धनंजया) **उदासीनवत्** ( त्याविषयीं अनासक्तवृत्तीनें ) **आसीनं** ( राहिलेला ) **असक्तं** ( अलिप्त ) **तेषु** ( त्यांच्यांत ) **कर्मसु** ( कर्मांत ).

धनंजय, तेषु कर्मसु उदासीनवत् आसीनं, असक्तं मां तानि कर्माणि न च निबध्नंति.

हे धनंजया, या ( संहारोत्पत्ति ) कर्मांमध्यें मी अनासक्त वृत्तीनें राहून अलिप्त असा असल्यामुळें, तीं कर्में मला बद्ध करीत नाहींत ॥ ९ ॥

**मयाऽध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।**
**हेतुनाऽनेन कौंतेय जगद्विपरिवर्तते ॥ १० ॥**

**मया** ( म्यां ) **अध्यक्षेण** ( अध्यक्ष असल्यामुळें, साक्षित्वानें असल्यामुळें ) **प्रकृतिः** ( मूळ माया ) **सूयते** ( उत्पन्न करते ) **सचराचरम्** = चरेण च अचरेण च सह ( स्थावरजंगम पदार्थांस ) **हेतुना** ( कारणानें ) **अनेन** ( ह्यानें ) **कौंतेय** ( हे कुंतिपुत्रा ) **जगत्** ( जग ) **विपरिवर्तते** ( फिरत राहतें ).

कौंतेय, मया अध्यक्षेण प्रकृतिः सचराचरम् सूयते; अनेन हेतुना जगत् विपरिवर्तते.

अर्जुना, माझ्या केवळ साक्षित्वानें प्रकृति ( मूळमाया ) स्थावरजंगम

पदार्थांस उत्पन्न करते, आणि याच कारणामुळें हें जग ( भवचक्रांत ) फिरत राहतें ॥ १० ॥

**अवजानंति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।**
**परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम् ॥ ११ ॥**

**अवजानंति** ( धिःकार करतात ) **मां** ( मला ) **मूढाः** ( मूढ अज्ञानी ) **मानुषीं** ( मनुष्याचा ) **तनुम्** ( देह ) **आश्रित** ( आश्रय केलेल्याला ) **परं** ( अति उच्च ) **भावम्** ( स्वरूप ) **अजानंतः** ( न समजतां ) **मम** ( माझें ) **भूतमहेश्वरम्** = भूतानां महेश्वरः इत्यधिकारो यस्मिन् तं ( भूतमात्रांचा स्वामी ).

भूतमहेश्वरं मम परं भावं अजानंतः मूढाः मानुषीं तनुं आश्रितं मां अवजानन्ति.

सर्व भूतमात्रांचा मी स्वामी आहें हें माझें अत्युच्य स्वरूप न जाणतां मीं मनुष्यदेह धारण केला आहे येवढ्यावरूनच अज्ञानी लोक माझी अवहेलना करतात ॥ ११ ॥

**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ।**
**राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥ १२ ॥**

**मोघाशाः** = मोघाः आशाः येषां ते ( ज्यांच्या आशा व्यर्थ आहेत ते ) **मोघकर्माणः** = मोघानि कर्माणि येषां ते ( ज्यांचीं कर्में व्यर्थ ते ) **मोघज्ञानाः** = मोघं ज्ञानं येषां ते ( ज्यांचें ज्ञान पोकळ ते ) **विचेतसः** ( विचारशुन्य ) **राक्षसीम्** ( राक्षसी ) **आसुरीम्** ( आसुरी ) **च** ( आणि ) **एव** ( केवळ ) **प्रकृतिं** ( स्वभाव ) **मोहिनीं** ( भ्रांति पाडणारा ) **श्रिताः** ( आश्रय केलेले ).

( ते ) मोघाशाः, मोघकर्माणः, मोघज्ञानाः, विचेतसः, राक्षसीं च आसुरीं मोहिनीं प्रकृतिं एव श्रिताः ( संति ).

त्यांच्या आशा, कर्में आणि ज्ञान हीं वायफळ ( पोकळ ) असतात; ते विचारशून्य असतात, आणि राक्षसांच्या व असुरांच्या मोह पाडणाऱ्या

स्वभावाचा आश्रय करतात ( त्यांचे स्वभाव राक्षस अथवा असूर यांच्याप्रमाणें भुरळ घालणारे असतात ) ॥ १२ ॥

**महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।**
**भजंत्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ १३ ॥**

**महात्मानः** ( महात्मे ) **तु** ( परंतु ) **मां** ( मला ) **पार्थ** ( हे अर्जुना ) **दैवीं** ( दैवी ) **प्रकृतिं** ( प्रकृतीचा ) **आश्रिताः** ( आश्रय केलेले ) **भजंति** ( भक्ति करतात ) **अनन्यमनसः** = न अन्यस्मिन् मनः येषां ते ( ज्यांचें मन दुसरे कोठेंही नाहीं ते, अनन्यभावानें भजणारे) **ज्ञात्वा** ( जाणून ) **भूतादिम्** = भूतानां आदिं ( भूतमात्रांचा मूळ उत्पादक ) **अव्ययं** ( अविनाशी )

तु पार्थ, दैवीं प्रकृतिं आश्रिताः महात्मानः मां भूतादिं अव्ययं ज्ञात्वा अनन्यमनसः ( मां ) भजंति.

परंतु अर्जुना, दैवी प्रकृतीचा आश्रय करून राहणारे जे महात्मे आहेत ते " मी भूतमात्रांचा उत्पादक आहें व अविनाशी आहें " हें जाणून अनन्यभावानें माझी भक्ति करतात ॥ १३ ॥

**सततं कीर्तयंतो मां यतंतश्च दृढव्रताः ।**
**नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ १४ ॥**

**सततं** ( नेहमीं ) **कीर्तयंतः** ( स्तुती करणारे ) **मां** (मला) **यतंतः** ( माझ्या प्राप्तीचा प्रयत्न करणारे ) **च** ( आणि ) **दृढव्रताः** = दृढं व्रतं येषाम् ते (ज्यांचा नियम बळकट आहे ते) **नमस्यंतः** ( नमस्कार करणारे ) **च** ( आणि ) **माम्** ( मला ) **भक्त्या** (भक्तीनें) **नित्ययुक्ताः** ( नेहमीं समाधिनिष्ठ असणारे ) **उपासते** ( भजतात ).

( ते ) सततं मां कीर्तयंतः, यतंतः च दृढव्रताः मां भक्त्या नमस्यंतः नित्ययुक्ताः उपासते.

ते सतत माझ्या स्वरूपाचें कीर्तन करतात, नेमनिष्ठपणानें व दृढनिश्चयानें वागतात, भक्तिपूर्वक मला नमस्कार करतात आणि माझ्या ठिकाणीं सारखें लक्ष लावून माझी उपासना करतात ॥ १४ ॥

ज्ञानयज्ञेन चाऽप्यन्ये यजंतो मामुपासते ।
एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥ १५ ॥

**ज्ञानयज्ञेन** = ज्ञानस्य यज्ञेन ( ज्ञानाच्या यज्ञानें ) **च** (आणि) **अपि** ( सुद्धां ) **अन्ये** ( दुसरे ) **यजंतः** (यज्ञ करून) **मां** (मला) **उपासते** ( उपासना करतात ) **एकत्वेन** ( एकरूप समजून ) **पृथक्त्वेन** ( निर-निराळीं रूपें समजून ) **बहुधा** ( पुष्कळ प्रकारांनीं ) **विश्वतोमुखं** = विश्वतः मुखं यस्य तम् ( ज्याचें मुख सर्व बाजूला आहे तो ).

च अन्ये ज्ञानयज्ञेन अपि यजंतः, एकत्वेन, पृथक्त्वेन, बहुधा, विश्वतोमुखं मां उपासते.

आणि दुसरे ( कांहीं लोक ) ज्ञानरूप यज्ञ करून निरनिराळ्या प्रकारानें माझी उपासना करतात, म्हणजे कोणी सर्व-व्यापी ब्रह्मरूप असा मीच एक आहें असें समजून, कोणी मी आणि माझे भक्त हे निराळे असें समजून सेव्यसेवकभावानें व कोणी ही सृष्टी व सर्व देवता हीं माझींच रूपें आहेत असें समजून अनेक प्रकारांनीं माझी आराधना करतात ॥ १५ ॥

अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाऽहमहमौषधम् ।
मंत्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥ १६ ॥

**अहं** ( मी ) **क्रतुः** ( श्रौतयज्ञ ) **अहं** ( मी ) **यज्ञः** ( स्मार्त यज्ञ ) **स्वधा** ( पितरांस अर्पण केलेलें अन्न ) **अहं** ( मी ) **औषधम्** ( वन-स्पतिपासून उत्पन्न झालेलें धान्य ) **मंत्रः** ( मंत्र ) **अहं** ( मी ) **अहं** ( मी ) **एव** ( देखील ) **आज्यं** ( तूप ) **अहं** ( मी ) **अग्निः** ( अग्नि ) **अहं** ( मी ) **हुतम्** ( आहुति ).

अहं क्रतुः, अहं यज्ञः, अहं स्वधा, अहं औषधं, अहं मंत्रः, अहं एव आज्यं, अहं अग्निः, अहं हुतं.

श्रौतयज्ञ मी, स्मार्तयज्ञ मी, पित्र्यज्ञांतील अन्न मी, वनस्पति-जन्य धान्य ( तांदूळ, गहु, इत्यादि ) मी, मंत्र मी, तूपही मीच, अग्नि आणि आहुति मीच ॥ १६ ॥

पिताऽहमस्य जगतो माता धाता पितामहः ।
वेद्यं पवित्रमोंकार ऋक् साम यजुरेव च ॥ १७ ॥

**पिता** ( जनक ) **अहं** ( मी ) **अस्य** ( ह्याचा ) **जगतः** (जगाचा) **माता** ( जननी ) **धाता** ( पोषण करणारा ) **पितामहः** ( आजा ) **वेद्यं** ( जाणण्यास अवश्य ) **पवित्रं** ( शुद्ध ) **ओंकारः** ( प्रणव ) **ऋक्** ( ऋग्वेद ) **साम** ( सामवेद ) **यजुः** ( यजुर्वेद ) **एव** ( सुद्धां ) **च** ( आणि ).

अस्य जगतः अहं पिता, माता, धाता, पितामहः, वेद्यं (वस्तु), पवित्रं ( वस्तु ), ओंकारः, ऋक्, साम, यजुः एव च ( अस्मि ).

या जगाचा मी पिता, माता, पोषणकर्ता, आजा तसाच जाणण्याची वस्तु, पवित्र वस्तु, ॐकार, ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद हीं सर्व मीच होय ॥ १७ ॥

गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।
प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ १८ ॥

**गतिः** ( शेवटलें विश्रांतिस्थान ) **भर्ता** ( पति, पालनकर्ता ) **प्रभुः** ( स्वामी ) **साक्षी** ( पाहणारा ) **निवासः** ( घर, राहण्याची जागा ) **शरणं** ( आश्रयस्थान ) **सुहृत्** ( खरा मित्र ) **प्रभवः** (उत्पत्ति) **प्रलयः** ( लय ) **स्थानं** ( स्थिति, ठिकाण ) **निधानं** ( द्रव्यसंचयाची जागा, भांडागार ) **बीजं** ( बीं ) **अव्ययम्** ( अविनाशी ).

गतिः, भर्ता, प्रभुः, साक्षी, निवासः, शरणं, सुहृत्, प्रभवः, प्रलयः, स्थानं, निधानं, अव्ययं बीजं ( अस्मि ).

शेवटलें विश्रांतिस्थान, सर्वांचा पालनकर्ता, स्वामी, सर्वांचीं इष्ट अनिष्ट कर्मे पाहणारा साक्षी, सर्वांचें राहण्याचें स्थान ( सर्वांचा आश्रय ) खरा मित्र, जगताची उत्पत्ति, स्थिति आणि लय, निधि आणि सर्वांचें अविनाशी बीज मी आहें ॥ १८ ॥



तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च ।
अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥ १९ ॥

**तपामि** ( उष्णता देतों ) **अहं** ( मी ) **अहं** ( मी ) **वर्षं** ( पाऊस ) **निगृह्णामि** ( धरून ठेवतों ) **उत्सृजामि** ( सोडतो ) **च** ( आणि ) **अमृतं** ( अमरत्व ) **च** ( आणि ) **एव** ( देखील ) **मृत्युः** ( मृत्यु ) **च** ( आणि ) **सत्** ( असणें ) **असत्** ( नसणें ) **च** ( आणि ) **अहं** ( मी ) **अर्जुन** ( अर्जुना ).

अर्जुन, अहं तपामि, अहं वर्षं निगृह्णामि च उत्सृजामि, च अहं एव अमृतं, मृत्युः च सत् च असत् ( अस्मि ).

अर्जुना ! मी ( सूर्याच्या रूपानें ) उष्णता देतों, मी पाऊस ओढून धरतों व पाडतों, अमरत्व आणि मृत्यु, सत् आणि असत् हीं मीच आहें ॥ १९ ॥

**त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयंते ।**
**ते पुण्यमासाद्य सुरेंद्रलोकमश्नंति दिव्यान्दिवि देव भोगान् २०**

**त्रैविद्या** = तिस्रः विद्या येषां ते ( ज्यांना तिन्ही विद्या म्हणजे वेद अवगत आहेत ते ) **मां** (मला) **सोमपाः** = सोमं पिबंति इति ( यज्ञांत सोम प्राशन करणारे ) **पूतपापाः** = पूतं पापं एषां ( ज्यांचें पाप धुऊन गेलें आहे ते ) **यज्ञैः** ( यज्ञांनीं ) **इष्ट्वा** ( अवदान देऊन ) **स्वर्गतिं** ( स्वर्गवास ) **प्रार्थयंते** ( मागतात ) **ते** ( ते ) **पुण्यं** (शुद्ध) **आसाद्य** ( पोंचून ) **सुरेंद्रलोकं** = सुराणां इंद्रस्य लोकं ( देवेंद्राचा लोक, इंद्र-लोक ) **अश्नंति** ( भोगतात ) **दिव्यान्** ( दिव्य ) **दिवि** ( स्वर्गांत ) **देवभोगान्** = देवानां भोगान् ( देवांचे उपभोग, देवांचीं सुखें ).

त्रैविद्याः, सोमपाः पूतपापाः मां यज्ञैः इष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते; ते पुण्यं सुरेंद्रलोकं आसाद्य दिवि दिव्यान् देवभोगान् अश्नंति.

तिन्ही वेदांचें अध्ययन केलेले, यज्ञांत सोमपान करणारे, निष्पाप झालेले, ( असे जन ) यज्ञांत अवदानें देऊन स्वर्गवास मिळावा म्हणून मागतात व ते इंद्रलोकाप्रत जाऊन तेथें देवांच्या उत्तम सुखांचा उपभोग घेतात ॥ २० ॥

**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति ।**
**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभंते ॥ २१ ॥**

**ते** ( ते ) **तं** ( तो ) **भुक्त्वा** ( भोगून ) **स्वर्गलोकं** ( स्वर्गलोक ) **विशालं** ( विस्तीर्ण ) **क्षीणे** ( क्षय झाला असतां ) **पुण्ये** ( पुण्याचा ) **मर्त्यलोकं** = मर्त्यानां लोकं ( मृत्युलोक ) **विशंति** ( शिरतात ) **एवं** ( त्याप्रमाणें ; **त्रयीधर्मं** = त्रयाणां वेदानां धर्मं ( तिन्ही वेदांत सांगितलेले विधि ) **अनुप्रपन्नाः** ( अनुसरलेले ) **गतागतं** = गतं च आगतं च ( जाणें व येणें = जन्म-मृत्यु ) **कामकामाः** = कामानां कामः येषां ते ( विषयांविषयीं इच्छा ज्यांची ते ) **लभंते** ( मिळवितात ).

तं विशालं स्वर्गलोकं भुक्त्वा, ते क्षीणे पुण्ये ( सति ) मर्त्यलोकं विशंति. एवं त्रयीधर्मं अनुप्रपन्नाः कामकामाः गतागतं लभन्ते.

त्या विस्तीर्ण स्वर्गलोकचें सुख भोगल्यानें त्यांचें पुण्य संपलें म्हणजे मृत्यु-लोकीं जन्म पावतात. त्याप्रमाणें तिन्ही वेदांत सांगितलेल्या विधींचें पालन कामुकबुद्धीनें जे करतात त्यांना जन्ममृत्यूच्या येरझारा कराव्या लागतात ।२१।

**अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते ।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ २२ ॥**

**अनन्याः** ( माझ्याशिवाय दुसरें दैवत ज्यांस नाहीं असे ) **चिंतयंतः** ( चिंतनामध्यें निमग्न होऊन ) **मां** ( मला ) **ये** ( जे ) **जनाः** ( पुरुष ) **पर्युपासते** ( पुजतात, भजतात ) **तेषां** (त्यांचा) **नित्याभियुक्तानां** ( नेहमीं ध्यानस्त असलेल्यांचा ) **योगक्षेमं** ( योग=नवीन वस्तु मिळविणें; क्षेम = मिळविलेल्या वस्तूचें संरक्षण करणें = नित्य निर्वाह, चरितार्थ ) **वहामि** ( वाहतों ) **अहं** ( मी ).

अनन्याः मां चिंतयन्तः ये जनाः ( मां ) पर्युपासते, तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं अहं वहामि.

जे अनन्यभावानें माझ्या चिंतनांत सदोदित राहून मला भजतात, त्या सतत ध्यानमग्न असलेल्या भक्तांच्या प्रपंच्याचा भार मी वाहतों ( त्यांचा चरितार्थ मी चालवितों ) ॥ २२ ॥

**येऽप्यन्यदेवताभक्ता यजंते श्रद्धयाऽन्विताः ।**
**तेऽपिमामेव कौन्तेय यजंत्यविधिपूर्वकम् ॥ २३ ॥**

**ये** ( जे ) **अपि** ( सुद्धां ) **अन्यदेवताभक्ताः** = अन्यासां देवतानां भक्ताः ( दुसऱ्या देवांचे भक्त ) **यजंते** ( भजतात ) **श्रद्धया** (विश्वासानें) **अन्विताः** ( युक्त झालेले ) **ते** ( ते ) **अपि** ( सुद्धां ) **मां** ( मला ) **एव** ( देखील ) **कौन्तेय** ( अर्जुना ! ) **यजंति** ( भजतात ) **अविधिपूर्वकं** = अविधिः पूर्वं यथा स्यात् तथा ( शास्त्रांना सोडून ).

अपि ये अन्यदेवताभक्ताः श्रद्धया अन्विता यजन्ते, ते अपि, कौन्तेय अविधिपूर्वकं मां एव यजन्ति.

आतां जे इतर देवतांचे भक्त पूर्ण विश्वास ठेऊन त्या देवतांना भजतात, ते सुद्धां, अर्जुना, माझेंच आराधन करतात; परंतु तें त्यांचें करणें शास्त्राला सोडून ( अज्ञानपणाचें ) होतें ॥ २३ ॥

**अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।**
**न तु मामभिजानंति तत्वेनातश्च्यवंति ते ॥ २४ ॥**

**अहं** ( मी ) **हि** ( खरोखर ) **सर्वयज्ञानां** = सर्वेषां यज्ञानां ( सर्व यज्ञांचा ) **भोक्ता** ( उपभोग घेणारा ) **च** ( आणि ) **प्रभुः** ( स्वामी ) **एव** ( केवळ ) **च** ( आणि ) **न** ( नाहीं ) **तु** ( खरोखर ) **मां** (मला) **अभिजानंति** ( जाणतात ) **तत्वेन** ( मूळ रूपानें ) **अतः** ( म्हणून ) **च्यवंति** ( पडतात ) **ते** ( ते ).

हि अहं सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुः एव च ( अस्मि ); तु मां तत्वेन न अभिजानंति, अतः ते च्यवंति.

सर्व यज्ञाचा उपभोग घेणारा व स्वामी खरोखरी मी आहें, परंतु हे लोक मला मूळरूपानें जाणीत नाहींत, म्हणून ते पतित होतात ( जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडतात ) ॥ २४ ॥

**यांति देवव्रता देवान् पितॄन्यांति पितृव्रताः ।**
**भूतानि यांति भूतेज्या यांति मद्याजिनोऽपि माम् ॥२५॥**

**यांति** (जातात) **देवव्रताः** = देवेषु व्रंत येषां ते ( देवाच्या ठिकाणीं भक्तीचा नेम ज्यांचा ते ) **देवान्** ( देवलोकास ) **पितॄन्** ( पितृलोकांस ) **यांति** ( जातात ) **पितृव्रताः** = पितृषु व्रतं येषां ते ( पितरांच्या ठिकाणीं ज्यांची निष्ठा ते ) **भूतानि** (भूतदेवतांप्रत) **यांति** (जातात) **भूतेज्याः** = भूतेभ्यः इज्या येषां ते ( भूतांकरतां ज्यांची सेवा ते ) **यांति** ( जातात ) **मद्याजिनः** = मां यजते इति ( मला भजतात असे ) **अपि** ( सुद्धां ) **मां** ( मजप्रत ).

देवव्रताः देवान् यान्ति; पितृव्रताः पितॄन् यांति; भूतेज्याः भूतानि यांति; मद्याजिनः अपि मां यान्ति.

देवांची उपासना करणारे देवलोकास जातात, पितरांचें आराधन करणारे पितृलोकीं जातात, भूतांस भजणारे भूततत्वाप्रत जातात, आणि माझी भक्ति करणारे मला येऊन मिळतात ॥ २५ ॥

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥**

**पत्रं** ( पान ) **पुष्पं** ( फूल ) **फलं** ( फळ ) **तोयं** (पाणी) **यः** (जो) **मे** ( मला ) **भक्त्या** ( भक्तीनें ) **प्रयच्छति** ( देतो ) **तत्** ( तें ) **अहं** ( मी ) **भक्त्युपहृतम्** = भक्त्या उपहृतं ( भक्तीनें समर्पण केलेलें ) **अश्नामि** ( मी स्वीकार करतों ) **प्रयतात्मनः** = प्रयतः आत्मा यस्य तस्य ( ज्याचें अंतःकरण नियत ( शुद्ध ) त्याचे ).

यः पत्रं, पुष्पं, तोयं मे भक्त्या प्रयच्छति, तस्य प्रयतात्मनः भक्त्युपहृतम् तत् अहं अश्नामि.

जो कोणी भक्तीनें मला पान, फूल, फळ अथवा पाणी अर्पण करतो त्या नियत ( निर्मळ ) अंतःकरणानें देणाराच्या त्या वस्तू मी आदरपूर्वक स्वीकारतों ॥ २६ ॥

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ २७ ॥**

**यत्** ( जें कांहीं ) **करोषि** ( तूं करतोस ) **यत्** (जें कांहीं) **अश्नासि** ( तूं सेवन करतोस ) **यत्** ( जें कांहीं ) **जुहोषि** ( तूं हवन करतोस )

**ददासि** ( तूं देतोस ) **यत्** ( जें ) **यत्** ( जें ) **तपस्यसि** ( तपाचरण करतोस ) **कौंतेय** ( अर्जुना ) **तत्** ( तें ) **कुरुष्व** ( तूं कर ) **मद्-र्पणम्** = मयि अर्पणम् ( मला अर्पण ).

कौंतेय, यत् करोषि, यत् अश्नासि, यत् जुहोषि, यत् ददासि, यत् तप-स्यसि, तत् मदर्पणं कुरुष्व.

अर्जुना, तूं जें कांहीं करतोस, जं सेवन करतोस, जें हवन करतोस, जें दान करतोस तें व जें तपाचरण करतोस तें सर्व मला अर्पण करीत जा ।२७।

**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबंधनैः ।**
**संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥ २८ ॥**

**शुभाशुभफलैः** = शुभं च अशुभं च फलं येषां तैः ( ज्यांचें चांगलें आणि वाईट फल आहे अशांपासून ) **एवं** ( याप्रमाणें ) **मोक्ष्यसे** ( मुक्त होशील ) **कर्मबंधनैः** = कर्मणां बंधनैः (कर्मांच्या बंधनापासून) **संन्यासयोगयुक्तात्मा** = संन्यासस्य योगेन युक्तः आत्मा यस्य सः ( ज्याचें अंतःकरण संन्यासयोगाशीं संलग्न झालें तो ) **विमुक्तः** ( सुटून गेलेला ) **मां** ( मला ) **उपैष्यसि** ( तूं येशील ).

एवं शुभाशुभफलैः कर्मबंधनैः मोक्ष्यसे, संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तः ( भूत्वा ) मां उपैष्यसि ( च ).

असें केल्यानें चांगल्या अगर वाईट फल देणाऱ्या कर्मांच्या बंधनापासून तूं सुटशील आणि तुझ्या आत्म्याला संन्यासयोग साध्य होऊन तूं मुक्त होशील आणि मला येऊन मिळशील ॥ २८ ॥

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योस्ति न प्रियः ।**
**ये भजंति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥ २९ ॥**

**समः** ( सारखा ) **अहं** ( मी ) **सर्वभूतेषु** = सर्वेषु भूतेषु ( सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं ) **न** ( नाहीं ) **मे** ( माझा ) **द्वेष्यः** (शत्रु) **अस्ति** ( आहे ) **न** ( नाहीं ) **प्रियः** ( आवडता ) **ये** ( जे ) **भजंति** ( भक्ति करतात) **तु** (खरोखर) **मां** (मला) **भक्त्या** (भक्तीनें) **मयि** ( माझ्यामध्यें) **ते** ( ते ) **तेषु** ( त्यांच्यांत ) **च** ( आणि ) **अपि** ( सुद्धां ) **अहं** (मी)

अहं सर्वभूतेषु समः, मे द्वेष्यः प्रियः ( च ) न अस्ति; ये तु मां भक्त्या भजंति, ते मयि च अहं अपि तेषु.

मी सर्व भूतमात्रांस सारखाच आहें, मी कोणाचा द्वेष करीत नाहीं अथवा कोणावर लोभही करीत नाहीं; परंतु जे भक्तिपूर्वक मला भजतात, ते माझ्यांत च मी त्यांच्यांत असतों, ( म्हणजे ते व मी एकजीव असतों ) ॥ २९ ॥

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**
**साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ ३० ॥**

**अपि** ( सुद्धां ) **चेत्** ( जर ) **सुदुराचारः** (दुर्वर्तन करणारा) **भजते** ( भजतो ) **मां** ( मला ) **अनन्यभाक्** = न अन्यं भजति इति ( दुसऱ्या कोणालाही भजत नाहीं असा ) **साधुः** (सुजन, पुण्यात्मा) **एव** (देखील) **सः** ( तो ) **मंतव्यः** ( समजावा ) **सम्यक्** ( चांगला ) **व्यवसितः** ( निश्चित ) **हि** ( खरोखर ) **सः** ( तो ).

सुदुराचारः अपि मां अनन्यभाक् भजते चेत् सः साधुः एव मंतव्यः हि सः सम्यग्व्यवसितः ( अस्ति ).

अति दुर्वृत्त असूनही जर तो माझी अनन्यभावानें भक्ति करूं लागला तर तो साधूच समजावा. कारण तो निश्चयानें चांगल्या मार्गाला लागलेला असतो ॥ ३० ॥

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति ।**
**कौंतेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥ ३१ ॥**

**क्षिप्रं** ( लवकर ) **भवति** ( होतो ) **धर्मात्मा** = धर्मे आत्मा यस्य सः ( ज्याचें अंतःकरण धार्मिक तो ) **शश्वत्** ( अनंतकाळ राहणारी ) **शांतिं** ( शांतलेला ) **निगच्छति** ( जातो ) **कौन्तेय** ( हे अर्जुना ) **प्रतिजानीहि** ( समज, जाण ) **न** ( नाहीं ) **मे** ( माझा ) **भक्तः** (भक्त) **प्रणश्यति** ( नाश पावतो ).

कौन्तेय, ( सः ) क्षिप्रं धर्मात्मा भवति, शश्वत् शांतिं निगच्छति. मे भक्तः न प्रणश्यति ( इति त्वं ) प्रतिजानीहि.

अर्जुना, तो लवकरच धार्मिक होतो आणि निरंतर अशा शांतीला प्राप्त करून घेतो ( निरंतरचें शांतिसुख मिळवितो ). माझा भक्त कधींही नाश पावत नाहीं हें तूं ध्यानांत धर ॥ ३१ ॥

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ॥३२॥**

**मां** ( मला ) **हि** ( खरोखर ) **पार्थ** ( अर्जुना ) **व्यपाश्रित्य** ( आश्रय करून ) **ये** ( जे ) **अपि** ( सुद्धां ) **स्युः** ( असतील ) **पापयोनयः** = पापयोनिः येषां ते ( पापी कुळांत जन्म ज्यांचा ते ) **स्त्रियः** ( स्त्रिया ) **वैश्याः** ( वैश्य, वाणी ) **शूद्राः** ( शूद्र, कुळंबी ) **ते** ( ते ) **अपि** ( सुद्धां ) **यांति** ( जातात ) **परां** ( अति उच्च ) **गतिं** (पदाला).

पार्थ, हि ये अपि पापयोनयः, स्त्रियः, वैश्याः तथा शूद्राः स्युः, ते अपि मां व्यपाश्रित्य परां गतिं यांति.

पार्था, माझा आश्रय केल्यानें स्त्रिया, वैश्य, शूद्र इत्यादि सर्व व जे कोणी पापीकुळांत जन्मले असतील तेही उत्तम गतीला जातात ॥ ३२ ॥

**किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।**
**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥ ३३ ॥**

**किं** ( कसें ) **पुनः** ( पुनः ) **ब्राह्मणाः** ( ब्राह्मण ) **पुण्याः** ( पुण्यवान् ) **भक्ताः** (भक्ति करणारे ) **राजर्षयः** ( राजऋषी) **तथा** ( तसेच ) **अनित्यं** ( अशाश्वत ) **असुखं** ( दुःखदायक ) **लोकं** ( लोकाला ) **इमं** ( ह्या ) **प्राप्य** ( प्राप्त होऊन ) **भजस्व** ( भक्ति कर ) **मां** ( मला ).

किं पुनः पुण्याः भक्ताः ब्राह्मणाः तथा राजर्षयः (तस्मात्) इमं अनित्यं असुखं लोकं प्राप्य मां भजस्व.

तर मग पुण्यवान् आणि भक्ति करणारे ब्राह्मण, तसेच राजऋषी ( उत्तम गतीला जातात ) यांच्याबद्दल सांगावयाला पाहिजे काय ? तूं ह्या अशाश्वत आणि दुःखदायक मृत्युलोकीं जन्म पावला आहेस, यासाठीं माझी भक्ति कर ॥ ३३ ॥

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥**

**मन्मनाः** = मयि मनः यस्य सः ( माझ्या ठिकाणीं ज्याचें मन तो ). **भव** ( हो ) **मद्भक्तः** = मम भक्तः ( माझा भक्त ) **मद्याजी** = मां यजते इति (मला अर्पण करणारा असा) **मां** ( मला ) **नमस्कुरु** ( नमस्कार कर ) **मां** ( मला ) **एव** ( देखील ) **एष्यसि** (येशील) **युक्त्वा** ( एकाग्र चित्त होत्साता ) **एवं** ( याप्रमाणें ) **आत्मानं** ( आत्म्याशीं ) **मत्परायणः** = अहं परायणं यस्य सः ( मी ज्याचें अंतिम तो ).

( त्वं ) मन्मनाः मद्भक्तः मद्याजी च मत्परायाणः भव, मां नमस्कुरु, एवं आत्मानं युक्त्वा मां एव एष्यसि.

माझ्या ठिकाणीं मन निश्चल कर, माझी भक्ति कर, सर्व कर्में मला अर्पण कर, मला नमन कर आणि माझ्या ठिकाणींच एकनिष्ठ असा हो. याप्रमाणें माझ्या ठिकाणीं एकाग्रचित्तानें तादात्म्य पावलास म्हणजे मलाच येऊन मिळशील ॥ ३४ ॥

---

इति श्रीमद्भगवद्गीतासू. ब्र. यो. श्रीकृष्णा. राजविद्या
राजगुह्य योगोनाम नवमोऽध्यायः

---

# अध्याय दहावा.

श्रीभगवानुवाच–भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः ।
यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥१॥

**भूयः** ( पुनः ) **एव** ( देखील ) **महाबाहो** ( अर्जुना ) **शृणु** ( ऐक ) **मे** ( माझें ) **परमं** ( उत्तम, श्रेष्ठ ) **वचः** ( वचन, सांगणें ) **यत्** ( जें ) **ते** ( तुला ) **अहं** ( मी ) **प्रियमाणाय** ( मित्राला ) **वक्ष्यामि** ( सांगतों ) **हितकाम्यया** = हितस्य काम्यया ( हित करण्याच्या इच्छेनें; हिताकरतां ).

हे महाबाहो मे परमं वचः भूयः एव शृणु यत् प्रीयमाणाय ते हितकाम्यया अहं वक्ष्यामि.

श्रीभगवान् ह्मणाले–अर्जना, मी पुनः सांगतों तें माझें उत्तम वचन ऐक. माझें तुझ्यावर प्रेम असल्यामुळें मी तें तुला तुझ्या हिताकरित सांगतों ॥ १ ॥

न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।
अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥ ॥

**न** ( नाहीं ) **मे** ( मला ) **विदुः** ( जाणलें ) **सुरगणाः** = सुराणां गणाः ( देवांचे समुदाय ) **प्रभवं** ( उगम ) **न** ( नाहीं ) **महर्षयः** = महान्तः ऋषयः ( मोठमोठे ऋषी ) **अहं** ( मी ) **आदिः** ( प्रारंभ, मूळ कारण ) **हि** ( कारण ) **देवानां** ( देवांचा ) **महर्षीणां** ( मोठमोठ्या ऋषींचा ) **च** ( आणि ) **सर्वशः** ( सर्वतोपरी, सर्व ठिकाणीं ).

न सुरगणाः न महर्षयः मे प्रभवं विदुः; हि देवानां च महर्षीणां ( च ) अहं सर्वशः आदिः ( अस्मि ).

माझा उगम कोठून आहे हें देवांना अथवा मोठमोठ्या ऋषींना माहीत

नाहीं. कारण, देवांचा व महाऋषींचा मूळ उत्पत्तिकर्ता मीच आहें ॥ २ ॥

**यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ।**
**असंमूढः समर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ३ ॥**

**यः** ( जो ) **माम्** ( मला ) **अजं** ( जन्मरहिताला ) **अनादिं** ( आरंभशून्याला ) **च** ( आणि ) **वेत्ति** ( जाणतो ) **लोकमहेश्वरम्** = लोकस्य महेश्वरं ( जगाच्या परमेश्वराला, जगदीशाला ) **असंमूढः** ( मोहरहित असणारा ) **सः** ( तो ) **मर्त्येषु** ( मानवांमध्यें ) **सर्वपापैः** = सर्वैः पापैः ( सकल पापांनीं ) **प्रमुच्यते** ( सुटका होते; मुक्त होतो ).

यो मां लोकमहेश्वरं अजं च अनादिं ( इति ) वेत्ति सः मर्त्येषु असंमूढः ( च ) सर्व पापैः प्रमुच्यते.

जो मला, मी सर्व लोकांचा परमेश्वर जन्मरहित व अनादि आहें असें जाणतो तो ( सर्व ) मानवांमध्यें भ्रमरहित = ज्ञानी होय; तो सर्व पापांपासून मुक्त होतो ॥ ३ ॥

**बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः ।**
**सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च ॥ ४ ॥**

**बुद्धिः** ( बुद्धि ) **ज्ञानं** ( ज्ञान ) **असंमोहः** ( मोहशून्यता ) **क्षमा** ( अपराधाबद्दल शिक्षा न करणें, दया करणें ) **सत्यं** ( खरेंपणा ) **दमः** ( संयमन ) **शमः** ( शांतता ) **सुखं** ( सुख, आनंद ) **दुःखं** ( दुःख ) **भवः** ( असणें ) **अभावः** ( नसणें ) **भयं** ( भीति ) **च** ( आणि ) **अभयं** ( निर्भयता ) **एव** ( देखील ) **च** ( आणि ).

बुद्धिः ज्ञानं, असंमोहः क्षमा सत्यं दमः शमः सुखं दुःखं भवः अभावः भयं च अभयं एव च.

बुद्धि, ज्ञान, मोहशून्यता, क्षमा, खरेपणा, आत्मसंयमन, शांतता, सुख, दुःख, असणें, नसणें, भय आणि तशीच निर्भयता—( संबंध पुढें आहे )॥४॥

**अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः ।**
**भवंति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥ ५ ॥**

**अहिंसा** ( निरुपद्रवता ) **समता** ( सारखेपणा ) **तुष्टिः** ( संतोष ) **तपः** ( तपाचरण ) **दानं** ( देणगी ) **यशः** ( कीर्ति ) **अपयशः** ( अप-

कीर्ति ) भवंति ( होतात ) भावाः ( मनोविकार ) भूतानां ( प्राणिमात्रांचे ) मत्तः ( माझ्यापासून ) एव ( देखील ) पृथग्विधाः = पृथक् विधाः येषां ते ( निरनिराळे प्रकार ज्यांचे ते ).

अहिंसा, समता, तुष्टिः तपः दानं, यशः अपयशः ( इत्यादि ) भूतानां पृथग्विधाः भावाः मत्त एव भवंति.

अहिंसा, समता, संतोष, तप, दान, यश, अपयश इत्यादि प्राणिमात्रांचे नाना प्रकारचे मनोविकार माझ्यापासूनच उद्भवतात ॥ ५ ॥

**महर्षयः सप्तपूर्वे चत्वारो मनवस्तथा ।**
**मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥ ६ ॥**

**महर्षयः** ( मोठे ऋषी ) **सप्त** ( सात ) **पूर्वे** ( पुरातन, जुने ) **चत्वारः** ( चार कुमार ) **मनवः** ( १४ मनू ) **तथा** ( त्याचप्रमाणें ) **मद्भावाः** = मयि भावो येषां ते ( माझे ठायीं विश्वास ( भक्ति ) ज्यांचा ते = माझे भक्त ) **मानसाः** ( मनापासून ) **जाताः** ( उत्पन्न झाले ) **येषां** ( ज्यांचे ) **लोके** ( जगांत ) **इमाः** ( या ) **प्रजाः** ( प्रजा, संतति )

सप्त महर्षयः पूर्वे चत्वारः ( कुमाराः ) तथा मनवः मद्भावाः मानसाः जाताः येषां लोके इमाः प्रजाः ( जाताः ).

सात महाऋषी[1], पुरातन चार कुमार[2] तसेंच चौदा मनू[3], हे सर्व माझे

---

**टीप—१** सात महाऋषी = गौतम, भरद्वाज, विश्वामित्र, जमदग्नि, वसिष्ठ, कश्यप आणि अत्रि; किंवा मरीची, अत्रि, अंगिरस, पुलह, क्रतु, पुलस्त आणि वसिष्ठ. पहिलीं सात नांवें 'शतपथब्राह्मणां'त दिलेलीं आहेत दुसरीं सात नांवें महाभारतांत दिलीं आहेत. मरीचि इत्यादि सात ऋषींच्या नांवांत 'दक्ष अथवा प्रचेतस्' 'भृगु' आणि 'नारद' हीं तीन नांवें मिळवून त्या दहांना मनुस्मृतींत 'प्रजापति' असें म्हटलें आहे.

२ चार कुमार = हे ब्रह्मदेवाचे चार मानसपुत्र, सनत्, सनक, सनातन,, सनंदन हे होत.

३ चौदा मनू = स्वायंभूव, स्वारोचिष, औतमी, तापस, रैवत, चाक्षुष, वैवस्वत, सावर्णि, दक्षसावर्णि, ब्रह्मसावर्णि, धर्मसावर्णि, रुद्रसावर्णि, रौच्यदेवसावर्णि आणि इंद्रसावर्णि हे होत.

भक्त माझ्या मनापासून उत्पन्न झाले व पुढें त्यांच्यापासून ही प्रजा ( संतति ) उत्पन्न झाली ॥ ६ ॥

**एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्वतः ।**
**सोऽविकंपेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥ ७ ॥**

**एतां** ( हिला ) **विभूतिं** ( ऐश्वर्यदर्शक वस्तूला ) **योगं** ( योग-सामर्थ्याला ) **च** ( आणि ) **मम** ( माझ्या ) **यः** (जो) **वेत्ति** (जाणतो) **तत्वतः** ( मुळापासून, तात्विकदृष्ट्या ) **सः** ( तो ) **अविकंपेन** = न विकंपते इति तेन ( हालत नाहीं त्यानें, निश्चल ) **योगेन** ( योगानें ) **युज्यते** ( जोडतो, एकाग्र करतो ) **न** ( नाहीं ) **अत्र** ( येथें ) **संशयः** ( शंका ).

एतां मम विभूतिं च योगं च यः तत्वतः वेत्ति सः अविकंपेन योगेन युज्यते अत्र संशयः न ( अस्ति ).

या माझ्या सप्त महर्षी इत्यादि विभूति व माझा ऐश्वर्यलक्षणयोग ( सामर्थ्य ) जो तात्विकदृष्ट्या जाणतो त्याला निश्चल योगानें ( दृढ अभ्यासानें ) माझे ठिकाणीं ऐक्यता करतां येते ( सायुज्यता मिळते ) यांत शंका नाहीं ॥ ७ ॥

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।**
**इति मत्वा भजंते मां बुधा भावसमन्विताः ॥ ८ ॥**

**अहं** ( मी ) **सर्वस्य** ( सर्वांचा ) **प्रभवः** ( उत्पादक ) **मत्तः** ( माझ्यापासून ) **सर्वं** ( सर्व ) **प्रवर्तते** ( वाढतें, विकास पावतें ) **इति** ( याप्रमाणें ) **मत्वा** ( विचार करून ) **भजंते** ( भजतात ) **मां** (मला) **बुधाः** ( विद्वान् ) **भावसमन्विताः** = भावेन समन्विताः ( भक्तियुक्त अंतःकरण असणारे, भक्त ).

सर्वस्य प्रभवः अहं ( अस्मि ) मत्तः सर्वं प्रवर्तते इति मत्वा भाव-समन्विताः बुधाः मां भजन्ते.

सर्वांचा उत्पादक मी असून सर्वांस माझ्यापासूनच कर्मप्रवृत्ति होते असें जाणून भक्तियुक्त अंतःकरण असणारे विद्वान् लोक मला भजतात ॥ ८ ॥

मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम् ।
कथयतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥ ९ ॥

**मच्चित्ताः** = मयि चित्तं येषां ते ( माझ्या ठिकाणीं चित्त ज्यांचें ते ) **मद्गतप्राणाः** = मां गताः प्राणः येषां ते ( मजकडे प्राण लावलेले, जिवलग ) **बोधयंतः** ( उपदेश करणारे ) **परस्परम्** ( एकमेकांना ) **कथयंतः** ( सांगणारे ) **च** ( आणि ) **मां** ( मला ) **नित्यं** (सदोदित) **तुष्यंति** ( संतोष पावतात ) **च** ( आणि ) **रमंति** ( आनंदित होतात ) **च** ( आणि ).

मच्चिताः मद्गतप्राणाः परस्परम् बोधयंतः च मां नित्यं कथयंतः च ( ते ) तुष्यंति च रमंति.

माझ्याठायीं अंतःकरणाचा लय करून व मजकडे सर्व जीव लावून एकमेकांना बोध करणारे ते सर्वकाल माझ्या कथा ( लीला ) सांगून संतोष पावतात व आपलें मन रमवितात ( कीर्तन व श्रवणभक्तीनें रमवितात ) ॥ ९ ॥

तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।
ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥ १० ॥

**तेषां** ( त्यांना ) **सततयुक्तानां** = सततं युक्तानां ( सदोदित ध्यान-मग्न असणारांना ) **भजतां** ( भक्ति करणारांना ) **प्रीतिपूर्वकम्** ( प्रीति-युक्त अंतःकरणानें, प्रेमपूर्वक ) **ददामि** ( मी देतों , **बुद्धियोगं** = बुद्धेः योगं ( ज्ञानयोगाला ) **तं** ( त्याला ) **येन** ( ज्यानें ) **मां** ( मजप्रत ) **उपयांति** ( जवळ येतात ) **ते** ( ते ).

सततयुक्तानां प्रीतिपूर्वकं भजतां तेषां तं बुद्धियोगं ( अहं ) ददामि येन ते मां उपयांति.

त्या सदोदित ध्याननिष्ठ असणारांना व प्रीतिपूर्वक माझी भक्ति कर-णारांना मी ज्ञान देतों; त्या ज्ञानाच्या योगानें ते माझ्याजवळ येतात ( त्यांना समीपता मिळते ) ॥ १० ॥

तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः ।
नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ ११ ॥

**तेषां** ( त्यांच्या ) **एव** ( देखील ) **अनुकंपार्थं** = अनुकंपायाः अर्थं ( दया करावी म्हणून ) **अहं** ( मी ) **अज्ञानजं** = अज्ञानात् जातं ( अज्ञानापासून उत्पन्न झालेला ) **तमः** ( अंधकार, मोह ) **नाशयामि** ( नाश करतों ) **आत्मभावस्थः** = आत्मनः भावे स्थितः ( आत्मस्वरूपांत ( हृदयांत ) राहिलेला ) **ज्ञानदीपेन** = ज्ञानस्य दीपेन (ज्ञानज्योतीनें) **भास्वता** ( चकाकणाऱ्या, तेजस्वी ).

तेषां अनुकंपार्थं एव आत्मभावस्थः अहं भास्वता ज्ञानदीपेन अज्ञानजं तमः नाशयामि.

त्यांच्यावर केवळ दया करावी या हेतूनें त्यांच्यामध्यें आत्मस्वरूपस्थ ( हृदयस्थ ) असणारा मी त्यांच्या ठिकाणों अज्ञानापासून उत्पन्न होणारा मोह प्रकाशमान ज्ञानरूपी दीपानें नाहींसा करतों ॥ ११ ॥

अर्जुन उवाच—**परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ।**
**पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥ १२ ॥**

**परं** ( श्रेष्ठ ) **ब्रह्म** ( ब्रह्म ) **परं** ( श्रेष्ठ ) **धाम** ( निवासस्थान ) **पवित्रं** ( शुद्ध अथवा शुद्ध करणारा ) **परमं** ( श्रेष्ठ ) **भवान्** ( तुम्ही, आपण ) **पुरुषं** ( मनुष्य ) **शाश्वतं** ( सनातन, नित्य ) **दिव्यं** ( दैवी, देवाचा ) **आदिदेवं** (पहिला देव) **अजं** (जन्मरहित) **विभुम्** (स्वामी).

भवान् परं ब्रह्म परं धाम परमं पवित्रं शाश्वतं दिव्यं पुरुषं आदिदेवं अजं विभुम् ( याचा संबंध पुढच्या श्लोकांत आहे ).

अर्जुन म्हणाला—आपण परब्रह्म, श्रेष्ठ निवासस्थान, अत्यंत पवित्र, नित्य, दिव्य पुरुष, आदिदेव, जन्मरहित ईश्वर आहां.

**आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ।**
**असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥ १३ ॥**

**आहुः** ( म्हणतात ) **त्वाम्** ( तुला ) **ऋषयः** ( ऋषी ) **सर्वे** (सर्व) **देवर्षिः** ( देवऋषी, ऋषीश्रेष्ठ ) **नारदः** ( नारद ) **तथा** ( सुद्धां ) **असितः** ( असित ) **देवलः** ( देवल ) **व्यासः** ( व्यास ) **स्वयं** ( स्वतः ) **च** (आणि) **एव** ( देखील ) **ब्रवीषि** (सांगतोस) **मे** (मला).

सर्वे ऋषयः त्वाम् ( एवम् ) आहुः तथा च देवर्षिः नारदः असितः देवलः व्यासः ( एते आहुः ) च स्वयं एव मे ब्रवीषि.

सर्व ऋषींनीं आपणाला याप्रमाणें म्हटलें आहे, त्याप्रमाणें देवर्षि, नारद, असित, देवल व व्यासमुनी यांनींही म्हटलें आहे आणि आपण स्वतः देखील आतां तसेंच सांगत आहां ॥ १३ ॥

**सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।**
**न हि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥ १४ ॥**

**सर्वं** ( सर्व ) **एतत्** ( हें ) **ऋतं** ( खरें ) **मन्ये** ( मानतों ) **यत्** ( जें ) **मां** ( मला ) **वदसि** ( सांगतोस ) **केशव** ( हे केशवा ) **न** ( नाहीं ) **हि** ( कारण ) **ते** ( तुझी ) **भगवन्** ( हे देवा ) **व्यक्तिं** ( प्रगट होणें, स्वरूप ) **विदुः** ( जाणलें ) **देवाः** ( देवांनीं ) **न** ( नाहीं ) **दानवाः** ( असुरांनीं, राक्षसांनीं ).

हे केशव, यत् मां वदसि एतत्सर्वं ऋतं मन्ये, हि हे भगवन् ते व्यक्तिं न देवाः न च दानवाः विदुः.

हे केशवा, तूं मला जें सांगत आहेस तें सर्व मी खरें मानतों; कारण हे भगवंता, तुझें स्वरूप देवांनीं व दानवांनींही खरोखर जाणलें नाहीं ( देवांना व दानवांनाही कळलें नाहीं ) ॥ १४ ॥

**स्वयमेवात्मनाऽऽत्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।**
**भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥ १५ ॥**

**स्वयं** ( तूं स्वतः ) **एव** ( फक्त ) **आत्मना** ( आत्मज्ञानानें ) **आत्मानं** ( स्वतःला ) **वेत्थ** ( जाणलेंस ) **त्वं** ( तूं ) **पुरुषोत्तम** ( हे पुरुषोत्तमा ) **भूतभावन** = भूतानि भावयसि इति (प्राणिमात्रांना निर्माण करवितोस याप्रमाणें, प्राणिमात्रांना निर्माण करविणारा ) **भूतेश** = भूतानां ईश ( प्राणिमात्रांचा ईश्वर ) **देवदेव** = देवांना देव ( देवांचा देव ) **जगत्पते** = जगतः पते ( जगाचा स्वामी ).

( हे ) पुरुषोत्तम, ( हे ) भूतभावन, ( हे ) भूतेश, ( हे ) जगत्पते, ( हे ) देवदेव त्वं स्वयं एव आत्मना आत्मानं वेत्थ.

हे पुरुषोत्तमा, सृष्टि करविणाऱ्या भूतेशा देवदेवा, जगदीशा, फक्त आपणांसच आपल्या आत्मज्ञानानें आपलें आत्मस्वरूप कळलें आहे ॥ १५ ॥

**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः।**
**याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥ १६ ॥**

**वक्तुं** ( सांगावयाला ) **अर्हसि** ( योग्य आहेस ) **अशेषेण** ( कांहीं शिल्लक न ठेवतां, समग्र ) **दिव्याः** ( दैवी ) **हि** ( खरोखर) **आत्मविभूतयः** = आत्मनः विभूतयः ( विशेष रीतीनें आपलें महत्व दाखविणारे अलौकिक प्राणी व पदार्थ ) **याभिः** ( ज्यांनीं ) **विभूतिभिः** ( अलौकिक प्राणी व पदार्थ यांनीं ) **लोकान्** ( लोकांना, सृष्टीला ) **इमान्** ( या ) **त्वं** ( तूं ) **व्याप्य** ( व्यापून ) **तिष्ठसि** ( राहतोस ).

हि याः दिव्याः आत्मविभूतयः ( संति ) याभिः विभूतिभिः इमान् लोकान् व्याप्य त्वं तिष्ठसि, ताः अशेषेण वक्तुं अर्हसि.

याकरतां आपलें महत्व विशेष रीतीनें दाखविणारे अलौकिक प्राणी व पदार्थ कोणकोणते ते समग्र मला सांगण्यास आपणच समर्थ आहां. कारण याच अलौकिक प्राणी व पदार्थ यांच्या योगानें आपण सर्व सृष्टि व्यापून राहिलां आहां ( आपलें माहात्म्य सर्व सृष्टीभर विस्तृत झालें आहे) ॥ १६ ॥

**कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिंतयन्।**
**केषु केषु च भावेषु चिंत्योऽसि भगवन्मया ॥ १७ ॥**

**कथं** ( कसें ) **विद्याम्** ( जाणावें ) **अहं** ( मी ) **योगिन्** ( हे योगेश्वरा ) **त्वां** ( तुला ) **सदा** ( सर्वकाल ) **परिचिंतयन्** ( ध्यान करून, चिंतन करून ) **केषु** ( कोणत्या ) **केषु** ( कोणत्या ) **च** ( आणि ) **भावेषु** ( स्वरूपांनीं ) **चिंत्यः** ( चिंतन करावयास योग्य ) **असि** ( आहेस ) **भगवन्** ( हे भगवंता ) **मया** ( माझ्यानें ).

हे योगिन् सदा परिचिंतयन् अहं त्वां कथं विद्याम् च हे भगवन् केषु केषु भावेषु मया चिंत्यः ( त्वं ) असि ?

हे योगिराज, मी आपलें सदोदित चिंतन करीत असतांही ( अज्ञ असल्यामुळें ) आपल्याला कसें ओळखूं? आणि कोणकोणत्या स्वरूपांनीं आपलें ध्यान करूं? ॥ १७ ॥

विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन ।
भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥ १८ ॥

विस्तरेण ( विस्तारानें ) आत्मनः ( आपला स्वतःचा ) योगं ( ऐश्वर्य ) विभूतिं ( विभूति ) च ( आणि ) जनार्दन ( हे विष्णो ) भूयः ( पुनः ) कथय ( सांग ) तृप्तिः ( समाधान ) हि ( कारण ) शृण्वतः ( ऐकण्याची ) न ( नाहीं ) अस्ति ( आहे ) मे ( माझें ) अमृतम् ( सुधा, अमृत ).

हे जनार्दन आत्मनः योगं च विभूतिं च भूयः विस्तरेण कथय, हि अमृतं शृण्वतः मे तृप्तिः न अस्ति.

हे जनार्दना, आपला योग व ऐश्वर्य हीं पुनः विस्तारानें सांगा. कारण आपली ( ज्ञानोपदेश करणारी ) अमृतवाणी ऐकण्याची अद्यापि माझी तृप्ति झाली नाहीं ॥ १८ ॥

श्रीभगवानुवाच—हंत ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ।
प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यंतो विस्तरस्य मे ॥ १९ ॥

हंत ( बरें तर ) ते ( तुला ) कथयिष्यामि ( सांगेन ) दिव्याः (दैविक) हि (खरोखर) आत्मविभुतयः = आत्मनः विभूतयः (आपल्या विभूति ) प्राधान्यतः (मुख्यत्वेंकरून) कुरुश्रेष्ठ (हे कौरवश्रेष्ठा, अर्जुना) न ( नाहीं ) अस्ति ( आहे ) अंतः ( शेवट ) विस्तरस्य ( विस्ताराचा ) मे ( माझ्या ).

हंत कुरुश्रेष्ठ, याः दिव्याः आत्मविभूतयः ( संति ताः ) प्राधान्यतः तें कथयिष्यामि हि मे विस्तरस्य अंतः न अस्ति.

बरें तर, ( ज्या ) माझ्या दिव्य विभूती ( आहेत त्या ) तुला मुख्यत्वें-करून सांगतों. हे अर्जुना, माझ्या विस्ताराला अंत नाहीं ॥ १९ ॥

अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ।
अहमादिश्च मध्यं च भूतानामंत एव च ॥ २० ॥

अहं ( मी ) आत्मा (आत्मा, चैतन्यतत्व) गुडाकेश = गुडाकायाः ( निद्रायाः ) ईश ( स्वामी ) = ( हे जितेंद्रिया अर्जुना ) सर्वभूताशय-

**स्थितः** ( सर्व प्राण्यांच्या अंतःकरणांत वास करणारा ) **अहं** ( मी ) **आदिः** ( उगम ) **च** ( आणि ) **मध्यं** ( मधला ) **च** (आणि) **भूतानां** ( प्राण्यांचा ) **अंतः** ( शेवट ) **एव** ( देखील ) **च** ( आणि ).

हे गुडाकेश अहं सर्वभूताशयस्थितः आत्मा ( अस्मि ) अहं भूतानां आदिः च मध्यं च अंतः एव च.

अर्जुना, सर्व प्राण्यांच्या अंतःकरणांत राहणारा आत्मा मी आहें. सर्व प्राण्यांचा जन्मदाता, पालनकर्ता व संहारकर्ताही मीच आहें ॥ २० ॥

**आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् ।**
**मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥ २१ ॥**

**आदित्यानां** ( १२ सूर्यांपैकीं[1] ) **अहं** ( मी ) **विष्णुः** ( विष्णु: नांवाचा सूर्य ) **ज्योतिषां** ( तेजस्वी पदार्थांमध्यें ) **रविः** ( सूर्य ) **अंशुमान्** ( किरणयुक्त, तेजःपूंज ) **मरीचिः** ( मरीची नांवाची वायु देवता ) **मरुतां** ( वायूंमध्यें, मरुत नांवांच्या देवतांमध्यें ) **नक्षत्राणां** ( नक्षत्रांमध्यें ) **अहं** ( मी ) **शशी** ( चंद्र ).

आदित्यानां विष्णुः ( च ) ज्योतिषां अंशुमान् रविः अहं ( अस्मि ); मरुतां मरीचिः ( च ) नक्षत्राणां शशी अहं अस्मि.

आदित्यदेवांपैकीं विष्णु मी आहें, सर्व तेजस्वी पदार्थांमध्यें तेजःपुंज असा जो सूर्य तो मी आहें, वायुदेवतांपैकीं मरीची मी, आणि नक्षत्रांमध्यें चंद्र मी आहें ॥ २१ ॥

**वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः ।**
**इंद्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥ २२ ॥**

**वेदानां** ( वेदांमध्यें ) **सामवेदः** ( सामवेद ) **अस्मि** ( आहें ) **देवानां** ( देवांमध्यें ) **अस्मि** ( आहें ) **वासवः** ( इंद्र ) **इंद्रियाणां** ( इंद्रियांत ) **मनः** ( मन ) **च** ( आणि ) **अस्मि** ( आहें ) **भूतानां** ( प्राण्यांचा ) **अस्मि** ( आहें ) **चेतना** ( प्राण, जीव ).

---

१ आदितीच्या पुत्रांना आदित्य अशी संज्ञा आहे. आदित्य म्ह० १२सूर्य.

अहं वेदानां सामवेदः अस्मि, ( अहं ) देवानां वासवः अस्मि ( अहं ) इंद्रियाणां मनः अस्मि च ( अहं ) भूतानां चेतना अस्मि.

वेदां[1]मध्यें सामवेद मी आहें; देवांपैकीं इंद्र मी आहें, इंद्रियांपैकीं[2] मन मी आहें आणि प्राण्याचा प्राण ( चेतनाशक्ति ) मी आहें ॥ २२ ॥

**रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ।**
**वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥ २३ ॥**

**रुद्राणां** (एकादश रुद्रांमध्यें) **शंकरः** ( शंकर ) **च** (आणे) **अस्मि** ( आहें ) **वित्तेशः** ( संपत्तीचा मालक, कुबेर ) **यक्षरक्षसां** = यक्षाणां च रक्षसां च ( यक्ष व राक्षस यांच्यामध्यें ) **वसूनां** ( वसूंदेवतांपैकीं ) **पावकः** ( अग्नि ) **मेरुः** ( मेरु पर्वत ) **शिखरिणां** = शिखराणि येषां संति तेषां ( शिखरें ज्यांस आहेत ते पर्वत, त्या पर्वतांमध्यें ) **अहं** ( मी ).

च रुद्राणां शंकरः अस्मि, यक्षरक्षसां वित्तेशः ( अस्मि ), च वसून पावकः अस्मि, अहं शिखरिणां मेरुः ( अस्मि ).

आणि एकादश रुद्रांमध्यें शंकर मी आहें, यक्ष व राक्षसांमध्यें धनाधिपति कुबेर मी आहें, वसूं[3]मध्यें पावक मी आहें आणि पर्वतांपैकीं मेरु मी आहें ॥ २३ ॥

---

१ वेद चार आहेत—ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद आणि अथर्ववेद.

२ इंद्रियें अकरा आहेतः—पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें आणि अकरावें मन.

३ ‘ वसु ’ या शब्दाचे येथें घेतां येतील असे अर्थ तीन आहेत तेः—पाणी, अग्नि व वसुदेवतांचीं नांवें:–आप किंवा अह, ध्रुव, सोम, धर अथवा धव, अनिल, अनल, प्रत्युष आणि प्रभास. हा तिसरा अर्थ या श्लोकांत संभवत नाहीं. कारण या वसूंच्या आठ नांवांमध्यें ‘पावक’ हें नांव येत नाहीं. ‘ वसु शब्दाचा ‘ जल ’ असा अर्थ घेतल्यास ‘ पावक ’ शब्दाचा ‘ वरुण ’ असा अर्थ करावा आणि ‘ वसु ’ शब्दाचा ‘ अग्नि ’ असा अर्थ केल्यास ‘ पावक ’ याचा ‘ पावक ’ नांवाचा अग्नि असा अर्थ होतो. ‘ पावक ’ हें अग्नीला ‘ स्वाहा ’ नांवाच्या भार्येपासून झालेल्या तीन मुलांपैकीं एकाचें नांव आहे. या तीन मुलांना ४५ मुलें झालीं; तीं ४५, स्वाहाचे पुत्र ३, आणि अग्नि अशीं एकंदरीत अग्नीचीं नांवें ४९ आहेत.




**पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् ।**
**सेनानीनामहं स्कंदः सरसामस्मि सागरः ॥ २४ ॥**

**पुरोधसां** ( कुलपुरोहितांमध्यें ) **च** ( आणि ) **मुख्यं** ( मुख्य ) **मां** ( मला ) **विद्धि** ( जाण ) **पार्थ** ( पार्था ) **बृहस्पतिं** ( बृहस्पतीला ) **सेनानीनां** = सेनां नयंति इति तेषां ( सेनानायकांमध्यें ) **अहं** ( मी ) **स्कंदः** ( शंकराचा पुत्र कार्तिकेय ) **सरसां** (सरोवरांमध्यें, जलाशयांमध्यें) **अस्मि** ( आहें ) **सागरः** ( समुद्र ).

हे पार्थ, पुरोधसां मुख्यं बृहस्पतिं मां विद्धि च सेनानीनां स्कंदः अहं अस्मि ( च ) सरसां सागरः ( अहं अस्मि ).

पार्था, कुलपुरोहितांमध्यें मुख्य ' बृहस्पति ' तो मी आहें असें समज; सेनानायकांपैकीं कार्तिकेय मी आणि जलाशयांमध्यें समुद्र मी आहें ॥२४॥

**महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् ।**
**यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥ २५ ॥**

**महर्षीणां** ( महाऋषींमध्यें ) **भृगुः** ( भृगु ) **अहं** ( मी ) **गिरां** ( शब्दांमध्यें ) **अस्मि** ( आहें ) **एकं** (एक) **अक्षरं** ( अक्षर ) **यज्ञानां** ( यज्ञामध्यें ) **जपयज्ञः** = जपस्य यज्ञः ( जपाचा यज्ञ ) **अस्मि** ( मी आहें ) **स्थावराणां** ( अचल वस्तूंमध्यें ) **हिमालयः** (हिमालय पर्वत).

महर्षीणां भृगुः च गिरां एकं अक्षरं अहं अस्मि, यज्ञानां जपयज्ञः ( च ) स्थावराणां हिमालयः ( अहं ) अस्मि.

महर्षींमध्यें भृगु मी आहें आणि शब्दांमध्यें एकाक्षरी शब्द ' ॐ ' मी आहें; यज्ञांमध्यें जपयज्ञ मी, आणि अचल वस्तूंत हिमालय पर्वत मी आहें ॥ २५ ॥

**अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः ।**
**गंधर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥ २६ ॥**

**अश्वत्थः** ( पिंपळ ) **सर्ववृक्षाणां** = सर्वेषां वृक्षाणां (सर्व प्रकारच्या झाडांमध्यें, वृक्षविशेषांत ) **देवर्षीणां** ( देवऋषींमध्यें ) **च** ( आणि ) **नारदः** ( नारद ) **गंधर्वाणां** ( गंधर्वांमध्यें ) **चित्ररथः** ( चित्ररथ

नांवाचा गंधर्व ) **सिद्धानां** ( सिद्ध पुरुषांमध्यें ) **कपिलः** ( कपिल ) **मुनिः** ( मुनि )

सर्ववृक्षाणां अश्वत्थः च देवर्षीणां नारदः, गंधर्वाणां चित्ररथः ( च ) सिद्धानां मुनिः कपिलः.

सर्व वृक्षांमध्ये पिंपळ मी, देवर्षींमध्यें नारद मी, गंधर्वांमध्यें चित्ररथ गंधर्व मी आणि सिद्ध पुरुषांमध्यें ( पूर्णतेला पोंचलेल्यांत ) कपिलमुनि मी आहें ॥ २६ ॥

**उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् ।**
**ऐरावतं गजेंद्राणां नराणां च नराधिपम् ॥ २७ ॥**

**उच्चैःश्रवसं** ( उच्चैःश्रवा नांवाचा इंद्राचा घोडा ) **अश्वानां** ( घोड्यांमध्यें ) **विद्धि** ( जाण ) **मां** ( मला ) **अमृतोद्भवं** = अमृतात् उद्भवः यस्य तं ( अमृतापासून = क्षीर ( दुग्ध ) समुद्रापासून ज्याची उत्पत्ति झाली त्याला ) **ऐरावत** ( 'ऐरावत' नांवाचा हत्ती ) **जेंद्राणां** ( गजराजांमध्यें, हत्तींच्या जातींत ) **नराणां** ( मनुष्यांमध्यें ) **च** ( आणि ) **नराधिपम्** = नराणां अधिपं ( राजाला ).

अश्वानां अमृतोद्भवम् उच्चैःश्रवसं च गजेंद्राणां ऐरावतं च नराणां नराधिपं ( इति ) मां विद्धि.

घोड्यांमध्यें समुद्रमंथनाचे वेळीं निघालेल्या उच्चैःश्रवा[1] नांवाचा इंद्राचा घोडा मी, गजराजांमध्यें ऐरावत नांवाचा इंद्राचा हत्ती तो मी, आणि मनुष्यांमध्यें त्यांचा मुख्य राजा तो मी असें समज ॥ २७ ॥

**आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् ।**
**प्रजनश्चास्मि कंदर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥ २८ ॥**

---

१ उच्चैःश्रवाची व ऐरावताची आणि विष्णूची उत्पत्ति समुद्रापासून झालेली आहे. समुद्रमंथनापासून चौदा रत्नें निघालीं तीं—लक्ष्मी, कौस्तुभमणि, पारिजातक वृक्ष, सुरा, धन्वंतरि, चंद्र, कामधेनु, ऐरावत हत्ती, रंभा, उच्चैःश्रवा घोडा, हलाहल विष, इंद्रधनुष्य, शंख आणि अमृत.

**आयुधानां** ( शस्त्रांमध्यें ) **अहं** ( मी ) **वज्रं** ( वज्र नांवाचें शस्त्र ) **धेनूनां** ( गार्यींमध्यें ) **अस्मि** ( आहें ) **कामधुक्** = कामान् दोग्धि इति ( इच्छित वस्तु देणारी, कामधेनु ) **प्रजनः** ( प्रजोत्पत्ति करणारां-मध्यें ) **च** ( आणि ) **अस्मि** ( आहें ) **कंदर्पः** ( मदन ) **सर्पाणां** ( सापांमध्यें ) **अस्मि** ( आहें ) **वासुकिः** ( वासुकी नांवाचा साप ).

अहं आयुधानां वज्रं ( च ) धेनूनां कामधुक् अस्मि ( अहं ) प्रजनः कंदर्पः अस्मि च सर्पाणां वासुकिः अस्मि.

मी शस्त्रांमध्यें वज्र, गार्यींमध्यें कामधेनु, प्रजोत्पादकांमध्यें मदन आणि सर्पांमध्यें वासुकि आहें ॥ २८ ॥

**अनंतश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् ।**
**पितॄणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥ २९ ॥**

**अनंतः** ( शेष ) **च** ( आणि ) **अस्मि** ( आहें ) **नागानां** ( नाग-सर्पांमध्यें ) **वरुणः** ( वरुण ) **यादसां** ( जलचर प्राण्यांत ) **अहं** ( मी ) **पितॄणां** ( पितरांमध्यें ) **अर्यमा** ( अर्यमा नांवाचा पितर ) **च** (आणि) **यमः** ( यम ) **संयमतां** ( निग्रही पुरुषांत ) **अहं** ( मी ).

अहं नागानां अनंतः च यादसां वरुणः अस्मि, अहं पितॄणां अर्यमा च संयमतां यमः अस्मि.

मी नागसर्पांमध्यें शेष व जलचरांमध्यें वरुण आहें; मी पितरांमध्यें अर्यमा आणि निग्रही पुरुषांमध्यें यम आहें.

**प्रल्हादश्चास्मि दैत्यानां कालःकलयतामहम् ।**
**मृगाणां च मृगेंद्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥ ३० ॥**

**प्रल्हादः** ( हिरण्यकशिपूचा पुत्र प्रल्हाद ) **च** ( आणि ) **अस्मि** ( आहें ) **दैत्यानां** ( दैत्यांमध्यें ) **कालः** ( काळ, वेळ ) **कलयतां** ( गणना करणारांचा ) **अहं** ( मी ) **मृगाणां** ( श्वापदांतील ) **मृगेंद्रः** = मृगाणां इंद्रः ( सिंह ) **वैनतेयः** = विनतायाः अपत्यं पुमान् ( विनतेचा पुत्र, गरुड ) **च** ( आणि ) **पक्षिणाम** ( पक्ष्यांमध्यें ).

अहं दैत्यानां प्रल्हादः च कलयतां कालः अस्मि च मृगाणां मृगेंद्रः च अहं पक्षिणां वैनतेयः ( अस्मि ).

दैत्यांपैकीं प्रल्हाद मी, कालगणना करणारांचा काळ मी, श्वापदांचा स्वामी सिंह मी, आणि पक्ष्यांचा राजा गरुड मी आहें ॥ ३० ॥

पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम् ।
झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जान्हवी ॥ ३१ ॥

**पवनः** ( वायु ) **पवतां** ( पावन करणारांत ) **अस्मि** ( आहें ) **रामः** ( राम ) **शस्त्रभृतां** = शस्त्राणि बिभ्रति इति तेषां ( शस्त्रें धारण करणारामध्यें, योध्यांमध्यें ) **अहं** ( मी ) **झषाणां** ( माशांमध्यें ) **मकरः** ( मगर, सुसर ) **च** ( आणि ) **अस्मि** ( आहें ) **स्रोतसां** ( प्रवाहांत, नद्यांमध्यें ) **अस्मि** ( आहें ) **जान्हवी** = जन्होः अपत्यं स्त्री ( जहु राजाची मुलगी, गंगा ).

अहं पवतां पवनः अस्मि ( च ) शस्त्रभृतां रामः झषाणां मकरः अस्मि. च स्रोतसां जान्हवी अस्मि.

निर्मल व स्वच्छ करणाऱ्या पदर्थांमध्यें वायु मी, योध्यांमध्यें राम मी, मत्स्यादि जलचरांमध्यें मगरमासा ( सुसर ) मी, आणि नद्यांमध्यें गंगानदी मी आहें ॥ ३१ ॥

सर्गाणामादिरंतश्च मध्यं चैवाहमर्जुन ।
अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥ ३२ ॥

**सर्गाणां** ( सृष्टयांचा ) **आदि** ( उगम ) **अंतः** ( शेवट ) **च** ( आणि ) **मध्यं** ( मध्य, मधला भाग ) **च** ( आणि ) **एव** ( देखील ) **अहं** ( मी ) **अर्जुन** ( हे अर्जुना ) **अध्यात्मविद्या** = अध्यात्मनः विद्या ( आत्म्याविषयीं विद्या, आत्मविद्या ) **विद्यानां** ( विद्यांमध्यें ) **वादः** ( निर्णयाद्यर्थ परस्परांचें प्रश्नोत्तररूप जें भाषण तो ) **प्रवदतां** ( बोलणारांचा).

---

१ वाद, जल्प, वितंडा इत्यादि अनेक प्रकारचे वाद आहेत. त्याचे सूक्ष्म भेद असेः—वाद = सत्याचा निर्णय होण्याकरितां जें बोलणें तें; जल्प वादांत जिंकण्याकरितां कोटिक्रम वगैरे करून दुसऱ्यास निरुत्तर करण्याकरितां जें बोलणें तें; आणि वितंडा म्हणजे स्वमत स्थापन करण्याकरितां दुसऱ्याचें न ऐकतां आग्रह धरून जें बोलणें तें.

अहं सर्गाणां आदिः च मध्यं च अंतः एव ( अस्मि ) हे अर्जुन, अहं विद्यानां अध्यात्मविद्या ( च ) प्रवदतां वादः ( अस्मि ).

मी सर्व सृष्टपदार्थांचा उगम, मध्य व शेवट आहें. अर्जुना, विद्यांमध्यें आत्मविद्या मी आणि बोलणारांचा सत्यनिर्णयार्थ जो वाद ( बोलणें ) तो मी आहें ॥ ३२ ॥

**अक्षराणामकारोऽस्मि द्वंद्वः सामासिकस्य च ।**
**अहमेवाक्षयः कालो धाताऽहं विश्वतोमुखः ॥ ३३ ॥**

**अक्षराणां** ( अक्षरांमध्यें ) **अकारः** ( 'अ'कार ) **अस्मि** ( मी आहें ) **द्वंद्वः** ( द्वंद्व समास ) **सामासिकस्य** = समासानां समूहः तस्य ( समासांच्या समूहांमध्यें ) **च** ( आणि ) **अहं** ( मी ) **एव** ( सुद्धां ) **अक्षयः** ( सनातन ) **कालः** ( काळ ) **धाता** ( पालनकर्ता ) **अहं** ( मी ) **विश्वतोमुखः** ( सर्व दिशांकडे मुखें असणारा ).

अहं अक्षराणां अकारः च सामासिकस्य द्वंद्वः अस्मि. अहं अक्षयः कालः ( च ) विश्वतोमुखः धाता अस्मि.

अक्षरांतील पहिलें अक्षर ' अ ' हें मी आहें तसेंच समासांतील द्वंद्व समास मी, सनातन काल मी, ( सर्व बाजूंस दृष्टि पोंचवून ) जगाचें पालन करणारा मी आहें ॥ ३३ ॥

**मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ।**
**कीर्तिः श्रीर्वाकच नारीणां स्मृतिर्मेधा धृति क्षमा ॥३४॥**

**मृत्युः** ( मरण, मृत्यु ) **सर्वहरः** = सर्वं हरति इति ( सर्वांचा नाश करणारा, सर्वसंहारक ) **च** ( आणि ) **अहं** ( मी ) **उद्भवः** ( उत्कर्ष, भरभराट ) **च** ( आणि ) **भविष्यतां** ( भविष्यकालीन, भावी वस्तूंचा ) **कीर्तिः** (कीर्ति) **श्रीः** (संपत्ति) **वाक्** (वाणी) **च** (आणि) **नारीणां** ( स्त्रीवाचक वस्तूंमध्यें ) **स्मृतिः** ( आठवण ) **मेधा** ( बुद्धि ) **धृतिः** ( स्थिरता ) **क्षमा** ( क्षमा ).

च अहं सर्वहरः मृत्युः च भविष्यतां उद्भवः च नारीणां कीर्तिः श्री वाक् स्मृतिः मेधा, धृतिः क्षमा ( अस्मि ).

आणि सर्वसंहारक मृत्यु मी आहें, भावी वस्तूंचा उत्कर्ष मी आहें, स्त्री-वाचक वस्तूंमध्यें कीर्ति, संपत्ति, वाणी, आठवण, बुद्धिस्थिरता, व क्षमा मी आहें ॥ ३४ ॥

**बृहत्साम तथा साम्नां गायत्री छंदसामहम् ।**
**मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ॥ ३५ ॥**

**बृहत्साम** ( बृहत्साम नांवाचें स्तोत्र ) **तथा** ( त्याप्रमाणें ) **साम्नां** ( सामवेदांतील स्तोत्रांमध्यें , **गायत्री** ( गायत्रीछंद ) **छंदसां** ( छंदांमध्यें ) **अहं** ( मी ) **मासानां** ( महिन्यांमध्यें ) **मार्गशीर्षः** ( मार्गशीर्ष महिना ) **अहं** ( मी ) **ऋतूनां** ( ऋतूंपैकीं ) **कुसुमाकरः** = कुसुमानां आकरः ( फुलांचा खाण, वसंतऋतु ).

तथा साम्नां बृहत्साम ( च ) छंदसां गायत्री ( अस्मि ) अहं मासानां मार्गशीर्षः ( च ) ऋतूनां कुसुमाकरः ( अस्मि ).

सामवेदांतील स्तोत्रांमध्यें बृहत्साम स्तोत्र तें मी आहें, छंदांमध्यें गायत्रीछंद मी, महिन्यांतील मार्गशीर्ष महिना मी, आणि ऋतूंमध्यें वसंत ऋतु मी आहें ॥ ३५ ॥

**द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।**
**जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम् ॥३६॥**

**द्यूतं** ( जुगार खेळणें ) **छलयतां** ( फसवणुकीच्या धंद्यांमध्यें ) **तेजः** ( कांति, वीर्य ) **तेजस्विनां** ( शोभिवंत वस्तूंतील, प्रभावशाली पुरुषांतील ) **अहं** (मी) **जयः** ( यश ) **अस्मि** ( आहें ) **व्यवसायः** ( उद्योग, निश्चय ) **अस्मि** ( आहें ) **सत्त्वं** ( सत्व, सार ) **सत्त्ववतां** ( सात्विक पुरुषांतील ) **अहं** ( मी ).

छलयतां द्यूतं च तेजस्विनां तेजः अहं अस्मि, जयः अस्मि व्यवसायः, अस्मि च सत्त्ववतां सत्त्वं अहं ( अस्मि ).

फसवणुकीच्या धंद्यांपैकीं जुगार खेळणें तें मी, तेजस्वी वस्तूंतील तेज मी, लढणाऱ्यांचा जय मी, ( उद्योगी लोकांचा ) उद्योग मी आणि सात्विक पुरुषांतील सत्वगुण मी आहें ॥ ३६ ॥

**वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पांडवानां धनंजयः ।**
**मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ॥ ३७ ॥**

**वृष्णीनां** ( वृष्णि कुलांतील, यादवांपैकीं ) **वासुदेवः** ( वासुदेव ) **अस्मि** ( आहें ) **पांडवानां** ( पांडवांमध्यें ) **धनंजयः** ( धनंजय, अर्जुन ) **मुनीनां** ( मुनींमध्यें ) **अपि** ( सुद्धां ) **अहं** ( मी ) **व्यासः** ( व्यास ) **कवीनां** ( शाहण्या ज्ञात्यांमध्यें ) **उशना** ( शुक्राचार्य ) **कविः** ( ज्ञाता ).

वृष्णीनां वासुदेवः ( च ) पांडवानां धनंजयः अस्मि; अपि मुनीनां अहं व्यासः ( च ) कवीनां उशना कविः ( अस्मि ).

यादवांतील वासुदेव मी, पांडवांपैकीं अर्जुन मी, मुनींमध्यें व्यासमुनी मी आणि शहाण्या ज्ञात्यांमध्यें शुक्राचार्य मी आहें ॥ ३७ ॥

**दंडो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् ।**
**मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥ ३८ ॥**

**दंड** ( दंड, काठी ) **दमयतां** ( शासनकर्त्यांचा ) **अस्मि** (मी आहें) **जिगीषतां** ( विजयोत्सुकांची ) **नीतिः** ( नीति, मुत्सद्दीपणा ) **अस्मि** ( मी आहें ) **मौनं** ( न बोलणें, मूकवृत्ति ) **च** ( आणि ) **एव** ( देखील ) **अस्मि** ( मी आहें ) **गुह्यानां** ( गुप्त गोष्टींतील ) **ज्ञानं** ( ज्ञान ) **ज्ञानवतां** ( जाणणारांचें ) **अहं** ( मी ).

अहं दमयतां दंडः अस्मि च जिगीषतां नीतिः अस्मि, च गुह्यानां मौनं अस्मि ( च ) ज्ञानवतां ज्ञानं ( अहं अस्मि ).

शासनकर्त्यांचा दंड मी, विजयप्राप्तीची इच्छा करणारांची नीति मी, गुप्त ठेवण्याच्या साधनांतील मौन मी आणि ज्ञानी पुरुषांचें ज्ञान मी आहें ॥ ३८ ॥

**यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन ।**
**न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ॥ ३९ ॥**

**यत्** ( जें ) **च** ( आणि ) **अपि** ( सुद्धां ) **सर्वभूतानां** ( सर्व प्राण्यांचें ) **बीजं** ( बीं ) **तत्** ( तें ) **अहं** ( मी ) **अर्जुन** ( अर्जुना )

न ( नाहीं ) तत् ( तें ) अस्ति ( आहे ) विना ( शिवाय ) यत् (जें) स्यात् ( असेल ) मया ( माझ्यानें ) भूतं ( प्राणी ) चराचरं = चरं च अचरं च ( स्थावरजंगम ).

च अर्जुन, यत् अपि सर्व भूतानां बीजं तत् अहं ( अस्मि ) यत् मया विना स्यात्, तत् चराचरं भूतं न अस्ति.

आणि अर्जुना, सर्व प्राणिमात्रांचें सुद्धां मूळ बीज मीच आहें. आणि माझ्याशिवाय राहूं शकेल अशी स्थावरजंगमात्मक वस्तुच नाहीं.

नांतोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप ।
एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥ ४० ॥

न ( नाहीं ) अंतः ( शेवट ) अस्ति ( आहे ) मम ( माझ्या ) दिव्यानां ( दैवी ) विभूतीनां ( विभूतींचा, अवतारमूर्तींचा ) परंतप ( अर्जुना ) एष ( हा ) तु ( खरोखर ) उद्देशतः ( कांहीं उदाहरणें देऊन, थोडक्यांत ) प्रोक्तः ( सांगितला ) विभूतेः ( ऐश्वर्याचा, अवतार-मूर्तींचा ) विस्तरः ( विस्तार ) मया ( मीं ).

( हे ) परंतप, मम दिव्यानां विभूतीनां अंतः न अस्ति, तु एषा विभूतेः विस्तरः मया उद्देशतः प्रोक्तः.

हे अर्जुना, माझ्या दिव्य विभूतींना अंत नाहीं. हा विभूतींचा विस्तार जो तुला सांगितला तो तुझ्या समजुतीकरतां कांहीं उदाहरणें देऊन केवळ अंशमात्र सांगितला आहे ॥ ४० ॥

यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जित मेव वा ।
तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥ ४१ ॥

यत् ( जें ) यत् ( जें ) विभूतिमत् ( ऐश्वर्ययुक्त ) सत्वं (वस्तु) श्रीमत् ( सुंदर , कीर्तियुक्त ) ऊर्जितं ( शक्तियुक्त ) एव ( देखील ) वा ( आणि ) तत् ( तें ) तत् ( तें ) एव ( देखील ) अवगच्छ ( ओळख ) त्वं ( तूं ) मम ( माझ्या ) तेजोंऽशसंभवम् = तेजसः अंशात् संभवः यस्य तत् ( तेजाच्या अंशापासून उत्पत्ति ज्याची तें ).





यत् यत् विभूतिमत् वा श्रीमत् ( च ) ऊर्जितं एव सत्वं तत् तत् एव त्वं मम तेजोंऽशसंभवम् अवगच्छ.

जी जी ऐश्वर्ययुक्त सुंदर, तेजस्वी वस्तु असेल ती ती माझ्या तेजाच्या अंशापासून उत्पन्न झालेली आहे असें समज ॥ ४१ ॥

**अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ।**
**विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥ ४२ ॥**

**अथ** ( आतां ) **वा** ( किंवा ) **बहुना** ( पुष्कळसें ) **एतेन** ( या ) **किं** ( काय ) **ज्ञातेन** ( जाणल्यानें ) **तव** ( तुझ्या ) **अर्जुन** (अर्जुना) **विष्टभ्य** ( अटोक्यांत आणून, व्यापून ) **अहं** ( मी , **इदं** ( हें ) **कृत्स्नं** (सर्व) **एकांशेन** (एका अंशानें) **स्थितः** (राहिलों आहें) **जगत्** (जग).

हे अर्जुन, अथवा एतेन बहुना ज्ञातेन तव किं? इदं कृत्स्नं जगत् एकांशेन विष्टभ्य अहम् स्थितः ( अस्मि )'

अर्जुना, पण या विभूतींच्या मोठ्या विस्तार-ज्ञानाशीं तुला काय करावयाचें आहे ? मी हें अखिल जग ( आपल्या ) एका अंशानेंच व्यापून टाकिलें आहे ॥ ४२ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विभूतियोगो नाम दशमोऽध्यायः

---

# अध्याय आकरावा.

अर्जुन उवाच—**मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ।**
**यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥ १ ॥**

**मदनुग्रहाय** = मम अनुग्रहाय (माझ्यावर प्रसाद करण्यासाठीं) **परमं** ( अति उच्च ) **गुह्यं** ( गूढ ) **अध्यात्मसंज्ञितम्** ( अध्यात्म नांवाचें ) **यत्** ( जें ) **त्वया** ( त्वां ) **उक्तं** ( सांगितलें ) **वचः** ( बोलणें, भाषण ) **तेन** ( त्यानें ) **मोहः** ( भ्रांति, अज्ञान ) **अयं** ( हा ) **विगतः** ( गेला ) **मम** ( माझा ).

( भगवन् ) मदनुग्रहाय अध्यात्मसंज्ञितं यत् परमं गुह्यं वचः त्वया उक्तं तेन अयं मम मोहः विगतः.

अर्जुन म्हणाला—हे भगवन्, माझ्यावर प्रसाद करण्यासाठीं अध्यात्म नांवाचें जें अति गूढ रहस्य आपण मला सांगितलें त्यानें माझें अज्ञान ( भ्रांति ) सर्वथा नष्ट झालें आहे ॥ १ ॥

**भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ।**
**त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥ २ ॥**

**भवाप्ययौ** = भवः च अप्ययः च ( उत्पत्ति आणि नाश ) **हि** ( खरोखर ) **भूतानां** ( प्राणिमात्रांचे ) **श्रुतौ** ( दोन्ही ऐकलीं ) **विस्तरशः** ( सविस्तर, तपशीलवार ) **मया** ( म्यां ) **त्वत्तः** ( तुमच्यापासून, आपल्याजवळून ) **कमलपत्राक्ष** = कमलस्य पत्रं इव अक्षिणी यस्य सः ( कमलपत्रासारखे आहेत नेत्र ज्याचे अशा भगवंता ! ) **माहात्म्यम्** ( मोठेपणा ) **अपि** ( सुद्धां ) **च** ( आणि ) **अव्ययं** ( अविनाशी ).

कमलपत्राक्ष, त्वत्तः भूतानां भवाप्ययौ मया विस्तरशः श्रुतौ हि अव्ययं माहात्म्यं च अपि ( श्रुतं ).

हे कमलपत्राक्ष भगवन्, आपल्याजवळून प्राणिमात्रांची उत्पत्ति आणि संहार यांचें विस्तारपूर्वक वर्णन ऐकिलें, तसेंच आपलें अक्षय माहात्म्यही ऐकिलें ॥ २ ॥

**एवमेतद्यथात्थ त्वमात्मानं परमेश्वर ।**
**द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥ ३ ॥**

**एवं** ( याप्रमाणें ) **एतत्** ( हें ) **यथा** ( ज्याप्रमाणें ) **आत्थ** ( सांगतोस ) **त्वं** ( तूं ) **आत्मानं** ( स्वतःला, स्वरूपाला ) **परमेश्वर** ( परमेश्वरा ! ) **द्रष्टुम्** ( पहाण्याला ) **इच्छामि** ( मी इच्छितों ) **ते** ( तुझें ) **रूपं** ( रूप ) **ऐश्वरं** ( ईश्वराचें ) **पुरुषोत्तम** ( हे पुरुषांतील उत्तमा ).

परमेश्वर, यथा त्वं आत्मानं आत्थ एवं एतद ( अस्ति ); पुरुषोत्तम, ते ऐश्वरं रूपं इच्छामि द्रष्टुं.

हे परमेश्वरा, ज्याप्रमाणें आपण आपलें हें स्वरूप सांगितलें तें खरोखर तसेंच आहे; अहो पुरुषश्रेष्ठ, तुमचें तें ईश्वरी स्वरूप पहावें अशी माझी इच्छा आहे ॥ ३ ॥

**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ।**
**योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥ ४ ॥**

**मन्यसे** ( तुला वाटत असेल ) **यदि** ( जर ) **तत्** ( तें ) **शक्यं** ( शक्य ) **मया** ( माझ्याकडून ) **द्रष्टुम्** ( पाहण्याला ) **इति** ( याप्रमाणें ) **प्रभो** ( स्वामी ! ) **योगेश्वर** = योगस्य ईश्वर ( योगाचे अधिपति ) **ततः** ( तर ) **मे** ( मला ) **त्वं** ( तूं ) **दर्शय** ( दाखीव ) **आत्मानं** ( स्वतःला, स्वरूपाला ) **अव्ययं** ( अविनाशी ).

प्रभो योगेश्वर, यदि तत् द्रष्टुं मया शक्यं इति मन्यसे, ततः त्वं अव्ययं आत्मानं मे दर्शय.

हे प्रभो, तें आपलें ईश्वरी स्वरूप पहाणें मला शक्य आहे असें आपल्यास वाटत असेल तर, अहो योगाधिपते ! आपलें तें अविनाशी रूप मला दाखवा ॥ ४ ॥

श्रीभगवानुवाच-पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथसहस्रशः।
नानाविधानि दिव्यानि नानवर्णाकृतीनि च ॥५॥

पश्य ( पहा ) मे ( माझीं ) पार्थ ( अर्जुना ) रूपाणि ( रूपें ) शतशः ( शेंकडों ) अथ ( आणि ) सहस्रशः ( हजारों ) नाना-विधानि ( पुष्कळ प्रकारचीं ) दिव्यानि ( तेजोमय ) नानावर्णाकृतीनि = नानावर्णाः आकृतयः च येषां तानि ( अनेक रंगांचीं आणि आकाराचीं ) च ( आणि ).

पार्थ, नानाविधानि, नानावर्णाकृतीनि, दिव्यानि च शतशः अथ सहस्रशः मे रूपाणि पश्य.

श्रीभगवान् म्हणालेः—अर्जुना, नानाप्रकारचीं, अनेक रंगांचीं, अनेक आकारांचीं तेजोमय अशीं माझीं शेंकडों हजारों रूपें पहा ॥ ५ ॥

पश्यादित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ।
बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥ ६ ॥

पश्य ( पहा ) आदित्यान् ( आदित्यांना ) वसून् ( वसूंना ) रुद्रान् ( रुद्रांना ) अश्विनौ ( दोन अश्विनीकुमारांना ) मरुतः ( मरुद्गणांना ) तथा ( तसेंच ) बहूनि ( पुष्कळ ) अदृष्टपूर्वाणि= पूर्वं न दृष्टानि ( पूर्वी न पाहिलेलीं ) पश्य ( पहा ) आश्चर्याणि ( आश्चर्य उत्पन्न करणारीं ) भारत ( हे भरतकुलोत्पन्ना ).

भारत, आदित्यान्, वसून, रुद्रान्, अश्विनौ, तथा मरुतः पश्य; अदृष्टपूर्वाणि बहूनि आश्चर्याणि पश्य.

हे भारत, बारा आदित्य , आठ वसू, अकरा रुद्र,दोन अश्विनीकुमार, एकूणपन्नास मरुद्गण, तशींच पूर्वी कधीं न पाहिलेलीं अशीं

इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।
मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥ ७ ॥

इह ( येथें ) एकस्थं = एकस्मिन् स्थितं (एकांत राहणारें) जगत ( जग ) कृत्स्नं ( सर्व ) पश्य ( पहा ) अद्य ( आज ) सचराचरम् = चरेण अचरेण च सह ( चल आणि अचल यांसह) मम ( माझ्या )

देहे ( देहांत ) गुडाकेश = गुडाकायाः ईश ( निद्रेचा अगर सुस्तीचा स्वामी = निद्रेला ज्यानें जिंकलें आहे अशा अर्जुना ! ) यत् ( जें ) च ( आणि ) अन्यत् ( दुसरें ) द्रष्टुं ( पाहण्याला ) इच्छसि ( इच्छितोस ).

गुडाकेश, इह मम देहे सचराचरं कृत्स्नं जगत् अद्य पश्य; च यत् अन्यत् द्रष्टुं इच्छसि ( तत् पश्य ).

अर्जुना, या माझ्या देहामध्यें स्थावर-जंगम ( सजीव-निर्जीव ) सर्व विश्व आज पहा; आणि दुसरें जें कांहीं तुला पहावें असें वाटत असेल तेंही पहा ॥ ७ ॥

न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।
दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥ ८ ॥

न ( नाहीं ) तु ( परंतु ) मां (मला) शक्यसे (शक्य होशील) द्रष्टुं ( पहाण्याला ) अनेन ( ह्या ) एव ( केवळ ) स्वचक्षुषा ( स्वतःच्या डोळ्यांनीं ) दिव्यं ( तेजस्वी ) ददामि ( मी देतों ) ते ( तुला ) चक्षुः ( दृष्टि ) पश्य ( पहा ) मे ( माझें ) योगं ( योग ) ऐश्वरं ( दिव्य, अद्भुत ).

अनेन एव स्वचक्षुषा त्वं मां द्रष्टुं न शक्यसे; ( अत एव ) ते दिव्यं चक्षुः ददामि; मे ऐश्वरं योगं पश्य.

परंतु या तुझ्या डोळ्यांनीं तूं मला पाहूं शकणार नाहींस म्हणून मी तुला दिव्य दृष्टि देतों; त्या योगानें माझें अद्भुत योगसामर्थ्य पहा ॥ ८ ॥

संजय उवाच—एवमुक्त्वा ततो राजन् महायोगेश्वरो हरिः ।
दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥ ९ ॥

एवं ( याप्रमाणें ) उक्त्वा ( बोलून ) ततः ( नंतर ) राजन् ( हे राजा, हे धृतराष्ट्रा ) महायोगेश्वरः = महान् योगेश्वरः ( मोठा योग-सामर्थ्यवान् ) हरिः ( श्रीकृष्ण ) दर्शयामास ( दाखविलें ) पार्थाय ( अर्जुनाला ) परं ( अत्युच्च ) रूपं ( रूप ) ऐश्वरम् ( अलौकिक, ईश्वरी ).

राजन्, एवं उक्त्वा ततः महायोगेश्वरः हरिः पार्थाय परमं ऐश्वरं रूपं दर्शयामास.

संजय म्हणतोः—हे राजा धृतराष्ट्रा! याप्रमाणें बोलल्यानंतर मोठे योग-सामर्थ्यवान् जे श्रीकृष्ण त्यांनीं पार्थाला आपलें अति श्रेष्ठ व अलौकिक असें स्वरूप दाखविलें ॥ ९ ॥

**अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् ।**
**अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥ १० ॥**

**अनेकवक्त्रनयनं** = अनेकानि वक्त्राणि च नयनानि च यस्मिन् तत् (ज्यामध्यें पुष्कळ मुखें व डोळे आहेत असें) **अनेकाद्भुतदर्शनं** = अनेकानि अद्भुतानि दर्शनानि यस्मिन् तत् (ज्यामध्यें अनेक अदभुत देखावे आहेत असें) **अनेकदिव्याभरणं** = अनेकानि दिव्यानि आभरणानि यस्मिन् तत् (ज्यांत अनेक तेजःपुंज अलंकार आहेत असें) **दिव्यानेकोद्यतायुधम्** = दिव्यानि अनेकानि उद्यतानि आयुधानि यस्मिन् तत् (ज्यांत नाना प्रकारचीं तेजस्वी आयुधें उचलून धरलेलीं आहेत असें).

अनेकवक्त्रनयनं, अनेकाद्भुतदर्शनं, अनेकदिव्याभरणं, दिव्यानेकोद्यतायुधम् (रूपं दर्शयामास).

ज्या रूपामध्यें पुष्कळ तोंडें व डोळे दिसत आहेत, ज्यांत अनेक अद्भुत देखावे आहेत, ज्यांत पुष्कळ प्रकारच्या तेजस्वी व अलौकिक अलंकारांनीं शोभा आली आहे आणि ज्यांत पुष्कळ तेजस्वी आयुधें उचलून धरलेलीं दिसत आहेत; ॥ १० ॥

**दिव्यमाल्यांबरधरं दिव्यगंधानुलेपनम् ।**
**सर्वाश्चर्यमयं देवमनंतं विश्वतोमुखम् ॥ ११ ॥**

**दिव्यमाल्यांबरधरं** = दिव्यानि माल्यानि च अम्बराणि च धरति तत् (अति तेजस्वी माळा आणि वस्त्रें धारण केलीं आहेत ज्यांत) **दिव्यगंधानुलेपनम्** = दिव्यः गंधः च अनुलेपनं च यस्य तत् (अत्यंत सुवासिक सुगंधाचे लेप अंगावर लावले आहेत ज्यांत) **सर्वाश्चर्यमयं** (सर्व अद्भुत गोष्टी ज्याच्या ठिकाणीं एकवटल्या आहेत असें) देवं (ईश्वराचें)

**अनंतं** ( ज्याला अंत नाहीं असें ) **विश्वतोमुखं** ( सर्व बाजूंस तोंडें आहेत असें ).

दिव्यमाल्यांबरधरं दिव्यगंधानुलेपनं सर्वाश्चर्यमयं विश्वतोमुखं अनंतं देवं ( रूपं दर्शयामास ).

अति तेजस्वी माळा आणि दैदीप्यमान् वस्त्रें ज्या रूपांत धारण केलीं आहेत, अत्यंत सुवासिक गंधांचें ज्यांत लेपन केलें आहे, ज्याच्या ठिकाणीं सर्व आश्चर्यकारक गोष्टी भरल्या आहेत, सर्व बाजूंला ज्याला मुखें आहेत आणि ज्याचा अंत कोणाला लागला नाहीं ( असें ईश्वरी रूप अर्जुनाला दाखविलें ) ॥ ११ ॥

**दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ।**
**यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥१२॥**

**दिवि** ( आकाशांत ) **सूर्यसहस्रस्य** = सूर्याणां सहस्रस्य ( हजार सूर्यांचें ) **भवेत्** ( होईल ) **युगपत्** ( एकदम, एकाच वेळीं ) **उत्थिता** ( वर आला, उत्पन्न झाला ) **यदि** ( जर ) **भाः** ( प्रकाश ) **सदृशी** ( बरोबरीचा ) **सा** ( तो ) **स्यात्** (कदाचित् होईल) **भासः** (तेजाच्या) **तस्य** ( त्याच्या ) **महात्मनः** ( महान् प्रभूच्या ).

यदि दिवि सूर्यसहस्रस्य भाः युगपत् उत्थिता भवेत्, तर्हि सा तस्य महात्मनः भासः सदृशी स्यात्.

आकाशांत हजार सूर्य एकदम उगवून त्यांचा प्रकाश जर एकदम पडला तर तो एकवट झालेला प्रकाश कदाचित् या महात्म्या प्रभूच्या तेजासारखा कांहींसा दिसेल ॥ १२ ॥

**तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।**
**अपश्यद्देवदेवस्य शरीरे पांडवस्तदा ॥ १३ ॥**

**तत्र** ( तेथें ) **एकस्थं** ( एके ठिकाणीं राहिलेलें ) **जगत्** ( जग ) **कृत्स्नं** ( सर्व ) **प्रविभक्तं** (निरनिराळें) **अनेकधा** (अनेक प्रकारांनीं) **अपश्यत्** ( पाहिलें ) **देवदेवस्य** = देवानां देवस्य (देवांचा देव त्याच्या) **शरीरे** ( शरीरांत ) **पांडवः** ( अर्जुनानें ) **तदा** ( त्यावेळीं ).

तदा पांडवः अनेकधा प्रविभक्तं कृत्स्नं जगत् तत्र देवदेवस्य शरीरे एकस्थं अपश्यत्.

त्यावेळीं अर्जुनानें ज्यांत अनेक प्रकारचे निरनिराळे विभाग आहेत असें सर्व ब्रह्मांड, देवांचा देव जो भगवान् त्याच्या (त्या विश्वात्मक) शरीराच्या एका लहानशा भागांतच मावलें असें पाहिलें ॥ १३ ॥

**ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः ।**
**प्रणम्य शिरसा देवं कृताञ्जलिरभाषत ॥ १४ ॥**

**ततः** (नंतर) **सः** (तो) **विस्मयाविष्टः** = विस्मयेन आविष्टः (आश्चर्यभरीत होऊन) **हृष्टरोमा** = हृष्टाणि रोमाणि यस्य सः (ज्याच्या अंगावर हर्षरोमांच उभे राहिले आहेत असा) **धनंजयः** (अर्जुन) **प्रणम्य** (नमन करून) **शिरसा** (मस्तकानें) **देवं** (देवाला) **कृतांजलिः** = कृतः अंजलिः येन सः (हात जोडले आहेत ज्यानें) **अभाषत** (म्हणाला).

ततः विस्मयाविष्टः हृष्टरोमा सः धनंजयः देवं शिरसा प्रणम्य कृतांजलिः (सन्) अभाषत.

नंतर अर्जुनास आश्चर्यानें भरतें आलें, त्याच्या सर्वांगावर हर्षानें रोमांच उभे राहिले आणि तो देवापुढें साष्टांग नमस्कार घालून हात जोडून म्हणाला ॥ १४ ॥

अर्जुन उवाच—

**पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ।**
**ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥ १५॥**

**पश्यामि** (मी पहात आहें) **देवान्** (देवांना) **तव** (तुझ्या) **देव** (हे देवा) **देहे** (शरीरांत) **सर्वान्** (सर्व) **तथा** (सुद्धां) **भूतविशेषसंघान्** = भूतानां विशेषाः तेषां संघान् (भूतमात्रांच्या निरनिराळ्या प्रकारच्या समुदायांना) **ब्रह्माणं** (ब्रह्मदेवाला) **ईशं** (प्रजानाथाला) **कमलासनस्थं** = कमलस्य आसने स्थितं (कमलाच्या आस-

नावर बसलेला ) **ऋषीन्** ( ऋषींना ) **सर्वान्** ( सर्व ) **उरगान्** ( उरानें चालणारे यांना = सर्पांना ) **च** ( आणि ) **दिव्यान्** ( तेजस्वी ).

देव, तव देहे अहं सर्वान् देवान्, तथा भूतविशेषसंघान् कमलासनस्थं, ईशं ब्रह्माणं, सर्वान् ऋषीन् च दिव्यान् उरगान् च पश्यामि.

हे देवा, तुमच्या देहामध्यें मला सर्व देव, तसेंच निरनिराळे प्राणिमात्रांचे समुदाय, कमलाच्या आसनावर बसलेला प्रजानाथ ब्रह्मदेव, सर्व ऋषी आणि अलौकिक सर्प दिसत आहेत ॥ १५ ॥

**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनंतरूपम् ।**
**नान्तं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूपम् १६**

**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं** = अनेक बाहवः उदराणि च वक्त्राणि च नेत्राणि च यस्य तं ( ज्याला अनेक हात, उदरें, मुखें आणि नेत्र आहेत असा ) **पश्यामि** ( मी पाहतों ) **त्वां** ( तुला ) **सर्वतः** ( चहूंकडे, सर्व बाजूंस ) **अनंतरूपं** = अनंतानि रूपाणि यस्य तं ( ज्याला अनंत रूपें आहेत असा ) **न** ( नाहीं ) **अन्तं** ( शेवटाला ) **न** ( नाहीं ) **मध्यं** ( मध्याला ) **न** ( नाहीं ) **पुनः** ( पुन्हां ) **तव** ( तुझा ) **आदिं** ( आरंभाला ) **पश्यामि** ( मी पाहातों ) **विश्वेश्वर** = विश्वस्य ईश्वर ( जगाचे स्वामिन् ) **विश्वरूपं** = विश्वं रूपं यस्य सः ( विश्व हेंच ज्याचें रूप तो ).

विश्वेश्वर ( अहं ) त्वां अनेक बाहुदरवक्त्रनेत्रं सर्वतः अनंतरूपं विश्वरूपं पश्यामि; पुनः तव अन्तं, मध्यं, आदिं न पश्यामि.

हे विश्वनियंत्या, विश्वव्यापका परमेश्वरा ! तुम्हाला अनंत हस्त, अनंत उदरें, अनंत मुखें आणि अनंत नेत्र आहेत असें मला दिसत आहे ( सर्व बाजूंस आपलीं अनंत रूपें व हें सर्व विश्व आपलेंच रूप आहे असें मला दिसत आहे ); शिवाय आपला शेवट कोठें आहे, मध्य कोठें आहे व उगम कोठून होतो हें मला दिसत नाहीं ॥ १६ ॥

**किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमंतम् ।**
**पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समंताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥१७॥**



**किरीटिनं** = किरीटं यस्य अस्ति तं ( ज्याच्या डोक्यावर मुकुट आहे असा ) **गदिनं** ( गदा धारण केली आहे ज्यानें ) **चक्रिणं**

( ज्याच्या हातांत चक्र आहे असा ) **च** ( आणि ) **तेजोराशिं** = तेजसः राशिं ( प्रकाशाचा ढीग, राशी ) **सर्वतः** ( सर्व बाजूंनीं ) **दीप्तिमंतम्** ( प्रकाशणारा ) **पश्यामि** ( मी पहातों ) **त्वां** ( तुला ) **दुर्निरीक्ष्यं** = दुःखेन निरीक्ष्यं ( कष्टानें दिसणारा ) **समंतात्** ( सर्व बाजूंकडून ) **दीप्तानलार्कद्युतिं** = दीप्तस्य अनलस्य च अर्कस्य च इव द्युतिः यस्य सः तं ( प्रज्वलित अग्नि व सूर्य यांच्या एकवटलेल्या तेजाप्रमाणें तेज ज्याचें आहे असा ). **अप्रमेयं** ( अपरिमित ).

त्वां किरीटिनं गदिनं चक्रिणं तेजोराशिं सर्वतः दीप्तिमंतं समंतात् दीप्तानलार्कद्युतिम् अप्रमेयम् दुर्निरीक्ष्यं च पश्यामि.

मुकुट, गदा आणि चक्र धारण केलेला, सर्वत्र दैदीप्यमान्–जणु प्रकाशाची राशीच असा, व भोंवतालीं सर्व बाजूंस प्रज्वलित अग्नि व सूर्य यांच्या एकवटलेल्या तेजाप्रमाणें तेज ज्याचें आहे असा, ज्याच्याकडे पाहणें सुद्धां मोठें दुर्घट आहे असा, व अपरिमित म्हणजे ज्याचें मोजमाप करतां येणें अशक्य असा तूं मला दिसत आहेस ॥ १७ ॥

**त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानं ।**
**त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥१८॥**

**त्वं** ( तूं ) **अक्षरं** ( अविनाशी ) **परमं** ( सर्वश्रेष्ठ ) **वेदितव्यं** ( जाणण्यास योग्य ) **त्वं** ( तूं ) **अस्य** ( ह्याचें ) **विश्वस्य** ( विश्वाचें ) **परं** ( उत्तम, अत्यंत ) **निधानं** ( आश्रयस्थान ) **त्वं** ( तूं ) **अव्ययः** ( अक्षय ) **शाश्वतधर्मगोप्ता** = शाश्वतस्य धर्मस्य गोप्ता ( नित्य असणारा जो धर्म त्याचा संरक्षक ) **सनातनः** ( पुराण काळचा ) **त्वं** ( तूं ) **पुरुषः** ( पुरुष ) **मतः** ( मत ) **मे** ( माझें ).

भगवन्, त्वं परमं अक्षरं वेदितव्यं; त्वं अस्य विश्वस्य परं निधानं त्वं अव्ययः शाश्वतधर्मगोप्ता; त्वं सनातन पुरुषः मे मतः.

हे प्रभो, ज्याचें ज्ञान करून घेणें अवश्य आहे असें जें परब्रह्म तें आपण आहां, आपण ह्या विश्वाचा मुख्य आधार आहां; आपण अक्षय आहां; ( नित्य असणारा ) अनादि जो धर्म त्याचे संरक्षक आपण आहां; आपण पुराण पुरुष व मला अत्यंत मान्य असे आहां ॥ १८ ॥

**अनादिमध्यांतमनंतवीर्यमनंतबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।**
**पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपंतम् ॥१८॥**

**अनादिमध्यांतम्** = न आदिः मध्यः अंतः यस्य तं (ज्याला आरंभ, मध्य आणि शेवट हीं नाहींत तो) **अनंतवीर्यं** = अनंतं वीर्यं यस्य तं (ज्याची शक्ति अपार आहे) **अनंतबाहुं** = अनंताः बाहवः यस्य तं (ज्याला अगणित हात आहेत) **शशिसूर्यनेत्रम्** = शशी च सूर्यः च नेत्रे यस्य तं (ज्याचे चंद्र सूर्य हे दोन डोळे आहेत) **पश्यामि** (मी पहातों) **त्वां** (तुला) **दीप्तहुताशवक्त्रं** = दीप्तः हुताशः इव वक्त्रं यस्य तं (प्रज्वलित अग्निप्रमाणे तेजोमय ज्याचें मुख आहे अशाला) **स्वतेजसा** (आपल्या तेजानें) **विश्वं** (जगाला) **इदं** (हें) **तपंतम्** (ताप देणाराला).

(भगवन्) अनादिमध्यांतं, अनंतवीर्यं, अनंतबाहुं, शशिसूर्यनेत्रं, दीप्तहुताशवक्त्रं, स्वतेजसा इदं विश्वं तपंतम् त्वां पश्यामि.

ज्याला आदि, मध्य आणि अंत हीं नाहींत, ज्याचे सामर्थ्य अपार आहे; ज्याला अगणित हात आहेत; चंद्र व सूर्य हे ज्याचे डोळे आहेत; प्रज्वलित अग्निप्रमाणें ज्याचें मुख आहे आणि आपल्या तेजानें या विश्वाला ताप देत आहां, असें आपलें स्वरूप मला दिसत आहे ॥ १९ ॥

**द्यावापृथिव्योरिदमंतरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ।**
**दृष्ट्वाऽद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥ २० ॥**

**द्यावापृथिव्योः** = द्यावः च पृथिव्याः च (आकाश आणि पृथ्वी यांचें) **इदं** (हें) **अंतरं** (अंतर) **हि** (केवळ) **व्याप्तं** (व्यापून टाकलें) **त्वया** (त्वां) **एकेन** (एकट्यानें) **दिशः** (दिशा) **च** (आणि) **सर्वाः** (सर्व) **दृष्ट्वा** (पाहून) **अद्भुतं** (अलौकिक) **रूपं** (रूप) **उग्रं** (भेसूर) **तव** (तुझें) **इदं** (हें) **लोकत्रयं** = लोकानां त्रयं (तिन्ही लोक) **प्रव्यथितं** (दुःखित, भयाभीत झालें आहे) **महात्मन्** (हे पुरुषोत्तमा).

महात्मन्, एकेन त्वया द्यावापृथिव्योः इदं अंतरं व्याप्तं; सर्वाः दिशः च (व्याप्ताः) इदं तव अद्भुतं उग्रं रूपं दृष्ट्वा लोकत्रयं प्रव्यथितं हि.

हे पुरुषोत्तमा, तुम्हीं आपल्या विश्वरूपानें पृथ्वी आणि आकाश या दोहोंमधील सर्व अंतरिक्ष व्यापून टाकलें आहे; तसेंच दशादिशाही आपण व्यापल्या आहेत; हें तुमचें अलौकिक आणि भेसूर रूप पाहून तिन्ही लोकांना भीति उत्पन्न झाली आहे, तिन्ही लोक घाबरले आहेत ॥ २० ॥

**अमी हि त्वां सुरसंघा विशंति केचिद्भीताः प्रांजलयो गृणंति। स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाः स्तुवंति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ॥ २१ ॥**

**अमी** (हे) **हि** ( खरोखर ) **त्वां** ( तुला, तुझ्यामध्यें ) **सुरसंघाः**= सुराणां संघाः ( देवांचे समुदाय ) **विशंति** ( शिरतात ) **केचित्** ( कांहीं ) **भीताः** ( भिऊन ) **प्रांजलयः** = प्रसृताः अंजलयः येः ( हात जोडून ) **गृणंति** ( स्तुति करतात ) **स्वस्ति** = सु + अस्ति ( शुभ असो ) **इति** ( याप्रमाणें ) **उक्त्वा** ( म्हणून ) **महर्षिसिद्धसंघाः** = महर्षीणां च सिद्धानाम् च संघाः ( ऋषी आणि सिद्ध यांचे समुदाय ) **स्तुवंति** ( स्तुति करीत आहेत ) **त्वां** ( तुला ) **स्तुतिभिः** ( स्तोत्रांनीं ) **पुष्कलाभिः** ( पुष्कळशा .

अमी हि सुरसंघाः त्वां विशंति; केचित् भीताः प्रांजलयः ( संतः) गृणंति; महर्षिसिद्धसंघाः स्वति इति उक्त्वा पुष्कलाभिः स्तुतिभिः त्वां स्तुवंति.

हे देवांचे समुदाय तुमच्या स्वरूपांत प्रवेश करीत आहेत; कांहीं भयभीत होऊन हात जोडून तुमची स्तुति करीत आहेत; मोठे ऋषी व सिद्ध तुमचें स्वागत करून पुष्कळशीं स्तोत्रें गाऊन तुमची स्तुति करीत आहेत ॥२१॥

**रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च। गंधर्वयक्षासुरसिद्धसंघा वीक्षंते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥ २२ ॥**

**रुद्रादित्या** = रुद्राः च आदित्याः च ( रुद्र आणि आदित्य ) **वसवः** ( वसू ) **ये** ( हे ) **च** ( आणि ) **साध्याः** ( साध्य, रुद्रादिक गण ) **विश्वे** ( विश्वदेव ) **अश्विनौ** ( दोन अश्विनीकुमार ) **मरुतः** ( मरुद्गण ) **च** ( आणि ) **उष्मपाः** ( श्राद्धामध्यें दिलेलें उष्ण अन्न सेवन करणारे = पितर ) **च** ( आणि ) **गंधर्वयक्षासुरसिद्धसंघाः**= गंधर्वाणां च यक्षाणां च असुराणां च सिद्धानां च संघाः ( गंधर्व, यक्ष,

असुर आणि सिद्ध यांचे समुदाय ) **वीक्षंते** ( पहातात ) **त्वां** ( तुला ) **विस्मिताः** ( आश्चर्यभरित होऊन ) **च** ( आणि ) **एव** ( देखील ) **सर्वे** ( सर्व ).

रुद्रादित्याः वसवः ये च साध्याः विश्वे अश्विनौ च मरुतः उष्मपाः च ये गंधर्वयक्षासुरसिद्धसंघाः ते सर्वे विस्मिताः एव ( संतः ) त्वां वीक्षंते.

रुद्र, आदित्य, वसु, रुद्रादिक गण, विश्वदेव, अश्विनीकुमार, मरुद्गण, पितर, व त्याचप्रमाणें गंधर्व, यक्ष, राक्षस, सिद्ध यांचे समुदाय हे सर्व आश्चर्यचकित होऊन तुम्हांला पहात आहेत ॥ २२ ॥

**रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम् ।**
**बहूदरं बहु दंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाऽहम् २३**

**रूपं** ( रूप ) **महत्** ( मोठें ) **ते** ( तुझे ) **बहुवक्त्रनेत्रं** = बहूनि वक्त्राणि च नेत्राणि च यस्मिन् तत् ( ज्यांत पुष्कळ मुखें आणि डोळे आहेत असें ) **महाबाहो** ( हे सर्वशक्तिमान् परमेश्वरा ) **बहुबाहूरुपादम्** = बहवः बाहवः च उरवः च पादाः च यस्मिन् तत् ( ज्यांत पुष्कळ हात, मांड्या आणि पाय आहेत असें ) **बहूदरं** = बहूनि उदराणि यस्मिन् तत् ( ज्यांत पुष्कळ उदरें आहेत असें ) **बहुदंष्ट्राकरालं** = बह्वीभिः दंष्ट्राभिः करालं (पुष्कळ दाढांनीं विक्राळ झालेलें) **दृष्ट्वा** (पाहून) **लोकाः** ( लोक, जगें ) **प्रव्यथिताः** ( भिऊन गेले आहेत ) **तथा** ( तसाच ) **अहं** ( मी ).

महाबाहो, बहु वक्त्रनेत्रं, बहुबाहूरुपादं, बहूदरं, बहुदंष्ट्राकरालं, ते महत् रूपं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथिताः (संति), तथा अहं (अपि प्रव्यथितः अस्मि

हे सर्वशक्तिमान् परमेश्वरा ! अनंत मुखें व नेत्र असलेलें, अनंत हस्त) मांड्या आणि पाय असलेलें, अगणित उदरें ज्याला आहेत, पुष्कळ दाढांनीं विक्राळ झालेलें हें तुमचें विश्वरूप पाहून सर्व प्राणिमात्र भयाभीत झाले आहेत व त्यांच्याप्रमाणें माझीही अवस्था झाली आहे ॥ २३ ॥



**नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रं ।**
**दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितांतरात्मा धृतिं न विंदामि शमं च विष्णो**

**नभस्पृशं** = नभः स्पृशति इति तं ( आकाशास जाऊन मिळणारें ) **दीप्तं** ( तेजस्वी ) **अनेकवर्णं** = अनेके वर्णाः यस्य तं ( अनेक रंग ज्याला आहेत असें ) **व्यात्ताननं** = व्यात्तानि आननानि यस्य तं (ज्याचीं मुखें पसरलीं आहेत असें ) **दीप्तविशालनेत्रं** = दीप्तानि विशालानि नेत्राणि यस्य तम् ( ज्याचे प्रज्वलित आणि विस्तृत नेत्र आहेत असें ) **दृष्ट्वा** ( पाहून ) **हि** ( खरोखर ) **त्वां** (तुला) **प्रव्यथितांतरात्मा** = प्रव्यथितः अंतरात्मा यस्य सः ( ज्याचें मन भयाभीत झालें आहे असा ) **धृतिं** ( धैर्य ) **न विंदामि** ( मला सांपडत नाहीं ) **शमं** ( शांति ) **च** ( आणि ) **विष्णो** ( हे भगवंता )

विष्णो, त्वां नभः स्पृशं, दीप्तं, अनेकवर्णं, व्यात्ताननं. दीप्तविशालनेत्रं दृष्ट्वा अहं प्रव्यथितांतरात्मा ( अस्मि ) धृतिं शमं च न विंदामि.

हे भगवन्, आकाशापर्यंत पोंचलेलें, तेजस्वी, अनेक रंगांचें, पसरलेल्या तोंडांचें, प्रज्वलित आणि विस्तृत अशा नेत्रांचें तुमचें विश्वरूप पाहून माझें मन भयाभित झालें आहे, माझे धैर्य सुटलें आहे आणि मला चैन पडेनासें झालें आहे ॥ २४ ॥

**दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसंनिभानि ।**
**दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास ॥२५॥**

**दंष्ट्राकरालानि** = दंष्ट्राभिः करालानि ( विक्राळ दाढांनीं भयंकर झालेलीं ) **च** ( आणि ) **ते** ( तुझीं ) **मुखानि** ( तोंडें ) **दृष्ट्वा** (पाहून) **एव** ( केवळ ) **कालानलसंनिभानि** = कालस्य आनलस्य च संनिभानि ( प्रळयकाळच्या अग्नीप्रमाणें प्रदीप्त असलेलीं ) **दिशः** ( दिशा ) **न जाने** ( मला समजत नाहींत ) **न लभे** ( मला प्राप्त होत नाहींत ) **च** ( आणि ) **शर्म** ( सुख ) **प्रसीद** ( कृपा कर ) **देवेश** = देवानां ईश ( देवाधिपते ) **जगन्निवास** = जगतः निवास ( ज्यांच्यांत जग समाविष्ट झालें आहे अशा देवा जगदाधारा ! )

देवेश जगन्निवास, कालानलसंनिभानि दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वा एव ( अहं ) दिशः न जाने, शर्म च न लभे; ( तस्मात् त्वं ) प्रसीद.

हे देवाधिपते ! प्रळयकाळच्या अग्नीप्रमाणें प्रदीप्त आणि विक्राळ दाढांनीं भयंकर दिसणारीं अशीं आपलीं मुखें पाहून माझी दिशाभूल झाली आहे, समाधान आणि शांति नाहींशीं झालीं आहेत; करतां हे जगदाधारा, माझ्या-वर कृपा करा ॥ २५ ॥

**अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसंघैः ।**
**भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथाऽसौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥**

**अमी** ( हे ) **च** (आणि) **त्वां** ( तुला ) **धृतराष्ट्रस्य** ( धृतराष्ट्राचे ) **पुत्राः** ( पुत्र ) **सर्वे** ( सर्व ) **सह** ( सहवर्तमान ) **एव** ( देखील ) **अवनिपालसंघैः** = अवनिं पालयंति इति तेषां संघैः ( पृथ्वीचें पालन करणारे राजे यांचे समुदायासह ) **भीष्मः** ( भीष्म ) **द्रोणः** ( द्रोण ) **सूतपुत्रः** = सूतस्य पुत्रः ( सारथीपुत्र, कर्ण ) **तथा** ( त्याप्रमाणें ) **असौ** ( हा ) **सह** ( सहवर्तमान ) **अस्मदियैः** ( आमच्याकडील आहेत त्यां-सुद्धां ) **योधमुख्यैः** = योधानां मुख्यैः ( योध्यांतील मुख्यासह ).

च अवनिपालसंघैः सह अमी सर्वे धृतराष्ट्रस्य पुत्राः, तथा भीष्मः, द्रोणः असौ सूतपुत्रः, तथा अस्मदीयैः अपि योधमुख्यैः सह त्वाम्.

आणि इतर नृपाळांच्या समुदायासह धृतराष्ट्राचे सर्व पुत्र, तसेच भीष्म, द्रोण, कर्ण त्याचप्रमाणें आमच्याकडील रणशूर योद्धे या सर्वांसह तुम-च्यामध्यें ॥ २६ ॥

**वक्त्राणि ते त्वरमाणा विशंति दंष्ट्राकरालानि भयानकानि ।**
**केचिद्विलग्ना दशनान्तरेषु संदृश्यंते चूर्णितैरुत्तमांगैः ॥ २७ ॥**

**वक्त्राणि** ( मुखें ) **ते** ( ते ) **त्वरमाणाः** ( त्वरेनें ) **विशंति** ( शिरत आहेत ) **दंष्ट्राकरालानि** ( विक्राळ दाढा असलेलीं ) **भया-नकानि** ( भीतिदायक ) **केचित्** ( कांहीं ) **विलग्नाः** ( चिकटलेलीं, अडकून राहिलेलीं ) **दशनांतरेषु** ( दातांच्या फटींत ) **संदृश्यंते** ( दिसत आहेत ) **चूर्णितैः** ( पीठ झालेलीं ) **उत्तमांगैः** ( मस्तकें ).

दंष्ट्राकरालानि भयानकानि ते वक्त्राणि त्वरमाणाः विशंति; केचित् चूर्णितैः उत्तमांगैः दशनांतरेषु विलग्नाः संदृश्यंते.

विकाळ दाढांनीं भेसूर दिसणाऱ्या आपल्या मुखांत ( वर सांगितलेले योध्यांचे समुदाय ) मोठ्या त्वरेनें प्रवेश करीत आहेत; त्यांपैकीं कांहीं मस्तकांचा चुरडा होऊन दांतांत अडकून राहिलेले दिसत आहेत ॥ २७ ॥

**यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवंति ।**
**तथा तवामी नरलोकवीरा विशंति वक्त्राण्यभिज्वलन्ति॥२८॥**

**यथा** ( ज्याप्रमाणें ) **नदीनां** ( नद्यांचे ) **बहवः** ( पुष्कळ ) **अम्बुवेगाः** = अंबुनां वेगाः ( पाण्याचे ओघ ) **समुद्रं** ( समुद्र ला ) **एव** ( जसें कांहीं ) **अभिमुखाः** ( समोर, समुद्राकडे तोंड करून ) **द्रवंति** ( धांवतात ) **तथा** ( तसें ) **तव** ( तुझ्या ) **अमी** ( हे ) **नरलोकवीराः** = नराणां लोके वीराः ( मनुष्यलोकांतील योद्धे ) **विशंति** ( शिरतात ) **वक्त्राणि** ( मुखें ) **अभिविज्वलंति** ( पेटलेल्या ).

यथा नदीनां बहवः अंबुवेगाः अभिमुखाः समुद्रं एव द्रवंतिं, तथा अमी नरलोकवीराः तव अभिविज्वलंति वक्त्राणि विशन्ति.

ज्याप्रमाणें नद्यांचे ओघ सागराकडे वेगानें धांवत जाऊन त्यांत शिरतात, तसें हे मानवी योद्धे तुमच्या पेटलेल्या मुखांत शिरत आहेत ॥ २८ ॥

**यथा प्रदीप्तं ज्वलनं पतंगा विशंति नाशाय समृद्धवेगाः ।**
**तथैव नाशाय विशंति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः२९**

**यथा** ( ज्याप्रमाणें ) **प्रदीप्तं** ( पेटलेल्या ) **ज्वलनं** ( अग्नीमध्यें ) **पतंगाः** ( फुलपांखरें ) **विशंति** ( शिरतात ) **नाशाय** ( नाश करून घेण्याला ) **समृद्धवेगाः** = समृद्धाः वेगाः येषां ते ( ज्यांचा वेग वाढलेला आहे असे ) **तथा** ( त्याप्रमाणें ) **एव** ( केवळ ) **नाशाय** ( नाश करून घेण्याला ) **विशंति** ( शिरतात ) **लोकाः** ( लोक ) **तव** ( तुझ्या ) **अपि** ( सुद्धां ) **वक्त्राणि** ( मुखें ) **समृद्धवेगाः** ( वाढत्या वेगानें ).

यथा समृद्धवेगाः पतंगाः प्रदीप्तं ज्वलनं नाशाय प्रविशन्ति, तथा एव समृद्धवेगाः लोकाः अपि नाशाय तव वक्त्राणि विशंति.

ज्याप्रमाणें पतंग पेटलेल्या अग्नींत अतिवेगानें शिरून आपला नाश करून घेतात तसें हे लोक आपला नाश करून घेण्याकरितां तुमच्या ( पेटलेल्या ) मुखांत त्वरेनें शिरत आहेत ॥ २९ ॥

लेलिह्यसे ग्रसमानः समन्ताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ।
तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो ॥ ३० ॥

लेलिह्यसे ( चाटीत आहेत ) ग्रसमानः ( गिळून ) समन्तात् ( चहूंकडून, सर्व बाजूंनीं ) लोकान् ( लोक ) समग्रान् ( सर्व ) वदनैः ( तोंडांनीं ) ज्वलद्भिः ( पेटलेल्या, जळत असलेल्या ) तेजोभिः ( प्रभानीं ) आपूर्य ( भरून, व्यापून टाकून ) जगत् ( जग ) समग्रं ( सर्व ) भासः ( तेजें ) तव ( तुझें ) उग्राः ( भयंकर ) प्रतपंति ( ताप देतात ) विष्णो ( हे विष्णु, हे देवा ).

विष्णो, समंतात् ज्वलद्भिः वदनैः समग्रान् लोकान् ग्रसमानः लेलिह्यसे; समग्रं जगत् तेजोभिः आपूर्य तव उग्राः भासः प्रतपन्ति.

हे देवा ! आपल्या चहूंकडून पेटलेल्या मुखांनीं सर्व लोकांस गिळून टाकून आपण जिभल्या चाटीत आहां; आपल्या प्रकाशानें सर्व जग व्यापून आपल्या प्रखर प्रभा सर्व विश्वाला ताप देत आहेत ॥ ३० ॥

आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद ।
विज्ञातुमिच्छामि भवंतमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ३१

आख्याहि ( सांगा ) मे ( मला ) कः ( कोण ) भवान् ( आपण ) उग्ररूपः = उग्रं रूपं यस्य सः ( ज्याचें रूप भयानक आहे तो ) नमः ( नमस्कार ) अस्तु ( असो ) ते ( तुम्हाला ) देववर = देवानां वर ( देवांचे अधिपती ) प्रसीद ( अनुग्रह करा ) विज्ञातुं ( जाणण्याला ) इच्छामि ( मी इच्छितों ) भवंतम् ( आपणाला ) आद्यं ( पहिले ) न ( नाहीं ) हि ( कारण ) प्रजानामि ( मी जाणतों ) तव ( तुमची ) प्रवृत्तिं ( कर्म ).

भवान् उग्ररूपः कः मे आख्याहि; ते नमः अस्तु, देववर प्रसीद आद्यं भवंतं विज्ञातुं इच्छामि, हि तव प्रवृत्तिं न प्रजानामि.

आपण हे भयानक स्वरूपी कोण आहां तें मला सांगा; आपल्याला नमस्कार असो; हे देवाधिपते, अनुग्रह करा. आपलें मूळ स्वरूप पूर्ण-पणें जाणण्याची मला इच्छा आहे; आपल्या ह्या खटपटीचें धोरणही मला कळत नाहीं ॥ ३१ ॥

श्रीभगवानुवाच—

**कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः।
ऋतेऽपि त्वां न भविष्यंति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनिकेषु योधाः ॥ ३२ ॥**

**कालः** ( काल, प्रलय ) **अस्मि** ( मी आहें ) **लोकक्षयकृत्** = लोकानां क्षयं करोति इति ( लोकांचा म्हणजे जगाचा नाश करणारा असा ) **प्रवृद्धः** ( मोठा, पूर्णतेस पावलेला ) **लोकान्** ( लोकांना ) **समाहर्तुम्** ( नाश करण्याकरितां ) **इह** ( येथें ) **प्रवृत्तः** ( प्रवृत्त झालों आहें ) **ऋते** ( शिवाय ) **अपि** ( सुद्धां ) **त्वां** ( तुला, तुझ्या ) **न** ( नाहीं ) **भविष्यंति** ( होतील ) **सर्वे** ( सर्व ) **ये** ( हे ) **अवस्थिताः** ( सिद्ध झाले आहेत ) **प्रत्यनिकेषु** ( उभय सैन्यांतील ) **योधाः** ( वीर, युद्ध करणारे ).

लोकक्षयकृत् प्रवृद्धः कालः अस्मि; इह लोकान् समाहर्तुं प्रवृत्तः ( अस्मि ) प्रत्यनिकेषु ये योधाः अवस्थिताः ( संति ), ( ते ) सर्वे त्वां ऋते अपि न भविष्यंति.

श्रीभगवान् म्हणाले—जगाचा नाश करणारा पूर्णस्वरूपी काल मी आहें, येथें लोकांचा संहार करण्याकरितां प्रवृत्त झालों आहें; उभय सैन्यांतील वीर युद्धाला उभे राहिले आहेत, हे सर्व तुझ्या कांहीं करण्यावांचून देखील राहणार नाहींत ( नाश पावणार आहेत ) ॥ ३२ ॥

**तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून्भुंक्ष्व राज्यं समृद्धम्।
मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ ३३ ॥**

**तस्मात्** ( म्हणून ) **त्वं** ( तूं ) **उत्तिष्ठ** ( ऊठ ) **यशः** ( यश, कीर्ति ) **लभस्व** ( मिळीव ) **जित्वा** ( जिंकून ) **शत्रून्** ( शत्रूंना ) **भुंक्ष्व** ( उपभोग घे ) **राज्यं** ( राज्य ) **समृद्धं** ( धनधान्यपूर्ण ) **मया** ( म्यां ) **एव** ( देखील ) **एते** ( हे ) **निहताः** ( मारले गेलेले ) **पूर्वं** ( पूर्वींच ) **एव** ( देखील ) **निमित्तमात्रं** ( फक्त निमित्त ) **भव** ( हो ) **सव्यसाचिन्** = सव्येन सचितुं शीलं यस्य सः ( दोन्ही हातांनीं बाण सोडण्यांत कुशल, डाव्या हातानेंही नेम मारण्यांत कुशल ).

तस्मात् सव्यसाचिन् त्वं उत्तिष्ठ, यशः लभस्व, शत्रून् जित्वा समृद्धं राज्यं भुंक्ष्व, मया एव एते पूर्वं एव निहताः ( संति ), ( त्वं ) निमित्त-मात्रं भव.

म्हणून अर्जुना, तूं ऊठ, यश संपादन कर, शत्रूंना जिंकून धनधान्य-संपूर्ण राज्याचा उपभोग घे; यांना मीं पूर्वीच मारलेले आहेत, तूं केवळ निमित्ताला कारण हो ॥ ३३ ॥

**द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथाऽन्यानपि योधवीरान् ।**
**मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ३४**

**द्रोणं** ( द्रोणाला ) **च** ( आणि ) **भीष्मं** ( भीष्माला ) **च** ( आणि ) **जयद्रथं** ( जयद्रथाला ) **च** ( आणि ) **कर्णं** ( कर्णाला ) **तथा** ( त्या-प्रमाणें ) **अन्यान्** ( दुसऱ्यांना ) **अपि** ( सुद्धां ) **योधवीरान्** = योधानां वीरान् ( योध्यांपैकीं वीरांना ) **मया** ( म्यां ) **हतान्** ( मार-लेल्यांना ) **त्वं** ( तूं ) **जहि** ( मार ) **मा** ( नको ) **व्यथिष्ठा** ( व्याकूळ ) **युध्यस्व** ( युद्ध कर ) **जेतासि** ( जिंकशील ) **रणे** ( रणांगणांत ) **सपत्नान्** ( शत्रूंना, प्रतिस्पर्ध्यांना ).

द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथा मया अन्यान् अपि योधवीरान् हतान् त्वं जहि; मा व्यथिष्ठाः, युध्यस्व, रणे सपत्नान् जेतासि.

द्रोण, भीष्म, जयद्रथ, कर्ण आणि त्याप्रमाणें दुसऱ्या शूर योध्यांना मीं आधींच मारलेलें आहे; त्यांना तूं मार, दुःखी किंवा घाबरलेला होऊं नकोस; युद्ध कर, रणांगणांत तूं आपल्या प्रतिस्पर्ध्यांना जिंकशील ॥ ३४ ॥

संजय उवाच—

**एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृतांजलिर्वेपमानः किरीटी ।**
**नमस्कृत्वा भूय एवाऽऽह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥३५॥**

**एतत्** ( हें ) **श्रुत्वा** ( ऐकून ) **वचनं** ( भाषण ) **केशवस्य** ( केश-वाचें ) **कृतांजलिः** = कृतः अंजलिः येन सः ( ज्यानें हात जोडले आहेत असा ) **वेपमानः** ( कांपत ) **किरीटी** = किरीटं यस्य अस्ति सः ( किरी-टीन् ) किरीटी ( अर्जुन ) **नमस्कृत्वा** ( नमस्कार करून ) **भूयः** ( पुन्हां ) **एव** ( केवळ ) **आह** ( म्हणाला ) **कृष्णं** ( कृष्णाला ) **सगद्गदं** =

गद्गदेन सह (अस्पष्ट भाषणानें) भीतभीतः (भ्यालेला होत्साता) प्रणम्य (नमस्कार करून).

एतत् केशवस्य वचनं श्रुत्वा कृतांजलिः वेपमानः किरीटी कृष्णं नमस्कृत्वा भीतभीतः भूयः एव प्रणम्य सगद्गदं आह.

संजय ह्मणाला—हें देवाचें भाषण ऐकून अर्जुन हात जोडून कांपत कृष्णाला नमस्कार करिता झाला आणि भ्याल्यामुळें पुनः पुनः नमस्कार करून अस्पष्ट वाणीनें श्रीकृष्णाला म्हणाला ॥ ३५ ॥

अर्जुन उवाच—

**स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च।**
**रक्षांसि भीतानि दिशो द्रवंति सर्वे नमस्यंति च सिद्धसंघाः ३६**

**स्थाने** (योग्य स्थळीं) **हृषीकेश** (हे विष्णु, देवा) **तव** (तुझ्या) **प्रकीर्त्या** (कीर्तीनें, कीर्ति महात्म्यानें) **जगत्** (जग) **प्रहृष्यति** (आनंदानें) **अनुरज्यते** (समाधान पावतें, प्रेम उत्पन्न होतें) **च** (आणि) **रक्षांसि** (राक्षस) **भीतानि** (भिऊन) **दिशः** (दिशास) **द्रवंति** (पळून जातात) **सर्वे** (सर्व) **नमस्यंति** (नमस्कार करतात) **च** (आणि) **सिद्धसंघाः** = सिद्धानां संघाः (सिद्धांचे समुदाय. सिद्ध = तपश्चर्येंचे बलानें चतुर्विध मुक्ति व चार पुरुषार्थ ज्यानें साध्य केले तो).

हृषिकेश, तवप्रकीर्त्या जगत् प्रहृष्यति, च अनुरज्यते, रक्षांसि भीतानि दिशः द्रवन्ति, च सर्वे सिद्धसंघाः नमस्यंति (इति) स्थाने.

अर्जुन म्हणालाः—हे हृषिकेश, आपली थोर कीर्ति किंवा महात्म्य ऐकल्यानें सर्व जग आनंदभरांत होतें आणि आपल्याविषयीं त्याला प्रेम उत्पन्न होतें; आपली कीर्ति ऐकून राक्षस दशदिशांना पळून जातात, व सर्व सिद्धांचे समुदाय आपल्यास नमस्कार करतात हें योग्यच (योग्य स्थळीं) आहे ॥ ३६ ॥

**कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे।**
**अनंत देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥ ३७ ॥**

**कस्मात्** (कां बरें) **च** (आणि) **ते** (ते) **न नमेरन्** (नमस्कार करणार नाहींत) **महात्मन्** (हे महात्म्या) **गरीयसे** (श्रेष्ठ

गुरूला ) ब्रह्मणः ( ब्रह्मदेवाचा ) अपि ( सुद्धां ) आदिकर्त्रे ( मूळ उत्पन्न करणाराला ) अनंत ( हे अनंता ) देवेश ( देवाधिदेवा ) जगन्निवास = जगति निवासः यस्य ( हे जगभर राहणाऱ्या जगद्व्यापका ) त्वं ( तूं ) अक्षरं ( अविनाशी ) सत् ( ज्याला आहेपणा आहे तो, अस्तित्वाचा ) असत् ( ज्यास अस्तित्व नाहीं तो ) तत् ( ते ) परं ( पलीकडे ) यत् ( जें. )

महात्मन्, गरीयसे ब्रह्मणः अपि आदिकर्त्रे, ते कस्मात् न नमेरन्; अनंत देवेश जगन्निवास, त्वं अक्षरं, यत् सत् असत् तत् परं.

हे महात्मन्, ब्रह्मदेवाची मूळ उत्पत्ति करणारे आणि जगद्गुरू जे आपण त्यांस ते ( सिद्धादि सर्व लोक ) कां बरें नमस्कार करणार नाहींत ? हे अनंत, हे देवाधिदेवा, जगन्निवासा, आपण अविनाशी आहां, सत्–असत् ( सदसत्-म्हणजे माया ) यांच्या पलीकडचे आहां ॥ ३७ ॥

**त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानं ।**
**वेत्ताऽसि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनंतरूप ॥३८॥**

त्वं ( तूं ) आदिदेवः ( प्रथम देव ) पुरुषः ( आदि नारायण, परमात्मा ) पुराणः ( जुनाट, पूर्वीचा ) त्वं ( तूं ) अस्य ( ह्याचें ) विश्वस्य ( जगताचें, ब्रह्मांडाचें ) परं ( अत्युत्तम ) निधानम् ( विराम स्थान, निवृत्तिस्थल ) वेत्ता ( जाणणारा ) असि ( आहेस ) वेद्यं ( जाणण्याची वस्तु ) च ( आणि ) परं ( अत्युत्तम ) च ( आणि ) धाम ( निवासस्थान ) त्वया ( तुवां ) ततं ( पसरलें ) विश्वं ( जग, ब्रह्मांड ) अनंतरूप ( हे सर्वरूपा ).

त्वं आदिदेवः, त्वं पुराणः पुरुषः, त्वं अस्य विश्वस्य परं निधानं, त्वं वेत्ता च वद्यं च परं धाम असि; अनंतरूप, त्वया विश्वं ततं.

आपण सर्व देवाच्या पूर्वीचे, अनादि काळचे आदि नारायण आहां, ह्या ब्रह्मांडाचें शेवटलें विरामस्थान आहां; जाणणारे, जाणण्याची वस्तु त्याचप्रमाणें सर्वोत्तम निवासस्थान आपण आहां. हे अनंतरूपा, आपण हें सर्व विश्व व्यापून राहिला आहां ॥ ३८ ॥

वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशांकः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।
नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥३९॥

वायुः ( वायु ) यमः ( यम ) अग्निः ( अग्नि ) वरुणः ( वरुण ) शशांकः ( चंद्र ) प्रजापतिः ( प्रजापति = कश्यप, विराट, दक्ष वगैरे ) प्रपितामहः ( ब्रह्मदेवाचा पिता जो सूत्रात्मा ) च ( आणि ) नमः नमः ( पुनः पुनः नमस्कार ) अस्तु ( असो ) सहस्रकृत्वः ( हजारों वेळां ) पुनः ( पुन्हां ) च ( आणि ) भूयः ( पुनः ) अपि ( सुद्धां ) नमः नमः ( पुनः नमस्कार ) ते ( तुला ).

वायुः त्वं; यमः, अग्निः, वरुणः, शशांकः, प्रजापतिः, च प्रपितामहः ( त्वं असि ) ते सहस्रकृत्वः नमः नमः अस्तु; पुनः च भूयः अपि ते नमः नमः.

वायु, यम, अग्नि, वरुण, चंद्र, प्रजापति आणि प्रपितामह ( ब्रह्मदेवाचा पिता ) आपण आहां; आपल्याला हजार वेळां मी वारंवार नमस्कार करतों; आणखी पुनः पुनः आपणाला नमस्कार करतों ॥ ३९ ॥

नमःपुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तुते सर्वत एव सर्व ।
अनंतवीर्याऽमितविक्रमस्त्वं सर्वंसमाप्नोषि ततोऽसि सर्वः ४०

नमः ( नमस्कार ) पुरस्तात् ( समोरून ) अथ ( सुद्धां ) पृष्ठतः ( पाठीकडून ) ते ( तुला ) नमः ( नमस्कार ) अस्तु ( असो ) ते ( तुला ) सर्वतः ( सर्व बाजूंनीं ) एव ( देखील ) सर्व ( सर्वेश्वरा ) अनंतवीर्यामितविक्रमः = अनंत वीर्यं च अमितः विक्रमः यस्य सः ( ज्याचें सामर्थ्य अपरिमित आणि ज्याचा पराक्रम अपार तो ) त्वं ( तूं ) सर्वं ( सर्व ) समाप्नोषि = सम्यक् व्याप्नोषि ( व्यापून राहतोस ) ततः ( म्हणून ) असि ( तूं आहेस ) सर्वः ( सर्व ).

ते पुरस्तात् नमः, अथ ( ते ) पृष्ठतः नमः; ते सर्वतः एव नमः अस्तु. सर्व, त्वं अनंतवीर्याऽमितविक्रमः सर्वं समाप्नोषि, ततः सर्वः असि.

आपल्या सन्मुख होऊन नमस्कार करतों, पाठीमागें होऊन नमस्कार करतों, सर्व बाजूंनीं आपल्यास माझा नमस्कार असो. हे ईश्वरा, आपलें

सामर्थ्य अपरिमित असून आपला पराक्रमही अपार आहे, आपण सर्व विश्व व्यापून टाकलें आहे म्हणून आपण सर्वस्वरूप आहां ॥ ४० ॥

**सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ।**
**अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वाऽपि ॥ ४१ ॥**

सखा ( मित्र ) इति ( असें ) मत्वा ( समजून ) प्रसभं (उद्धट-पणानें ) यत् ( जें ) उक्तं ( म्हटलें ) हे कृष्ण ( हे कृष्णा ) हे यादव ( हे यादवा ) हे सखे ( हे सख्या ) इति ( असें ) अजानता ( न जाणतां, अज्ञानपणानें ) महिमाहं ( मोठेपणा ) तव ( तुझा ) इदं ( हा ) मया ( म्यां ) प्रमादात् ( गैरसावधपणें, चुकीनें ) प्रणयेन ( प्रेमानें ) वा ( अथवा ) अपि ( देखील. )

तव इदं महिमानं अजानता मया प्रमादात्, वा प्रणयेन अपि सखा इति मत्वा प्रसभं ' हे कृष्ण, हे यादव, हे सखे ' इति यत् उक्तं.

तुमचा हा महिमा न जाणतां मी चुकून किंवा प्रेमामुळें तुम्हांस मित्र समजून उद्धटपणानें ' हे कृष्णा, हे यादवा, अरे सख्या ' असें जें बोललों;– ॥ ४१ ॥

**यच्चावहासार्थमसत्कृतोसि विहारशय्यासनभोजनेषु ।**
**एकोऽथवाऽप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥४२॥**

यत् ( जें ) च ( आणि ) अवहासार्थं = अवहासस्य अर्थं ( थट्टा करण्याकरतां ) असत्कृतः ( अपमान केलेला ) असि ( झाला आहेस ) विहारशय्यासनभोजनेषु = विहारे च शय्यायां च आसने च भोजने च ( खेळतांना, निजतांना, बसतांना आणि जेवतांना ) एकः ( एकटा असतांना ) अथवा ( अगर ) अपि ( सुद्धां ) अच्युत ( हे अच्युता, ब्रीदापासून न ढळणारे असे ) तत्समक्षं ( दुसऱ्या देखत ) तत् ( तें ) क्षामये = क्षामापये ( क्षमा करा अशी प्रार्थना करतों ) त्वां ( तुला ) अहं ( मी ) अप्रमेयं ( प्रमाणास अगोचर असे जे आपण, अटकळीच्या पलीकडले, ज्याला मर्यादा नाहीं असे ).

च अच्युत, विहारशय्यासनभोजनेषु एकः अथवा तत्समक्षं अपि अवहासार्थं यत् असत्कृतः असि, तत् अप्रमेयं त्वां अहं क्षामये.

आणि हे अच्युत, खेळतांना, निजतांना, बसतांना आणि जेवतांना, एकटे असतांना किंवा दुसऱ्यांच्या समक्ष, थट्टा करण्याच्या हेतूनें आपला अपमान केला असेल त्याची क्षमा करावी अशी मी आपली अप्रमेयाची ( अनंताची ) प्रार्थना करतों ॥ ४२ ॥

**पिताऽसि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।**
**न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिम-**
**प्रभावः ॥ ४३ ॥**

**पिता** ( जनक ) **असि** ( आहेस ) **लोकस्य** ( त्रैलोक्याचा, विश्वाचा ) **चराचरस्य** ( स्थावरजंगमाचा ) **त्वं** ( तूं ) **अस्य** ( ह्या ) **पूज्यः** ( वंद्य ) **च** ( आणि ) **गुरुः** ( गुरुः ) **गरीयान्** ( श्रेष्ठ ) **न** ( नाहीं ) **त्वत्समः** = त्वत्समः ( तुझ्या बरोबरीचा ) **अस्ति** ( आहे ) **अभ्यधिकः** ( अधिक ) **कुतः** ( कोठून ) **अन्यः** ( दुसरा ) **लोकत्रये** ( तिन्ही लोकांत ) **अपि** ( सुद्धां ) **अप्रतिमप्रभावः** = अप्रतिमः प्रभावः यस्य सः ( ज्याचें सामर्थ्य अतुल आहे तो ).

अप्रतिम प्रभावः त्वं अस्य चराचरस्य लोकस्य पिता असि, पूज्यः गरीयान् गुरुः च असि; लोकत्रये अपि त्वत्समः न अन्यः अस्ति, कुतः अभ्यधिकः ( अस्ति ).

अतुलसामर्थ्यवंत असे, या स्थावरजंगमात्मक विश्वाचे आपण जनक असून सर्ववंद्य, सर्वश्रेष्ठ गुरू आहां; त्रैलोक्यांत आपल्या बरोबरीचा कोणी नाहीं; तेव्हां आपणापेक्षा श्रेष्ठ दुसरा कोठून असणार ? ॥ ४३ ॥

**तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादयेत्वामहमीशमीड्यम् ।**
**पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ४४**

**तस्मात्** ( म्हणून ) **प्रणम्य** ( नमस्कार करून ) **प्रणिधाय** ( नम्र होऊन ) **कायं** ( शरीर ) **प्रसादये** ( प्रसन्न होण्यासाठीं प्रार्थना करतों ) **त्वां** ( तुला ) **अहं** ( मी ) **ईशं** ( ईश्वर देव ) **ईड्यम्** ( प्रशंसनीय ) **पिता** ( जनक ) **इव** ( ज्याप्रमाणें ) **पुत्रस्य** ( पुत्राचे ) **सखा** ( मित्र ) **इव** ( जसा ) **सख्युः** ( मित्राचे ) **प्रियः** ( भर्ता ) **प्रियायाः** ( प्रियेचे )

अर्हसि ( योग्य आहेस, समर्थ आहेस ) देव ( हे देवा ) सोढुम् ( सोसण्याला ).

तस्मात् प्रणम्य कायं प्रणिधाय अहं ईड्यं ईशं त्वां प्रसादये देव, पुत्रस्य ( अपराधं ) पिता इव, सख्युः सखा इव, प्रियायाः ( अपराधं ) प्रियः ( इव ) ( मम अपराधान् ) सोढुं ( त्वं ) अर्हसि.

ह्मणून साष्टांग नमस्कार घालून प्रशंसनीय ईश्वर जे आपण त्यांना प्रसन्न होण्यासाठीं मी प्रार्थना करतों. बाप मुलाचे, मित्र मित्राचे, भर्ता प्रियेचे अपराध सहन करतो, तसें तुह्मी माझे अपराध सहन करण्यास समर्थ आहां ( सहन करा ) ॥ ४४ ॥

**अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे ।**
**तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ४५ ॥**

**अदृष्टपूर्वं** = पूर्वं न दृष्टं ( पूर्वी न पाहिलेलें ) **हृषितः** ( आनंदभरीत ) **अस्मि** ( मी आहें ) **दृष्ट्वा** ( पाहून ) **भयेन** ( भयानें ) **च** ( आणि ) **प्रव्यथितं** ( घाबरून ) **मनः** ( मन ) **मे** ( माझें ) **तत्** ( तें ) **एव** ( च ) **मे** ( मला ) **दर्शय** ( दाखीव ) **देव** ( हे देवा ) **रूपं** ( स्वरूप ) **प्रसीद** ( अनुग्रह कर ) **देवेश** ( देवाधिदेवा ) **जगन्निवास** ( जगद्व्यापका ).

अदृष्टपूर्वं दृष्ट्वा हृषितः अस्मि, च मे मनः भयेन प्रव्यथितं ( अस्ति ); देव तत् एव रूपं मे दर्शय; देवेश जगन्निवास ! प्रसाद.

पूर्वी कधीं न पाहिलेलें असें विश्वरूप पाहून मला फार आनंद झाला आहे, परंतु भयानें माझें मन घाबरून गेलें आहे करतां देवा, आपलें तेंच ( पूर्वीचें ) स्वरूप मला दाखवा. हे जगत्व्यापका देवाधिदेवा, मजवर अनुग्रह करा ॥ ४५ ॥



**किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।**
**तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ४६ ॥**

किरीटिनं ( मुकुट घातलेला ) गदिनं ( गदा धारण केलेला ) चक्रहस्तं = चक्रं हस्ते यस्य तं ( ज्याच्या हातांत चक्र आहे त्याला ) इच्छामि ( इच्छितों ) त्वां ( तुला ) द्रष्टुं ( पाहण्याला ) अहं ( मी ) तथा ( तसा, पूर्वीप्रमाणें ) एव ( केवळ ) तेन (त्यानें) एव (केवळ) रूपेण ( स्वरूपानें ) चतुर्भुजेन ( चार हातांच्या ) सहस्रबाहो = सहस्रं बाहवः यस्य सः ( ज्याचे बाहू हजारों आहेत तो ) भव ( हो ) विश्वमूर्ते = विश्वमूर्तिः यस्य सः ( ब्रह्मांड हेंच ज्याचें स्वरूप तो ).

सहस्रबाहो विश्वमूर्ते, अहं त्वां तथा एव किरीटिनं गदिनं च चक्रहस्तं द्रष्टुं इच्छामि; ( तस्मात् ) तेन एव चतुर्भुजेन रूपेण भव.

हे अनंतहस्त विश्वमूर्ते, तुह्मीं किरीट घातलेलें, गदा धारण केलेलें, तसेंच हातांत चक्र घेतलेलें असें ( पूर्वीचें ) आपलें स्वरूप पहावें अशी माझी इच्छा आहे; तर तेंच आपलें चतुर्भुज स्वरूप धारण करा ॥ ४६ ॥

श्री भगवानुवाच—

**मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।**
**तेजोमयं विश्वमनंतमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥ ४७ ॥**

मया ( म्या ) प्रसन्नेन ( प्रसन्न होऊन ) तव ( तुला ) अर्जुन ( हे अर्जुना ) इदं ( हें ) रूपं ( स्वरूप ) परं ( अत्युच्च ) दर्शितं ( दाखविलें आहे ) आत्मयोगात् = आत्मनः योगात् ( आपल्या योगसामर्थ्यानें ) तेजोमयं ( देदीप्यमान् ) विश्वं ( सर्वव्यापक ) अनंत ( ज्याचा अंत नाहीं असें ) आद्यं ( मूळचें ) यत् ( जें ) मे ( माझें ) त्वत् ( तुझ्यापासून ) अन्येन ( दुसऱ्यानें ) नदृष्टपूर्वं ( पूर्वी पाहिलें नाहीं ).

अर्जुन, प्रसन्नेन मया आत्मयोगात् इदं परं रूपं तव दर्शितं; यत् मे तेजोमयं विश्वं अनंतं आद्यं ( रूपं ) त्वदन्येन दृष्टपूर्वं न.

अर्जुना, तुझ्यावर प्रसन्न होऊन मी माझ्या योगसामर्थ्यानें तुला हें अतिश्रेष्ठ विश्वरूप दाखविलें; हें माझें देदीप्यमान्, सर्वव्यापी, अपार मूळचें रूप तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणीं पूर्वीं पाहिलें नाहीं.

**न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।**
**एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥ ४८ ॥**

**न** ( नाहीं ) **वेदयज्ञाध्ययनैः** = वेदैः च यज्ञैः च अध्ययनैः च ( वेदांनीं, यज्ञांनीं आणि अभ्यासांनीं ) **न** ( नाहीं ) **दानैः** (दानें दिल्यानें) **न** ( नाहीं ) **क्रियाभिः** ( कर्मांनीं ) **न** (नाहीं) **तपोभिः** ( तपांनीं ) **उग्रैः** ( घोर ) **एवंरूपः** ( असलें स्वरूपाचा ) **शक्यः** (अशक्य आहे) **अहं** ( मी ) **नृलोके** = नृणाम् लोके ( मनुष्यलोकांत ) **द्रष्टुं** = दृष्टो भवितुम् ( दिसण्याला ) **त्वत्** ( तुझ्याहून ) **अन्येन** ( दुसऱ्यानें ) **कुरुप्रवीर** = कुरुणाम् प्रवीर ( कौरवकुलांतील श्रेष्ठा ).

कुरुप्रवीर, नृलोके न वेदयज्ञाध्ययनैः न दानैः न क्रियाभिः न उग्रैः तपोभिः त्वदन्येन अहं एवं-रूपः द्रष्टुं शक्यः

हे कुरुकुलश्रेष्ठा, या मृत्युलोकीं तुझ्यावांचून दुसऱ्या कोणालाही असलें विश्वरूप वेदाध्ययनानें, यज्ञ केल्यानें, दानें दिल्यानें ( अग्निहोत्रादि श्रौत-स्मार्त ) कर्में केल्यानें अथवा घोर तपश्चर्या केल्यानेंही दृष्टीस पडणें शक्य नाहीं ॥ ४८ ॥

**मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ् ममेदम् ।**
**व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥ ४९ ॥**

**मा** ( नको ) **ते** ( तुला ) **व्यथा** (दुःख) **मा** ( नको ) **च** (आणि) **विमूढभावः** = विमूढस्य भावः ( गोंधळलेली स्थिति ) **दृष्ट्वा** (पाहून) **रूपं** ( रूप ) **घोरं** ( भयंकर ) **ईदृक्** ( असलें ) **मम** ( माझें ) **इदम्** ( हें ) **व्यपेतभीः** = व्यपेता भीः यस्य सः ( ज्याची भीति गेली आहे तो ) **प्रीतमनाः** ( प्रीतं मनः यस्य सः ( ज्याचें मन संतोषित तो ) **पुनः** ( पुनः ) **त्वं** ( तूं ) **तदेव** = तत् एव ( तेंच ) **मे** ( माझें ) **रूपं** (स्वरूप) **इदं** ( हें ) **प्रपश्य** ( पहा ).

मम इदं ईदृक् घोरं रूपं दृष्ट्वा मा ते व्यथा ( अस्तु ), च मा विमूढ-भावः ( अस्तु ) त्वं व्यपेतभीः प्रीतमनाः ( सन् ) पुनः तत् इव इदं मे रूपं प्रपश्य.

हें माझें असलें भयंकर रूप पाहून तूं भिऊन गोंधळून जाऊं नकोस. भीति सोडून प्रसन्नांतःकरण होऊन पुनः तेंच माझें (पूर्वीचें) स्वरूप पहा. ४९

संजय उवाच—

**इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।**
**आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ।५०।**

**इति** ( याप्रमाणें ) **अर्जुनं** ( अर्जुनाला ) **वासुदेवः** ( वासुदेव ) **तथा** ( तसें ) **उक्त्वा** ( बोलून ) **स्वकं** ( आपलें ) **रूपं** ( रूप ) **दर्शयामास** = ( दाखविलें ) **भूयः** ( पुनः ) **आश्वासयामास** (शांतवन केलें ) **च** ( आणि ) **भीतं** ( भ्यालेल्याचें ) **एनं** ( हा ) **भूत्वा** ( होऊन ) **पुनः** ( पुनः ) **सौम्यवपुः** = सौम्यं वपुः यस्य सः ( ज्याचें स्वरूप शांत आहे तो ) **महात्मा** ( मोठ्या मनाचा ).

इति तथा उक्त्वा वासुदेवः भूयः स्वकं रूपं अर्जुनं दर्शयामास; च पुनः सौम्यवपुः भूत्वा एनं भीतं महात्मा आश्वासयामास.

संजय सांगतात—असें याप्रमाणें बोलून वासुदेवांनीं आपलें पूर्वीचें स्वरूप अर्जुनाला दाखविलें आणि पुनः तें सौम्यरूप धारण करून भ्यालेल्या अर्जुनाचें उदार मनाच्या प्रभूनें शांतवन केलें ॥ ५० ॥

अर्जुन उवाच—**दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।**
**इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥ ५१ ॥**

**दृष्ट्वा** ( पाहून ) **इदं** ( हें ) **मानुषं** ( मानवी ) **रूपं** ( रूप ) **तव** ( तुझें ) **सौम्यं** ( शांत ) **जनार्दन** ( हे जनार्दन ) **इदानीम्** ( आतां ) **अस्मि** ( मी आहें ) **संवृत्तः** ( झालेला ) **सचेताः** ( स्थिर मनाचा ) **प्रकृतिं** ( नेहमींच्या स्थितीला ) **गतः** ( गेलेला ).

जनार्दन, इदं तव सौम्यं मानुषं रूपं दृष्ट्वा इदानीं सचेताः संवृत्तः प्रकृतिं गतः अस्मि.

अर्जुन ह्मणालाः—हे जनार्दना, हें तुझें सौम्य मानवी रूप पाहून माझें मन स्थिर झालें आहे व नेहमींची माझी स्थिति मला प्राप्त झाली आहे ॥५१॥

श्रीभगवानुवाच—सुदुर्दशमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ।
देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः ॥ ५२ ॥

**सुदुर्दशम्** ( पाहण्यास फार अवघड ) **इदं** ( हें ) **रूपं** ( रूप ) **दृष्टवान्** ( ज्यानें पाहिलें असा ) **असि** ( तूं आहेस ) **यत्** ( जें ) **मम** ( माझें ) **देवाः** ( देव ) **अपि** ( सुद्धां ) **अस्य** ( ह्याचें ) **रूपस्य** ( स्वरूपाचें ) **नित्यं** ( नेहमीं ) **दर्शनकांक्षिणः** = दर्शनं कांक्षति ते ( दर्शन व्हावें म्हणून उत्सुक असे ).

यत् मम सुदुर्दशं इदं रूपं दृष्टवान् असि, अस्य रूपस्य देवाः अपि नित्यं दर्शनकांक्षिणः.

श्रीभगवान् म्हणाले—जें हें माझें कोणास कधीं न दिसणारें विश्वरूप त्वां पाहिलें ह्याचें दर्शन व्हावें म्हणून देव देखील नित्य इच्छा करतात ॥ ५२ ॥

नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।
शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ ५३ ॥

**न** ( नाहीं ) **अहं** ( मी ) **वेदैः** ( वेदांनीं ) **न** ( नाहीं ) **तपसा** ( तपानें ) **न** ( नाहीं ) **दानेन** ( दानानें ) **न** ( नाहीं ) **च** ( आणि ) **इज्यया** ( यज्ञानें ) **शक्यः** ( शक्य आहे ) **एवंविधः** ( या प्रकारचें ) **द्रष्टुं** ( पाहण्याला ) **दृष्टवान्** (ज्यानें पाहिलें असा) **असि** (तूं आहेस) **मां** ( मला ) **यथा** ( जसें ).

त्वं यथा मां दृष्टवान् असि, एवंविधः न वेदैः न तपसा, न दानेन च न इज्यया अहं द्रष्टुं शक्यः ( अस्मि ).

तुला जसें माझें स्वरूपदर्शन झालें अशा प्रकारें वेदाध्ययनानें, तपानें, दानानें किंवा यज्ञ केल्यानें मला पहाणें शक्य नाहीं ॥ ५३ ॥

भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।
ज्ञातुं द्रष्टुं च तत्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥ ५४

**भक्त्या** ( भक्तीनें ) **तु** ( खरोखर, परंतु ) **अनन्यया** (अभिन्नतेनें) **शक्यः** ( शक्य आहे ) **अहं** ( मी ) **एवंविधः** ( या प्रकारचा ) **अर्जुन** ( अर्जुना ) **ज्ञातुं** ( जाणण्याला ) **द्रष्टुं** ( पाहण्याला ) **च** ( आणि )

**तत्वेन** ( मूळ स्वरूपानें ) **प्रवेष्टुं** ( प्रवेश करण्याला ) **च** ( आणि ) **परंतप** ( शत्रूंस ताप देणाऱ्या, अर्जुना ),

परंतप अर्जुन, तु अहं एवंविधः ज्ञातुं, द्रष्टुं च तत्वेन प्रवेष्टुं च अनन्यया भक्त्या शक्यः ( अस्मि ).

हे परंतपा अर्जुना ! माझें या प्रकारचें विश्वरूप खरोखर जाणण्याला, पाहाण्याला आणि मद्रूप होण्याला एकनिष्ठ भक्ति असेल तरच शक्य आहे ५४

**मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः संगवर्जितः ।**
**निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ॥ ५५ ॥**

**मत्कर्मकृत्** = मम कर्म करोति इति ( माझ्याच करतां कर्म करतो तो ) **मत्परमः** = अहं परमः यस्य सः ( ज्याचें सर्वस्व मी आहें तो ) **मद्भक्तः** = मम भक्तः ( माझा भक्त ) **संगवर्जितः** = संगेन वर्जितः ( आसक्ति नष्ट झाली आहे असा ) **निर्वैरः** ( शत्रुभाव शून्यत्वास पावलेला ) **सर्वभूतेषु** ( सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं ) **यः** ( जो ) **सः** ( तो ) **मां** ( मला ) **एति** ( जातो ) **पांडव** ( अर्जुना ).

पांडव, यः मत्कर्मकृत् मत्परमः मद्भक्तः संगवर्जितः सर्वभूतेषु निर्वैरः ( अस्ति ) सः मां एति.

हे अर्जुना, जो माझ्याप्रीत्यर्थ सर्व कर्मे करतो; ज्याचें सर्वस्व ध्येय मी आहें; जो माझीच भक्ति करतो; ज्यानें सर्वसंगपरित्याग केला आहे; ज्याचा सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं वैरभाव शून्य झाला आहे, असा जो तो मात्र मला येऊन मिळतो ॥ ५५ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासू० ब्र. यो. श्रीकृष्णार्जुनसंवादे विश्वरूपदर्शनयोगो नाम एकादशोऽध्यायः

---

# अध्याय बारावा.



अर्जुन उवाच–एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।
ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥

**एवं** ( याप्रमाणें ) **सततयुक्ताः** ( सर्वकाल चित्त स्थिर करून ) **ये** ( जे ) **भक्ताः** ( भक्त ) **त्वां** ( तुला ) **पर्युपासते** ( भजतात ) **ये** ( जे ) **च** ( आणि ) **अपि** ( सुद्धां ) **अक्षरं** ( अविनाशी ) **अव्यक्तं** ( इंद्रियांस ज्याचें ज्ञान होत नाहीं असे = निर्गुण ) **तेषां** ( यांतील ) **के** ( कोणते ) **योगवित्तमाः** ( योगाचें श्रेष्ठ ज्ञान झालेले ).

( भगवन् ) एवं सततयुक्ताः ये भक्ताः त्वां पर्युपासते ये अव्यक्तं च अक्षरं अपि ( पर्युपासते ) तेषां ( मध्यें ) के योगवित्तमाः ( संति ) ?

**अर्जुन ह्मणाला:**–हे भगवन् , वर ( अकराव्या अध्यायाचे शेवटल्या श्लोकांत ) सांगितल्याप्रमाणें जे भक्त सर्वकाल चित्त स्थिर करून तुला भजतात आणि जे अविनाशी निर्गुणाची उपासना करतात त्यां ( दोघां ) मध्यें योगाचें ( उपासनायोगाचें ) श्रेष्ठ ज्ञान झालेले कोण समजावयाचें ? ॥१॥

श्रीभगवानुवाच–मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।
श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥

**मयि** ( माझ्या ठिकाणीं ) **आवेश्य** ( प्रविष्ट करून ) **मनः** ( मन) **ये** ( जे ) **मां** ( मला ) **नित्ययुक्ताः** ( सर्वदा चित्त स्थिर करून ) **उपासते** ( भजतात ) **श्रद्धया** ( विश्वासानें ) **परया** ( मोठ्या, अत्यंत ). **उपेताः** ( युक्त होत्साते ) **ते** ( ते ) **मे** ( मला ) **युक्ततमाः** ( श्रेष्ठ योगी ) **मताः** ( वाटतात ).

( अर्जुन ) मयि मनः आवेश्य नित्ययुक्ताः ( संतः ) ये परया श्रद्धया उपेताः मां उपासते, ते युक्ततमाः मे मताः.

श्रीभगवान् ह्मणाले—अर्जुना, माझ्या ठिकाणीं मन प्रविष्ट करून तेथेंच निरंतर तें स्थिर ठेवून अत्यंत श्रद्धायुक्त होऊन ( अनन्यभावानें ) माझी उपासना करतात ते सर्वांत श्रेष्ठ योगी होत असें माझें मत आहे॥२॥

**ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।**
**सर्वत्रगमचिंत्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥**

ये ( जे ) तु ( खरोखर ) **अक्षरं** ( अविनाशी ) **अनिर्देश्यं** ( ज्याचें वर्णन करतां येत नाहीं, अगोचर ) **अव्यक्तं** ( जें स्पष्ट करून दाखवितां येत नाहीं, अमूर्त ) **पर्युपासते** ( उपासना करतात ) **सर्वत्रगं** ( सर्व-गामी, सर्वव्यापी ) **अचिंत्यं** ( मनांत आणतां येत नाहीं असें ) **च** ( आणि ) **कूटस्थं** ( भ्रामक मायेंतही सर्वकाल साक्षित्वानें राहणारें, अविकृत, सर्वसाक्षी ) **अचलं** ( अचल ) **ध्रुवं** ( नित्य ).

ये तु अनिर्देश्यं, अव्यक्तं, सर्वत्रगं, अचिंत्यं, कूटस्थं, अचलं, ध्रुवं च अक्षरं पर्युपासते.

अवर्णनीय, अमूर्त, सर्वव्यापी, मनाच्या कल्पनेपलीकडील, मायेंत साक्षित्वानें सदा राहणारें, अचल व नित्य असें जें अविनाशी ब्रह्म त्याची जे उपासना करतात; ( संबंध पुढें आहे. )

**संनियम्येंद्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।**
**ते प्राप्नुवंति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥**

**संनियम्य** ( आवरून धरून ) **इंद्रियग्रामं** = इंद्रियाणां ग्रामं ( इंद्रियांचा समूह, ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें हीं सर्व ) **सर्वत्र** ( सर्व काळीं आणि सर्व स्थळीं ) **समबुद्धयः** = समा बुद्धिः येषां ते ( ज्यांची सर्वदा सम, सारखी बुद्धि आहे असे ) **ते** ( ते ) **प्राप्नुवंति** ( प्राप्त करून घेतात ) **मां** ( मला ) **एव** ( केवल ) **सर्वभूतहिते** = सर्वेषां भूतानां हिते ( सर्व प्राणिमात्रांचे हितांत ) **रताः** ( रममाण होणारे, आनंद मानणारे ).

( ये ) सर्वभूतहिते रताः सर्वत्र समबुद्धयः ( संतः ) इंद्रियग्रामसंनियम्य ( अक्षरं पर्युपासते ) ते, मां एव प्राप्नुवंति.

( व जे ) सर्व प्राणिमात्रांचें कल्याण करण्यांत निमग्न असून सर्व काळीं व सर्व स्थळीं बुद्धि सम ठेवून, इंद्रियसमूह आवरून धरून ब्रह्मोपासना करतात ते माझ्याच स्वरूपाला येऊन मिळतात ॥ ४ ॥

**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।**
**अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥**

**क्लेशः** ( कष्ट, श्रम ) **अधिकतरः** ( जास्त, फार ) **तेषां** ( त्यांना ) **अव्यक्तासक्तचेतसाम्** = अव्यक्ते आसक्तं चेतः येषाम् ते ( ज्यांचें मन ब्रम्हाच्या ठिकाणीं संलग्न झालें आहे ) **अव्यक्ता** ( अस्पष्ट, अमूर्त ) **हि** ( खरोखर ) **गतिः** ( स्थान ) **दुःखं** ( दुःखानें, कष्टानें ) **देहवद्भिः** (देह असणारे प्राण्यांना, देह धारण करणारांना ) **अवाप्यते** ( प्राप्त होतो ).

अव्यक्तासक्तचेतसाम् तेषां अधिकतरः क्लेशः ( अस्ति; तैः ) देहवद्भिः अव्यक्ता गतिः दुःखं अवाप्यते हि.

जे आपलें मन अव्यक्ताच्या ठिकाणीं संलग्न करतात त्यांस ( इष्टसिद्धीसाठीं ) फार कष्ट सोसावे लागतात; कारण देहोपाधि ज्यांस आहे त्यांना अविनाशी अमूर्त परब्रम्हवस्तूचा साक्षात्कार करून घेण्यास अत्यंत श्रम पडतात ॥ ५ ॥

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥ ६ ॥**

**ये** ( जे ) **तु** ( परंतु ) **सर्वाणि** ( सर्व ) **कर्माणि** ( कर्मे ) **मयि** ( माझ्या ठिकाणीं ) **संन्यस्य** ( अर्पण करून ) **मत्पराः** ( माझ्या ठिकाणीं तल्लीन होऊन ) **अनन्येन** ( नास्ति अन्यः यस्मिन् = अनन्यः, अनन्य म्हणजे तोच, अनन्येन म्हणजे दुसरा कोणताही हेतु नाहीं अशा निश्चयानें ) **एव** ( देखील ) **योगेन** ( समाधिनिष्ठेनें ) **मां** ( मला ) **ध्यायंतः** ( ध्यान करून ) **उपासते** ( पूजितात, उपासना करतात ).

ये तु मत्पराः ( संतः ) सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य ( मां ) ध्यायंतः अनन्येन योगेन एव मां उपासते.

परंतु जे सगुण अशा माझ्या ठिकाणीं तल्लीन होऊन, सर्व कर्में मला अर्पण करून अगदीं एकनिष्ठभावानं माझें ध्यान करून उपासना करतात; ॥ ६ ॥

**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।**
**भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥**

**तेषां** ( त्यांचा ) **अहं** ( मी ) **समुद्धर्ता** ( उद्धार करणारा ) **मृत्युसंसारसागरात्** = मृत्युना युक्तः संसारः = मृत्युसंसारः, मृत्युसंसार एव सागरः तस्मात् ( मरणयुक्त संसारसमुद्रापासून ) **भवामि** ( होतों ) **न** ( नाहीं ) **चिरात्** ( फार वेळ ) **पार्थ** ( अर्जुना ) **मयि** ( माझ्या ठिकाणीं ) **आवेशितचेतसाम्** = आवेशितं चेतः यैः तेषां ( ज्यांनीं आपलें मन समर्पण केलें आहे ).

पार्थ, मयि आवेशितचेतसां तेषां अहं मृत्युसंसारसागरात् न चिरात् समुद्धर्ता भवामि.

माझ्या ठिकाणीं ज्यांनीं आपलें मन अर्पण केलें आहे त्यांचा, हे पार्था, मी जन्ममरणयुक्त संसारसमुद्रापासून तात्काळ उद्धार करतों ॥ ७ ॥

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।**
**निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥**

**मयि** ( माझ्या ठिकाणीं ) **एव** ( केवल ) **मनः** ( मन ) **आधत्स्व** ( ठेव ) **मयि** ( माझ्या ठिकाणीं ) **बुद्धिं** ( बुद्धिप्रत ) **निवेशय** ( स्थापित कर म्हणजे ) **निवसिष्यसि** ( तूं राहशील ) **मयि** माझ्या ठिकाणीं ) **एव** ( केवळ ) **अतः** ( येथून ) **ऊर्ध्वं** ( पुढें ) **न** ( नाहीं ) **संशयः** ( संशय, किंतु ).

मयि एव मनः आधत्स्व, मयि बुद्धिं निवेशय च; अतः ऊर्ध्वं मयि एव निवसिष्यसि ( अत्र ) संशयः न.

माझ्याच ठिकाणीं मन ठेव, बुद्धिसुद्धां माझ्याकडेच लाव, म्हणजे यापुढें तूं निःसंशय माझ्याच ठिकाणीं राहशील, म्हणजे माझ्या स्वरूपांत लीन होशील ॥ ८ ॥

अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ।
अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ॥ ९ ॥

अथ ( जर ) चित्तं ( मन ) समाधातुं ( स्थिर करण्याला ) न ( नाहींस ) शक्नोषि ( समर्थ होत ) मयि (माझ्या ठिकाणीं) स्थिरम् ( स्थिर, दृढ निश्चल ) अभ्यासयोगेन = अभ्यासस्य योगेन ( अभ्यासाच्या योगानें ) ततः ( तर ) मां ( मला ) इच्छ (इच्छा कर) आप्तुं ( प्राप्त करून घेणेकरतां ) धनंजय ( हे अर्जुना ).

धनंजय, अथ मयि चित्तं स्थिरं समाधातुं न शक्नोषि, ततः अभ्यासयोगेन मां आप्तुं इच्छ.

हे धनंजया ! माझ्याठिकाणीं मनाची दृढतेनें स्थिरता करण्याचें ( समाधिनिष्ठ होण्याचें ) जर तुला शक्य नसेल तर अभ्यासाच्या योगानें मला प्राप्त करून घेण्याची इच्छा धर ॥ ९ ॥

अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।
मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥ १० ॥

अभ्यासे ( अभ्यासाविषयीं ) अपि ( सुद्धां ) असमर्थः ( असमर्थ ) असि ( तूं असलास ) मत्कर्मपरमः = मम कर्म परमं यस्य सः ( माझें कार्य हेंच ज्याचें सर्वस्व असा ) भव ( हो ) मदर्थं (माझ्याकरतां ) अपि ( केवळ ) कर्माणि ( कर्में ) कुर्वन् ( करणारा, करीत असणारा ) सिद्धिं ( पूर्णता ) अवाप्स्यसि ( तूं मिळविशील ).

( त्वं ) अभ्यासे अपि असमर्थः असि ( चेत् ) मत्कर्मपरमः भवः, मदर्थं अपि कर्माणि कुर्वन् सिद्धिं अवाप्स्यसि.

अभ्यास करण्याचें देखील तुला सामर्थ्य नसेल तर माझ्यासाठीं कर्म करणें हेंच ज्याचें सर्वस्व आहे असा तूं हो, म्हणजे जें काय तूं कर्म करशील तें माझ्यासाठीं ( परमेश्वरप्रीतिसाठीं ) कर्तव्यबुद्धीनें करीत जा; केवळ माझ्यासाठींच कर्तव्यबुद्धीनें कर्में केलीं असतां तुला इष्टसिद्धि ( पूर्णता ) प्राप्त होईल ॥ १० ॥

अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।

सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥

अथ ( जर ) एतत् ( हें ) अपि ( सुद्धां ) अशक्तः ( असमर्थ ) असि ( असशील ) कर्तुं ( करण्याला ) मद्योगं = मम योगं ( माझा योग, मला अनन्यभावानें शरण येणें ) आश्रितः ( आश्रय करून ) सर्व-कर्मफलत्यागं = सर्वेषां कर्मणां फलं, तस्य त्यागः तम् = सर्वेषां कर्मणां फलस्य त्यागं ( सर्व कर्मांच्या फलाचा त्याग ) ततः ( तर ) कुरु (कर) यतात्मवान् = यतः आत्मा येन सः ( ज्याचें अंतःकरण निग्रही असा जो तो ).

अथ एतत् अपि कर्तुं अशक्तः असि, ततः यतात्मवान् मद्योगं आश्रितः ( सन् ) सर्वकर्मफलत्यागं कुरु.

जर हेंही करण्याला तूं असमर्थ असलास, तर मनाचा निग्रह करून व अनन्यभावानें मला शरण येऊन सर्व कर्मांच्या फलाचा त्याग कर ॥११॥

श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।
ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरम् ॥ १२ ॥

श्रेयः ( फल ) हि ( खरोखर ) ज्ञानं ( ज्ञान ) अभ्यासात् ( अभ्यासापेक्षां ) ज्ञानात् ( ज्ञानापेक्षां ) ध्यानं ( ध्यान, मनन, निदिध्यास ) विशिष्यते ( योग्यता विशेष आहे ) ध्यानात् ( ध्यानापेक्षां ) कर्मफलत्यागः = कर्मणां फलस्य त्यागः ( कर्मांच्या फलाचा त्याग, निष्कामबुद्धि ) त्यागात् ( त्याग होतांच ) शांतिः ( शांति, विराम् ) अनंतरम् ( लागलींच ).

अभ्यासात् ज्ञानं श्रेयः ( अस्ति ); ज्ञानात् ध्यानं विशिष्यते; ध्यानात् कर्मफलत्यागः ( विशिष्यते ); अनंतरम् त्यागात् शांतिः ( भवति ) हि.

अभ्यासाहून ज्ञान हें श्रेष्ठ आहे; ज्ञानापेक्षां ध्यान श्रेष्ठ आणि ध्यानापेक्षां कर्मफल त्याग श्रेष्ठ आहे; या कर्मफलत्यागापासून लागलींच शांति प्राप्त होते.

( यांत हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, पहिल्यापेक्षां दुसरें श्रेष्ठ हा जो क्रम दिला आहे त्यांत दुसरें श्रेष्ठ म्हणून पहिलें त्याज्य असें मात्र समजावयाचें नाहीं. अभ्यासापेक्षां ज्ञान श्रेष्ठ म्हणजे नुसत्या अभ्यासापेक्षां ज्ञान-युक्त अभ्यास ( म्हणजे आपण काय करीत आहों याचें ज्ञान असून अ-

न्यास ) झाला पाहिजे. तसेंच ज्ञान असूनही ध्यान म्हणजे एकाग्र मनानें चिंतन झालें पाहिजे असें समजावयाचें. ) ॥ १२ ॥

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।**
**निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥**

**अद्वेष्टा** ( द्वेष न करणारा ) **सर्वभूतानाम्** ( सर्व प्राणिमात्रांचा ) **मैत्रः** ( मित्रत्व भावानें वागणारा ) **करुणः** ( दयाळू ) **एव** ( देखील ) **च** ( आणि ) **निर्ममः** ( माझेपणा नाहीं असा ) **निरहंकारः** ( मीपणा नाहीं असा ) **समदुःखसुखः**—समे दुःखं च सुखं च यस्य सः ( ज्याला दुःख आणि सुख हीं समान आहेत असा ) **क्षमी** ( क्षमाशील ).

( यः ) सर्व भूतानां अद्वेष्टा, मैत्रः, करुणः च एव, निर्ममः निरहंकारः समदुःखसुखः, क्षमी,

जो कोणाचाही द्वेष करीत नाहीं, जो सर्वांचा मित्र, जो दयाळू, ज्याला माझेपणा नाहीं आणि मीपणाही नाहीं, ज्याला दुःख आणि सुख हीं दोन्हींही सारखींच, जो क्षमाशील आहे, ॥ १३ ॥

**संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥**

**संतुष्टः** ( संतोषी ) **सततं** ( नेहमीं ) **योगी** ( समाधिष्ठ, योगी, तपस्वी ) **यतात्मा** ( आत्मसंयमी ) **दृढनिश्चयः** = दृढः निश्चयः यस्य सः ( ज्याचा निश्चय दृढ आहे तो, दृढनिश्चयी ) **मय्यर्पितमनोबुद्धिः**= मयि अर्पिते मनः च बुद्धिः च येन सः ( ज्यानें मन व बुद्धि माझ्या ठिकाणीं लीन केलेलीं आहेत असा ) **यः** ( जो ) **मद्भक्तः** ( माझा भक्त ) **सः** ( तो ) **मे** ( मला, माझा ) **प्रियः** ( आवडता ).

सततं संतुष्टः, योगी, यतात्मा, दृढनिश्चयः, मय्यर्पितमनोबुद्धिः सः मद्भक्तः मे प्रियः ( अस्ति ).

जो सर्वकाळ संतुष्ट, समाधिनिष्ठ, आत्मसंयमी, दृढनिश्चयी आणि ज्यानें आपलें मन व बुद्धि हीं माझ्या ठिकाणीं अर्पण केलेलीं आहेत असा असून जो माझी भक्ति करतो तो मला प्रिय आहे ॥ १४ ॥

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।**

**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १५ ॥**

**यस्मात्** ( ज्याच्यापासून ) **न** ( नाहीं ) **उद्विजते** ( दुःख किंवा संताप वगैरे उत्पन्न होतो ) **लोकः** ( लोक ) **लोकात्** ( लोकापासून ) **न** ( नाहीं ) **उद्विजते** ( दुःख किंवा संताप वगैरे उत्पन्न होतो ) **च** ( आणि ) **यः** ( जो ) **हर्षामर्षभयोद्वेगैः** = हर्षस्य च आमर्षस्य च भयस्य च उद्वेगैः ( हर्ष, क्रोध, भय आणि दुःख यांपासून ) **मुक्तः** ( सुटलेला ) **यः** ( जो ) **सः** ( तो ) **च** ( आणि ) **मे** ( मला ) **प्रियः** ( प्रिय, आवडता ).

लोकः यस्मात् न उद्विजते, यः च लोकात् न उद्विजते, यः च हर्षामर्षभयोद्वेगैः मुक्तः, सः मे प्रियः ( अस्ति ).

ज्याच्यापासून लोक दुःख, संताप वगैरे पावत नाहींत व लोकांपासून ज्याला दुःख, संताप वगैरे होत नाहीं, आणि जो आनंद, क्रोध, भय आणि दुःख यांपासून मुक्त असतो तो मला प्रिय आहे ॥ १५ ॥

**अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।**
**सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥**

**अनपेक्षः** = नास्ति अपेक्षा यस्य ( निरिच्छ, निस्पृह ) **शुचिः** ( शुद्ध ) **दक्षः** ( चतुर, प्रसंगावधानी ) **उदासीनः** ( विरक्त, वैराग्ययुक्त ) **गतव्यथः** = गता व्यथा यस्य सः ( दुःख म्हणून ज्याला ठाऊक नाहीं ) **सर्वारंभपरित्यागी** = सर्वेषां आरंभाणां परित्यागी ( सर्व कर्मांविषयीं अहंकारबुद्धि सोडून दिली आहे ज्यानें ) **यः** ( जो ) **मम** (माझा) **भक्तः** ( भक्त ) **सः** ( तो ) **मे** ( मला ) **प्रियः** ( प्रिय, आवडता ).

यः मद्भक्तः अनपेक्षः, शुचिः, दक्षः, उदासीनः, गतव्यथः, सर्वारंभपरित्यागी सः मे प्रियः.

निस्पृह, अंतरबाह्यशुद्ध, चतुर, विरक्त, दुःख म्हणून ज्याला माहीत नाहीं, अहंकार ( फलेच्छा ) सोडून कर्म करणारा असा जो माझा भक्त तो मला आवडतो ॥ १६ ॥

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति ।**

**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १७ ॥**

**यः** ( जो ) **न** ( नाहीं ) **हृष्यति** ( हर्ष मानीत ) **न** ( नाहीं ) **द्वेष्टि** ( द्वेष करीत ) **न** ( नाहीं ) **शोचति** ( शोक करीत ) **न** ( नाहीं ) **काङ्क्षति** ( इच्छा करीत ) **शुभाशुभपरित्यागी** = शुभस्य च अशुभस्य च परित्यागी ( मंगल आणि अमंगल यांचा त्याग करतो ) **भक्तिमान्** ( एकनिष्ठ, भक्ति करणारा ) **यः** ( जो ) **सः** ( तो ) **मे** ( मला ) **प्रियः** ( प्रिय, आवडता ).

यः न हृष्यति, न द्वेष्टि, न शोचति, न काङ्क्षति, यः शुभाशुभपरित्यागी भक्तिमान् ( अस्ति ) सः मे प्रियः ( अस्ति ).

ज्याला कोणत्याही गोष्टीनें हर्ष होत नाहीं किंवा जो कोणाचा द्वेष करीत नाहीं, गेल्या वस्तूबद्दल शोक करीत नाहीं, किंवा कोणती वस्तु प्राप्त व्हावी ह्मणून इच्छा करीत नाहीं; जो मंगल अगर अमंगल यांची परवा करीत नसून एकनिष्ठेनें माझी भक्ति करतो तो मला आवडतो ॥ १७ ॥

**समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ १८ ॥**

**समः** ( सारखा ) **शत्रौ** ( शत्रूविषयीं ) **च** ( आणि ) **मित्रे** ( मित्राविषयीं ) **च** ( आणि ) **तथा** ( सुद्धां ) **मानापमानयोः** = माने च अपमाने च ( सन्मान केला असतां आणि अपमान केला असतां ) **शीतोष्णसुखदुःखेषु** = शीते च उष्णे च सुखे च दुःखे च ( थंडींत आणि उन्हांत, सुखांत आणि दुःखांत ) **समः** ( सारखा ) **संगविवर्जितः** = संगात् विवर्जितः ( आसक्तिपासून सुटलेला ).

यः शत्रौ च मित्रे ( च ) तथा मानापमानयोः समः, शीतोष्ण. सुखदुःखेषु समः, संगविवर्जितः ( च ) ( अस्ति ).

जो शत्रू आणि मित्र या दोघांनाही सारखाच, ज्याला कोणीं सन्मान केला अगर कोणीं अपमान केला तरी दोन्ही सारखींच; आणि ज्यानें सर्व पदार्थांवरील आसक्ति सोडली आहे ॥ १८ ॥

**तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येनकेनचित् ।**
**अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥**

**तुल्यनिंदास्तुतिः** = तुल्य निंदा च स्तुतिः च यस्य सः ( निंदेची आणि स्तुतीची किंमत ज्याला सारखीच ) **मौनी** ( न बोलणारा, मित-

भाषणी ) **संतुष्टः** ( संतोष मानणारा ) **येनकेनचित्** ( जें काय प्राप्त होईल त्यानें ) **अनिकेतः** ( ज्याला घरदार नाहीं तो ) **स्थिरमतिः** = स्थिरा मतिः यस्य सः ( ज्याची बुद्धि दृढ आहे असा ) **भक्तिमान्** ( एकनिष्ठ, भक्ति करणारा ) **मे** ( मला ) **प्रियः** ( आवडता ) **नरः** ( पुरुष ).

यः तुल्यनिंदास्तुतिः, मौनी, येनकेनचित् संतुष्टः ( भवति ), अनिकेतः, स्थिर मतिः, भक्तिमान्, सः नरः मे प्रियः ( अस्ति ).

ज्याला निंदा आणि स्तुति या सारख्याच आहेत ( कोणीं निंदा केली किंवा स्तुति केली तरी ज्याची चित्तवृत्ति बदलत नाहीं ) ज्यानें आपल्या वाणीचें संयमन केलें आहे, यदृच्छेनें प्राप्त होईल त्यांतच जो समाधान मानून राहतो, ज्याचें राहण्याचें असें नियमित ठिकाण कोणतेंच नसतें; ज्याची बुद्धि स्थिर आहे आणि जो सर्वश्रेष्ठ परमेश्वराची भक्ति एकनिष्ठेनें करीत असतो तो नर ( मानव ) मला फार प्रिय होतो ॥ १९ ॥

**ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।**
**श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥ २० ॥**

**ये** ( जे ) **तु** ( खरोखर ) **धर्म्यामृतम्** = धर्म्यं च तत् अमृतं च ( धर्म्य = धर्माला सोडून नसलेलें, धर्म = स्वरूपी राहणें हा स्वधर्म, अमृतं = अमरपणाला प्राप्त करून देणारे ) **इदं** ( हें ) **यथा** ( ज्याप्रमाणें ) **उक्तं** ( सांगितलें ) **पर्युपासते** ( उपासना करतात, अनुष्ठान करतात ) **श्रद्दधाना** ( श्रद्धापूर्वक ) **मत्परमाः** ( सर्व श्रेष्ठ तो मीच असा विश्वास ठेवून ) **भक्ताः** ( भक्त ) **ते** ( ते ) **अतीव** ( अत्यंत ) **मे** ( मला, माझे ) **प्रियाः** ( आवडते ).

ये तु श्रद्दधानाः मत्परमाः भक्ताः इदं यथोक्तं धर्म्यामृतं पर्युपासते, ते मे अतीव प्रियाः ( संति ).

जे भक्त या वर सांगितलेल्या धर्मपोषक आणि अमरपणाला प्राप्त करून देणाऱ्याचें ( भक्तिशास्त्राचें ) श्रद्धापूर्वक अनुष्ठान करतात ते मला अत्यंत प्रिय होतात.

**इति श्रीमद्भगवद्गीतासु भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः**



---

# अध्याय तेरावा.

अर्जुन उवाच—प्रकृतिं पुरुषं चैव क्षेत्रं क्षेत्रज्ञमेव च ।
एतद्वेदितुमिच्छामि ज्ञानं ज्ञेयं च केशव ॥ १ ॥

**प्रकृतिं** ( माया, अविद्या, मूळ कारण ) **पुरुषं** ( ईश्वर, आत्मा ) **च** ( आणि ) **एव** ( देखील ) **क्षेत्रं** ( शेत, शरीर ) **क्षेत्रज्ञ** ( आत्मा, क्षेत्र जाणणारा ) **एव** ( देखील ) **च** ( आणि ) **एतत्** ( हें ) **वेदितुम्** ( समजून घेण्याला ) **इच्छामि** ( मी इच्छितों ) **ज्ञानं** ( ज्ञान ) **ज्ञेयं** ( जाणावयास योग्य असें ) **च** ( आणि ) **केशव** ( हे कृष्णा ).

केशव, प्रकृतिं पुरुषं च क्षेत्रं क्षेत्रज्ञं च ज्ञानं ज्ञेयं च एतत् एव वेदितुम् इच्छामि.

**अर्जुन** म्हणालाः—हे केशवा ! प्रकृति, पुरुष, क्षेत्र, क्षेत्रज्ञ, तसेंच ज्ञान आणि ज्ञेय, हीं समजून घेण्याची माझी इच्छा आहे.

श्रीभगवानुवाच—इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते ।
एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥१॥

**इदं** ( हें ) **शरीरं** ( शरीर, देह ) **कौंतेय** ( अर्जुना ) **क्षेत्रं** (क्षेत्र) **इति** ( याप्रमाणें ) **अभिधीयते** ( म्हणतात ) **एतत्** ( हें ) **यः** (जो) **वेत्ति** ( जाणतो ) **तं** ( त्याला ) **प्राहुः** ( म्हणतात ) **क्षेत्रज्ञः** (क्षेत्रज्ञ, क्षेत्र जाणणारा ) **इति** ( याप्रमाणें ) **तद्विदः** ( तत्व जाणणारे, ज्ञानी ).

कौंतेय, इदं शरीरं क्षेत्रं इति अभिधीयते; यः एतत् वेत्ति, तं क्षेत्रज्ञः इति तद्विदः प्राहुः.

श्रीभगवान् म्हणाले—हे कुंतिपुत्रा, या शरीराला क्षेत्र म्हणतात, आणि हें ( म्हणजे 'शरीर हें क्षेत्र आहे' असें ) जो ( आत्मा ) जाणतो त्याला ज्ञानी पुरुष क्षेत्रज्ञ असें म्हणतात ॥ १ ॥

---

१. हा श्लोक एकूण प्रतींत आढळून येत नाहीं. मागाहून घातला आहे असें वाटतें.

क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्व क्षेत्रेषु भारत ।
क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ २ ॥

क्षेत्रज्ञं ( क्षेत्र जाणणारा ) च ( आणि ) अपि (सुद्धां) मां ( मला ) विद्धि ( जाण, समज ) सर्वक्षेत्रेषु–सर्वेषु क्षेत्रेषु ( सर्व क्षेत्रांत, सर्व शरीरांत ) भारत ( हे अर्जुना ) क्षेत्रक्षेत्रज्ञयोः = क्षेत्रस्य च क्षेत्रज्ञस्य च ( क्षेत्राचें आणि क्षेत्र जाणणाराचें ) ज्ञानं ( ज्ञान ) यत् ( जें ) तत् ( तें ) ज्ञानं ( ज्ञान ) मतं ( मान्य ) मम ( मला ).

भारत, सर्वक्षेत्रेषु मां अपि च क्षेत्रज्ञं विद्धि; क्षेत्रक्षेत्रज्ञयोः यत् ज्ञानं तत् मम ज्ञानं ( इति ) मतं.

हे अर्जुना, सर्व क्षेत्रांतील क्षेत्रज्ञ मीच आहें असें जाण; क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचें जें ज्ञान तेंच माझें ज्ञान असें मानतात ॥ २ ॥

तत्क्षेत्रं यच्च यादृक् च यद्विकारि यतश्च यत् ।
स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ॥ ३ ॥

तत् ( तें ) क्षेत्रं ( क्षेत्र ) यत् ( कोणतें ) च ( आणि ) यादृक् ( कशासारखें ) च ( आणि ) यद्विकारि = यः विकारः यस्य तत् ( त्याचे विकार ते कोणते ) यतः ( कोठून ) च ( आणि ) यत् ( जें ) सः ( तो ) च ( आणि ) यः ( काय ) यत्प्रभावः = यः प्रभावः यस्य सः ( त्याचें सामर्थ्य ) च ( आणि ) तत् ( तें ) समासेन ( थोडक्यांत ) मे ( माझें, माझ्यापासून ) शृणु ( ऐकून घे ).

तत् क्षेत्रं; यत् च, यादृक च, यद्विकारि ( च ) यतः च यत्; सः ( क्षेत्रज्ञः ) च; यः, यत्प्रभावः च ( अस्ति ) तत् ( त्वं ) मे समासेन शृणु.

तें क्षेत्र कोणतें, कशासारखें असतें, त्याला कोणते विकार होतात ( त्याचीं कोणकोणतीं, कशीं कशीं रुपांतरें होतात ) तें कोठून येतें ( उत्पन्न होतें ) आणि तो ( क्षेत्रज्ञ ) म्हणजे कोण व त्याचें सामर्थ्य काय हें मी थोडक्यांत सांगतों तें ऐक ॥ ३ ॥

ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक् ।
ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥ ४ ॥

ऋषिभिः (ऋषींनीं) बहुधा (अनेक प्रकारांनीं) गीतं (गायिलेलें) छंदोभिः (वृत्तांनीं) विविधैः (नानाप्रकारच्या) पृथक् (भिन्न) ब्रह्मसूत्रपदैः (ब्रम्हप्रतिपादक शास्त्रांतील संक्षिप्त वाक्यांनीं) च (आणि) एव (देखील) हेतुमद्भिः (विचारपरिपूर्ण) विनिश्चितैः (स्पष्ट, निश्चयात्मक).

(इदं क्षेत्र-क्षेत्रज्ञ-ज्ञानं) ऋषिभिः विविधैः छंदोभिः पृथक् बहुधा गीतं; च विनिश्चितैः हेतुमद्भिः ब्रम्हसूत्रपदैः (गीतं) एव.

(हें क्षेत्र क्षेत्रज्ञ यांचें ज्ञान) ऋषींनीं अनेक प्रकारच्या वृत्तांत पुष्कळ प्रकारांनीं निरनिराळें गायिलेलें (वर्णन केलेलें) आहे; आणि निश्चयात्मक व विचारपरिपूर्ण अशा ब्रह्मप्रतिपादक सूत्रांनीं आणि पदांनींही त्याचें विवरण केलें आहे ॥ ४ ॥

महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ।
इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रियगोचराः ॥ ५ ॥

महाभूतानि = महन्ति भूतानि (पंच महाभूतें = पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश) अहंकारः (अहंकार, अभिमान) बुद्धिः (बुद्धि) अव्यक्तं (ईशशक्ति, माया) एव (निश्चित) च (आणि) इंद्रियाणि (इंद्रियें) दश (दहा = पांच ज्ञानेंद्रियें—कान, डोळे, त्वचा, जिव्हा आणि नाक + पांच कर्मेंद्रियें—वाचा, हात, पाय, मलद्वार, मूत्रद्वार) एकं (एक = मन) च (आणि) पंच (पांच) च (आणि) इंद्रियगोचराः = इंद्रियाणां गोचराः (इंद्रियांस ज्ञात होणारे पांच विषय = शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध).

---

१. विषयज्ञानाचा अभिमान उत्पन्न करणाऱ्या वृत्तीला अहंकार ह्मणतात.

२. एव या नियामक शब्दानें चैतन्य-शून्य जी प्रकृति हिचा मात्र बोध व्हावा.

महाभूतानि, अहंकार, बुद्धिः, अव्यक्तं एव च दश इंद्रियाणि च, एकं ( मनः ), इंद्रियगोचराः पंच च.

पंच महाभूतें, अहंकार, बुद्धि, माया, दहा इंद्रियें, मन आणि इंद्रियांचे पांच विषय ॥ ५ ॥

इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ।
एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥

इच्छा ( इच्छा ) द्वेषः ( वैर, तिरस्कार ) सुखं ( सुख ) दुःखं ( दुःख ) संघातः ( समुदाय, शरीर ) चेतना ( सजीवता, प्राविण्य ) धृतिः ( धारणा ) एतत् ( हें ) क्षेत्रं ( क्षेत्र ) समासेन ( एकंदरीनें ) सविकारम् ( विकारांसहित ) उदाहृतम् ( सांगितलें ).

इच्छा, द्वेषः, सुखं, दुःखं, संघातः, चेतना, धृतिः, एतत् सविकारं क्षेत्रं ( मया ) समासेन उदाहृतं.

इच्छा, द्वेष, सुख, दुःख, शरीर, चेतना ( ह्मणजे शुद्ध चैतन्य रसाच्या आभासानें पूर्ण असलेली अंःतकरण–वृत्ति ) आणि धारणा याप्रमाणें ( ३१ तत्वें मिळून ) एकंदरीनें विकारासहित क्षेत्र होय असें सांगितलें आहे ॥६॥

अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् ।
आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ ७ ॥

अमानित्वं ( मनाची इच्छा नसणें ) अदंभित्वं ( दांभिकपणाचा अभाव ) अहिंसा ( अपकार न करणें, नाश न करणें, जीवांचा वध न करणें ) क्षांतिः ( क्षमा, सोशिकपणा ) आर्जवं ( सरळपणा, खरेपणा ) आचार्योपासनं = आचार्यस्य उपासनं ( गुरुची सेवा करणें ) शौचं ( मनाची आणि शरीराची स्वच्छता ) स्थैर्यं ( स्थिरता, निश्चलपणा ) आत्मविनिग्रहः ( आत्मसंयमन )

अमानित्वं, अदंभित्वं, अहिंसा, क्षांतिः, आर्जवं, आचार्योपासनं, शौचं, स्थैर्यं, आत्मविनिग्रहः

मानशून्यता, दांभिकपणाचा अभाव, अहिंसा, क्षमा, सरळपणा, गुरुसेवा, कायिक वाचिक आणि मानसिक स्वच्छता, स्थिरता, आत्मसंयमन, ॥ ७ ॥

**इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च ।**
**जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥**

**इंद्रियार्थेषु** = इंद्रियाणां अर्थेषु ( इंद्रियांच्या विषयांविषयीं ) **वैराग्यं** ( विरक्ति ) **अनहंकारः** ( अहंपणाचा अभाव ) **एव** ( सुद्धां ) **च** ( आणि ) **जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम्** = जन्म च मृत्युः च जरा च व्याधयः च तेषां दुःखस्य च दोषस्य च अनुदर्शनं ( जन्म, मृत्यु, वृद्धावस्था, आणि रोग यांच्या दुःखाचें आणि दोषाचें पूर्ण ज्ञान ).

इंद्रियार्थेषु वैराग्यं, अनहंकारः एव, जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम्.

इंद्रियांच्या विषयांविषयीं[1] विरक्ति, अहंपणाचा अभाव, तसेंच जन्म, मृत्यु, वृद्धावस्था आणि रोग यांच्या दुःखाचें आणि दोषाचें पूर्ण ज्ञान ॥ ८ ॥

**असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ।**
**नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥**

**आसक्तिः** ( निःसंगता, उदासीनता ) **अनभिष्वंगः** ( आपलेपणा न वाटणें ) **पुत्रदारगृहादिषु** = पुत्रेषु च दारेषु च गृहेषु च ( पुत्र, स्त्री, गृह यांच्या ठिकाणीं ) **नित्यं** ( नेहमीं ) **च** ( आणि ) **समचित्तत्वं** ( मनाचा समतोलपणा ) **इष्टानिष्टोपपत्तिषु** ( अनुकूल अथवा प्रतिकूल प्रसंगीं ).

असक्तिः, पुत्रदारगृहादिषु अनभिष्वंगः, इष्टानिष्टोपपत्तिषु नित्यं समचित्तत्वं च.

निःसंगता, पुत्र, स्त्री, घर इत्यादिकांच्या ठिकाणीं आपलेंपणा न वाटणें; अनुकूल अथवा प्रतिकूल प्रसंगीं नेहमीं मनाचा समतोलपणा असणें ॥ ९ ॥



---

१ कर्णांचा विषय शब्द, नेत्रांचा विषय रूप इत्यादि.

**मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।**
**विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १० ॥**

**मयि** ( माझ्या ठिकाणीं ) **च** ( आणि ) **अनन्ययोगेन** ( अनन्य भावानें, याच्याशिवाय आपला दुसरा कोणी हितकर्ता नाहीं असा निश्चय होऊन अन्याश्रयशून्य झालेल्या बुद्धीनें ) **भक्तिः** ( भक्ति ) **अव्यभिचारिणी** ( एकनिष्ठ ) **विविक्तदेशसेवित्वं** = विविक्तस्य देशस्य सेवित्वं ( पवित्र आणि एकांत अशा प्रदेशांत राहणें ) **अरतिः** ( अप्रीति ) **जनसंसदि** = जनानां संसदि ( लोकांच्या गर्दीत ).

च मयि अनन्ययोगेन अव्यभिचारिणी भक्तिः; विविक्तदेशसेवित्वं, जनसंसदि अरक्तिः.

आणि माझ्या ठिकाणीं अनन्यभावानें एकनिष्ठ भक्ति, पवित्र अशा एकांत प्रदेशांत राहण्याची आवड, सामान्य लोकांच्या गर्दीत राहण्याची अप्रीति ॥ १० ॥

**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्वज्ञानार्थदर्शनम् ।**
**एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥ ११ ॥**

**अध्यात्मज्ञाननित्यत्वं** = अध्यात्मनः ज्ञाने नित्यत्वं ( परमात्म्याच्या ज्ञानाच्या ठिकाणीं सारखी निष्ठा असणें ) **तत्वज्ञानार्थदर्शनम्** = तत्वस्य ज्ञानस्य अर्थस्य दर्शनम् ( यथार्थ ज्ञानाच्या म्हणजे ब्रह्मज्ञानाच्या साक्षात्काराची प्राप्ति ) **एतत्** ( हें ) **ज्ञानं** ( ज्ञान ) **इति** ( याप्रमाणें ) **प्रोक्तं** ( ह्मणतात ) **अज्ञानं** ( अज्ञान ) **यत्** ( जें ) **अतः** (याहून) **अन्यथा** ( निराळें ).

अध्यात्मज्ञाननित्यत्वं, तत्वज्ञानार्थदर्शनं, एतत् ज्ञानं इति प्रोक्तं, यत् अतः अन्यथा ( तत् ) अज्ञानं ( प्रोक्तं ).

परमात्म्याच्या ठिकाणीं निमग्न असणें, यथार्थ ज्ञानाचा साक्षात्कार होणें, ( हीं वीं मनोवृत्तींचीं एकंदर २० वीस लक्षणें ) यांना ज्ञान असें म्हणतात; त्याच्याहून जें भिन्न त्याला अज्ञान असें म्हणावें ॥ ११ ॥

ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते ।
अनादिमत्परंब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥ १२ ॥

**ज्ञेयं** ( जाणण्यास योग्य ) **यत्** ( जें ) **तत्** ( तें ) **प्रवक्ष्यामि** ( मी सांगेन ) **यत्** ( जें ) **ज्ञात्वा** ( जाणल्यानें ) **अमृतं** ( अमृत. मोक्ष, अमरत्व ) **अश्नुते** ( मिळतें ) **अनादिमत्** ( ज्याचा आरंभ केव्हां झाला हें सांगतां येत नाहीं असें ) **परं** ( सर्वाहून श्रेष्ठ ) **ब्रह्म** ( ब्रह्म ) **न** ( नाहीं ) **सत्** ( असणें ) **तत्** ( तें ) **न** ( नाहीं ) **असत्** ( नसणें ) **उच्यते** ( म्हणतात ).

यत् ज्ञेयं यत् ज्ञात्वा (जीवः) अमृतं अश्नुते तत् प्रवक्ष्यामि तत् अनादिमत् परं ब्रह्म तत् न सत्, न असत् उच्यते.

ज्याला ज्ञेय म्हणतात व जें जाणल्यानें मोक्षसुख मिळतें तें काय तें सांगतों. तें ज्ञेय म्हणजे " अनादि परब्रह्म " अद्वितीय जें ब्रह्म तें होय; त्याचा आरंभ केव्हां झाला हें समजत नाहीं म्हणून त्याला अनादि म्हटलें आहे. हें ब्रह्म सत् नाहीं व असत् ही नाहीं. अर्थात् हें आहे असें म्हणतां येत नाहीं व नाहीं असेंही म्हणतां येत नाहीं ॥ १२ ॥

सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरो मुखम् ।
सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३ ॥

**सर्वतः पाणिपादं** = सर्वतः पाणयः च पादाः च यस्य तत् ( ज्याचे हातपाय सर्व ठिकाणीं आहेत तें ) **तत्** ( तें ) **सर्वतोऽक्षिशिरोमुखम्** = सर्वतः अक्षीणि च शिरांसि च मुखानि च यस्य तत् (ज्याचे डोळे, मस्तकें, मुखें सर्व बाजूंना आहेत तें ) **सर्वतः** ( सर्व बाजूंना ) **श्रुतिमत्** ( कान असून ) **लोके** ( जगतांत ) **सर्वं** ( सर्व, अखिल ) **आवृत्य** (व्यापून) **तिष्ठति** ( राहतें ).

ततः सर्वतः पाणिपादं, सर्वतः अक्षिशिरो मुखं, सर्वतः श्रुतिमत् (अस्ति) लोके सर्वं आवृत्य तिष्ठति.



या ब्रह्माला सर्वत्र हात, पाय, नेत्र, मस्तकें आणि मुखें आहेत; सर्व बाजूंनीं कान आहेत आणि तें सर्व विश्व व्यापून राहिलेलें आहे ॥ १३ ॥

सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम् ।
असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४ ॥

**सर्वेंद्रियगुणाभासं** = सर्वेषाम् इंद्रियाणाम् गुणेषु आभासः यस्य तत् (जें सर्व इंद्रियांच्या गुणधर्मांचें प्रकाशन करतें) **सर्वेंद्रियविवर्जितम्** = सर्वैः इंद्रियैः विवर्जितं (सर्व इंद्रियांविरहित असून) **असक्तं** (निर्लेप, कशावर अवलंबून नसलेलें) **सर्वभृत्** = सर्वं बिभर्ति इति (सर्वांला आधार असलेलें) **च** (आणि) **एव** (केवळ) **निर्गुणं** (गुणरहित) **गुणभोक्तृ** = गुणानां भोक्तृ (गुणांचा उपभोग घेणारें) **च** (आणि).

(तत्) सर्वेंद्रियगुणाभासं, सर्वेंद्रियविवर्जितं, असक्तं सर्वभृत् च निर्गुणं गुणभोक्तृ एव च (अस्ति).

जें सर्व इंद्रियांविरहित असून सर्व इंद्रियांच्या गुणधर्मांचें प्रकाशन करणारें आहे; तें कोणत्याही ठिकाणीं चिकटलेलें नसून सर्वांस आधारभूत आहे; गुणविरहित असून गुणांचा उपभोग घेणारें आहे असें दिसतें ॥ १४ ॥

बहिरंतश्च भूतानामचरं चरमेव च ।
सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ॥ १५ ॥

**बहिः** (बाहेर) **अंतः** (आंत) **च** (आणि) **भूतानां** (भूतमात्रांचे) **अचरं** (स्थिर) **चरं** (हलणारें, चंचल) **एव** (सुद्धां) **च** (आणि) **सूक्ष्मत्वात्** (सूक्ष्म असल्यामुळें) **तत्** (तें) **अविज्ञेयं** (न समजण्यासारखें) **दूरस्थं** = दुरे तिष्ठति इति (दूर असणारें) **च** (आणि) **अंतिके** (जवळ) **च** (आणि) **तत्** (तें).

तत् भूतानां बहिः अंतः च (अस्ति), अचरं चरं च एव (अस्ति) सूक्ष्मत्वात् अविज्ञेयं (अस्ति) दूरस्थं च अंतिके च (अस्ति).

तें सर्व भूतमात्रांच्या आंतबाहेर भरून राहिलें आहे; स्थिर आहे आणि चलही आहे; अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें समजून येत नाहीं; तें दूर आहे आणि अगदीं जवळही आहे ॥ १५ ॥



अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।
भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥ १६ ॥

**अविभक्तं** ( विभागलेलें नव्हें असें, सर्वत्र पूर्ण भरलेलें ) **च** (आणि) **भूतेषु** ( प्राणिमात्रांत ) **विभक्तं** ( विभागलेलें ) **इव** ( जसें कांहीं ) **च** ( आणि ) **स्थितं** ( वसलेलें ) **भूतभर्तृ** = भूतानां भर्तृ ( प्राणिमात्रांचा आधार ) **च** ( आणि ) **तत्** ( तें ) **ज्ञेयं** ( समजून घेण्याची वस्तु ) **ग्रसिष्णु** ( ग्रासून टाकणारें, नाश करणारें ) **प्रभविष्णु** ( उत्पन्न करणारें ) **च** ( आणि ).

तत् ज्ञेयं अविभक्तं च भूतेषु विभक्तं च इव स्थितम्, भूतभर्तृ च ग्रसिष्णु च प्रभविष्णु च ( अस्ति ).

तें भूतमात्रांच्या ठिकाणीं सर्वत्र पूर्ण भरलेलें असून ( घटांत दिसलेल्या आकाशाप्रमाणें ) व्यक्तींच्या ठिकाणीं विभागलेलें भासतें, आणि तें ज्ञेय सर्व भूतमात्रांचा आधार आहे, सर्वांचा नाश करणारें व सर्वांची उत्पत्ति करणारें आहे ॥ १६ ॥

**ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।**
**ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य विष्ठितम् ॥ १७ ॥**

**ज्योतिषाम्** ( प्रकाशांचें ) **अपि** ( सुद्धां ) **तत्** ( तें ) **ज्योतिः** ( प्रकाश ) **तमसः** ( अंधकारापासून ) **परं** ( पलीकडे ) **उच्यते** ( म्हणतात ) **ज्ञानं** ( ज्ञान ) **ज्ञेयं** ( ज्याचें ज्ञान झालें पाहिजे तें ) **ज्ञानगम्यं** = ज्ञानेन गम्यं ( ज्ञानानें मिळण्यासारखें ) **हृदि** ( हृदयांत, अंतःकरणांत ) **सर्वस्य** ( सर्वांच्या ) **विष्ठितम्**[1] = विशेषेण स्थितम् ( भरून राहिलेलें. )

तत् ज्योतिषां अपि ज्योतिः ( अस्ति ) तमसः परं उच्यते; ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं ( अस्ति ) सर्वस्य हृदि विष्ठितम् ( अस्ति ).

तें प्रकाशाचें प्रकाशक आहे, अंधकाराच्या ( अज्ञानाच्या ) पलीकडील आहे असें म्हणतात; ज्ञान, ज्याचें ज्ञान झालें पाहिजे तें आणि

---

१ " धिष्ठितं " असाही पाठ आहे. तेव्हां अधिष्ठित अशा अर्थी तो समजावयाचा.

ज्ञानानेंच मिळणारें जें ब्रह्म तेंच सर्वांच्या हृदयांत वस्ती करून ( भरून ) राहिलें आहे ॥ १७ ॥

**इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।**
**मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥ १८ ॥**

**इति** ( याप्रमाणें ) **क्षेत्रं** ( शरीर ) **तथा** ( सुद्धां ) **ज्ञानं** ( ज्ञान ) **ज्ञेयं** ( जाणावयाचें तें ) **च** ( आणि ) **उक्तं** ( सांगितलें ) **समासतः** ( थोडक्यांत ) **मद्भक्तः** = मम भक्तः ( माझा भक्त ) **एतत्** ( हें ) **विज्ञाय** ( जाणून ) **मद्भावाय** =मम भावाय (माझा होण्याला) **उपपद्यते** ( योग्य होतो ).

इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं च समासतः उक्तं; मद्भक्तः एतत् विज्ञाय मद्भावाय उपपद्यते.

याप्रमाणें क्षेत्र, ज्ञान आणि ज्ञेय हीं संक्षेपानें तुला सांगितलीं. ह्यांचें ज्ञान झाल्यानें माझा भक्त माझ्या स्वरूपाला येऊन मिळण्याला योग्य होतो ॥ १८ ॥

**प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।**
**विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥ १९ ॥**

**प्रकृतिं** ( माया, अविद्या ) **पुरुषं** ( पुरुष, परमात्मा ) **च** ( आणि ) **एव** ( देखील ) **विद्धि** ( समज ) **अनादी** ( ज्याला आरंभ नाहीं अशीं ) **उभौ** ( दोन्ही ) **अपि** ( सुद्धां ) **विकारान्** ( रुपांतरें ) **च** ( आणि ) **गुणान्** ( मूळ धर्म, गूण ) **च** ( आणि ) **एव** ( केवळ ) **विद्धि** ( समज ) **प्रकृतिसंभवान्** = प्रकृतेः संभवो येषां तान् ( प्रकृतीपासून निर्माण झालेलीं ).

( त्वं ) प्रकृतिं पुरुषं च उभौ अपि अनादि एव विद्धि; विकारान् च गुणान् च प्रकृतिसंभवान् एव विद्धि.

प्रकृति आणि पुरुष हे दोन्ही अनादी आहेत हें लक्षांत घे; आणि विकार व गूण हीं प्रकृतीपासून उत्पन्न झालीं आहेत असें जाण ॥ १९ ॥

**कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।**
**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥**

**कार्यकारणकर्तृत्वे** = कार्याणां च कारणानाम् च कर्तृत्वं ( कार्य म्हणजे ( देह ) आणि कारण ( इंद्रियें या दोहोंच्या उत्पत्तींत ) **हेतुः** ( आदिकारण, मूळ हेतु ) **प्रकृतिं** ( माया, अविद्या ) **उच्यते** ( म्हणतात ) **पुरुषः** ( जीव, क्षेत्रज्ञ ) **सुखदुःखानाम्** = सुखानाम् च दुखानाम् ( सुखाच्या आणि दुःखाच्या ) **भोक्तृत्वे** ( भोगण्यांत, अनुभविण्यांत ) **हेतुः** ( आदिकारण ) **उच्यते** ( म्हणतात ).

प्रकृतिः कार्य कारण* कर्तृत्वे हेतुः उच्यते; पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुः उच्यते.

प्रकृति ही कार्य आणि कारण यांच्या उत्पत्तीला आदिकारण आहे ( शरीर आणि इंद्रियें यांच्या उत्पत्तीचें मूळ कारण प्रकृति आहे ) आणि पुरुष हा सुखदु:खांच्या भोगण्यास कारण आहे, असें म्हणतात; म्हणजे कार्य, कारण आणि कर्तृत्व हीं प्रकृति-जन्य म्हणजे प्रकृतीचे विकार किंवा धर्म अगर रूपें आहेत; व सुख-दुःख भोगणें हा विकार किंवा धर्म पुरुषाचा ( अज्ञान जीवाचा ) आहे.

**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान्गुणान् ।**
**कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥ २१ ॥**

**पुरुषः** ( जीव, क्षेत्रज्ञ ) **प्रकृतिस्थः** = प्रकृति स्थितौ इति ( प्रकृतींत राहून ) **हि** ( खरोखर ) **भुंक्ते** ( उपभोग घेतो ) **प्रकृतिजान्** =

---

* दुसरा पाठ "कार्य करण कर्तृत्वे" असा आहे. कार्य म्हणजे स्थूल शरीर (पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश यांनीं बनलेलें व रूप, रस, गंध स्पर्श आणि शब्द या गुणांनीं युक्त असलेलें) आणि करण म्हणजे क्रियेचें साधन, शरीरामध्येच असणारीं तीन अंतर इंद्रियें ( मन, बुद्धि आणि अहंकार ) आणि दहा बाह्येंद्रियें मिळून तेरा करणें म्हणजे क्रियेचीं साधनें ध्यावयाचीं.

प्रकृतेः जातान् ( प्रकृतीपासून उत्पन्न झालेले ) गुणान् ( गुण ) कारणं ( कारण ) गुणसंगः = गुणेषु संगः (गुणांत आसक्ति) अस्य ( त्याची ) सदसद्योनिजन्मसु = सतीषु च असतीषु च योनिषु जन्मानि तेषु ( चांगल्या आणि वाईट स्थितींतल्या जन्मांत ).

पुरुषः प्रकृतिस्थः ( सन् ) प्रकृतिजान् गुणान् भुंक्ते हि; अस्य सदसद्योनि जन्मसु कारणं गुणसंगः ( अस्ति ).

पुरुष हा प्रकृतींत राहून प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या गुणांचा उपभोग घेतो; आणि गुणांची आसक्ति ही पुरुषाच्या चांगल्या अगर वाईट योनींत जन्माला कारण होते ॥ २१ ॥

उपद्रष्टानुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।
परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥ २२ ॥

**उपद्रष्टा** ( अवलोकन कर्ता, नजर ठेवणारा ) **अनुमंता** ( संमति देणारा ) **च** ( आणि ) **भर्ता** ( पाळण करणारा ) **भोक्ता** ( उपभोग घेणारा ) **महेश्वरः** ( परमेश्वर ) **परमात्मा** ( परमात्मा ) **इति** ( याप्रमाणें ) **च** ( आणि ) **अपि** ( सुद्धां ) **उक्तः** ( म्हणतात ) **देहे** ( शरीरांत ) **अस्मिन्** ( ह्यांत ) **पुरुषः** ( पुरुष ) **परः** ( सर्वांत श्रेष्ठ ).

अस्मिन् देहे परः पुरुषः उपद्रष्टा, अनुमंता, भर्ता, भोक्ता अपि च महेश्वरः परमात्मा अस्ति इति उक्तः.

या देहामध्यें असणारा जो सर्वश्रेष्ठ पुरुष आहे तो अवलोकन करणारा (साक्षी) संमति देणारा, पालनकर्ता, उपभोग घेणारा सर्व शक्तिमान् ईश्वर आहे; ह्यालाच परमात्मा असें म्हणतात ॥ २२ ॥

य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।
सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥ २३ ॥

**यः** ( जो ) **एवं** ( याप्रमाणें ) **वेत्ति** ( जाणतो ) **पुरुषं** ( पुरुष ) **प्रकृतिं** ( माया स्थूलरूप ) **च** ( आणि ) **गुणैः** ( गुणांनीं युक्त ) **सह** ( बरोबर ) **सर्वथा** ( सर्व प्रकारांत ) **वर्तमानः** ( वागणारा )

अपि ( सुद्धां ) न ( नाहीं ) सः ( तो ) भूयः ( पुन्हां) अभिजायते ( जन्माला येतो ).

यः एवं पुरुषं गुणैः सह प्रकृतिं च वेत्ति, सः सर्वथा वर्तमानः अपि भूयः न अभिजायते.

जो याप्रमाणें पुरुष आणि गुणांसह प्रकृति यांना जाणतो तो कोणत्याही स्थितींत वावरत असला तरी तो पुन्हां जन्माला येत नाहीं (मुक्त होतो) २३

**ध्यानेनात्मनि पश्यंति केचिदात्मानमात्मना ।**
**अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥ २४ ॥**

ध्यानेन ( एकाग्र चित्त करून ) आत्मनि ( आपणांत, आपल्या बुद्धीमध्यें ) पश्यंति (पाहतात) केचित् (कांहीं पुरुष) आत्मानं (स्वस्वरूप, ईश्वर ) आत्मना ( अंतःकरणानें ) अन्ये ( दुसरे ) सांख्येन ( सांख्य योगानें ) योगेन ( योगानें ) कर्मयोगेन ( कर्मयोगानें ) च ( आणि ) अपरे ( दुसरे ).

केचित् ध्यानेन आत्मानं आत्मनि आत्मना पश्यंति. अन्ये सांख्येन योगेन ( आत्मानं पश्यंति ); अपरे च कर्मयोगेन ( आत्मानं पश्यंति ).

कोणी एकाग्र चित्त करून ईशस्वरूपाला आपल्या शुद्ध अंतःकरणाच्या योगानें आपल्या ठिकाणीं ( आपल्या बुद्धीमध्यें ) जाणतात, दुसरे काहीं सांख्य विचारानें ( ज्ञान प्राप्तीनंतर संन्यास घेऊन ) आणि कोणीतर कर्मयोगानें ( निष्काम बुद्धीनें कर्मे करून ) आपल्या ठिकाणीं आत्म्याला जाणतात ॥ २४ ॥

**अन्ये त्वेवमजानंतः श्रुत्वान्येभ्य उपासते ।**
**तेऽपि चातितरंत्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥ २५ ॥**

अन्ये ( दुसरे ) तु ( खरोखर ) एवं ( हें ) अजानंतः ( न समजणारे ) श्रुत्वा ( ऐकून घेऊन ) अन्येभ्यः ( दुसऱ्यांपासून ) उपासते ( उपासना करतात ) ते ( ते ) अपि ( सुद्धां ) च ( आणि ) अतितरांति ( पार जातात ) एव ( देखील अगदी ) मृत्युं ( मरण ) ( श्रुति-

परायणाः = श्रुतिः ( श्रवणं ) परं अयन येषां ते ( ज्यांना श्रवण हाच अंतिम मार्ग आहे ते. )

अन्ये तु एवम् अजानंतः अन्येभ्यः श्रुत्वा उपासते, ते श्रुतिपरायणाः च अपि मृत्युं अतितरंति एव.

आणखी दुसरे लोक या प्रकारचा ( श्लोक २३।२४ मध्यें सांगितलेल्या प्रकाराचा ) मोक्ष मार्ग आहे हें न जाणणारे, दुसऱ्यांकडून (सत्पुरुषाकडून) ऐकून घेऊन तशी उपासना करतात. ते (केवळ) श्रुतिसंमत (दुसरे सांगतील तें ऐकून ) आचरण करणारे असूनही जन्ममरणापासून सुटतात ।२५।

**यावत्संजायते किंचित्सत्त्वं स्थावरजंगमम् ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ २६ ॥**

**यावत्** ( जें कांहीं ) **संजायते** ( जन्मतें, उत्पन्न होतें ) **किंचित्** ( कोणतेंही ) **सत्त्वं** ( पदार्थमात्र ) **स्थावरजंगमम्** = स्थावरं च जंगमं च (चराचर, स्थाईक व हलणारे) **क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्** = क्षेत्रस्य च क्षेत्रज्ञस्य च संयोगात् ( क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांच्या संघट्टनापासून ) **तत्** ( तें ) **विद्धि** ( समज ) **भरतर्षभ** ( भरतकुलश्रेष्ठा ).

भरतर्षभ, यावत् किंचित् स्थावरजंगमं सत्त्वं संजायते, तत् क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात् ( संजायते इति त्वं ) विद्धि.

हे भरतश्रेष्ठा, स्थावरजंगम, सजीव-निर्जीव पदार्थमात्र ( या अनंत विश्वांत ) अस्तित्वांत येतात, ते क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासून उत्पन्न होतात असें समज ॥ २६ ॥

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरम् ।**
**विनश्यत्स्वविनश्यंतं यः पश्यति स पश्यति ॥ २७ ॥**

**समं** ( सारखा ) **सर्वेषु** ( सर्वांत ) **भूतेषु** ( प्राणिमात्रांत ) **तिष्ठंतं** ( राहिलेला ) **परमेश्वरं** ( सर्वश्रेष्ठ ईश्वर ) **विनश्यत्सु** ( नाशिवंतांत ) **अविनश्यंतं** ( अविनाशी, नाश न पावणारा ) **यः** ( जो ) **पश्यति** ( पाहातो ) **सः** ( तो ) **पश्यति** ( पाहातो ).

यः सर्वेषु भूतेषु समं तिष्ठंतं विनश्यत्सु अविनश्यंतं परमेश्वरं पश्यति सः पश्यति.

सर्व भूतमात्रांत सारखा ( एकरूप ) राहणारा व भूतें नष्ट झालीं तरी स्वतः नष्ट न होणारा परमेश्वर या भूतांत आहे असें ज्याला दिसतें तोच खऱ्या ( वास्तविक ) रीतीनें पाहातो ( त्यालाच खरें दिसतें ) ॥ २७ ॥

**समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।**
**न हिनस्त्यात्मनाऽऽत्मानं ततो याति परां गतिम् ॥२८॥**

**समं** ( सारख्या ) **पश्यन्** ( पाहून ) **हि** ( खरोखर ) **सर्वत्र** ( सर्व ठिकाणीं ) **समवस्थितम्** ( सारखा राहून ) **ईश्वरं** ( ईश्वर ) **न** ( नाहीं ) **हिनस्ति** ( नाश करितो ) **आत्मना** (आपण) **आत्मानं** ( आत्मस्वरूप ) **ततः** ( त्या योगानें ) **याति** ( जातो ) **परां** (अत्युच्च, श्रेष्ठ ) **गतिं** ( पदाला ).

( यः ) सर्वत्र समवस्थितम् ईश्वरं समं पश्यन् आत्मना आत्मानं न हिनस्ति, ( सः ) ततः परां गतिं याति.

परमेश्वर सर्व ठिकाणीं सारखा ( भरून ) राहिलेला आहे असें पाहा- णारा ( ज्ञानी पुरुष ) आत्मस्वरूपाचा आपण ( स्वतः ) नाश करीत नाहीं ( भलत्या समजुतीनें आत्मस्वरूपाचा विपर्यास करीत नाहीं ) आणि त्यायोगानें अति श्रेष्ठ पदाला जातो ॥ २८ ॥

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।**
**यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥ २९ ॥**

**प्रकृत्या** ( प्रकृतीनें ) **एव** ( केवळ ) **च** ( आणि ) **कर्माणि** (कर्में) **क्रियमाणानि** ( होत असलेलीं ) **सर्वशः** ( सर्व ठिकाणीं ) **यः** (जो) **पश्यति** ( पाहातो ) **तथा** ( त्याप्रमाणें ) **आत्मानं** ( आत्मा ) **अकर्तारं** ( कर्म न करणारा ) **सः** ( तो ) **पश्यति** ( पाहातो ).

यः च प्रकृत्या एव कर्माणि सर्वशः क्रियमाणानि ( संति इति ) पश्यति, तथा आत्मानं अकर्तारं पश्यति, सः पश्यति.

आणि होत असलेलीं सर्व कर्में केवळ प्रकृतिकडून होतात असें ज्याला समजलें, तसेंच आत्मा हा कर्तृत्वशून्य ( अकर्ता ) आहे असें जो समजून उमजतो तोच खरा ज्ञानी ( द्रष्टा ) होय ॥ २९ ॥

**यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।**
**तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ ३० ॥**

**यदा** ( जेव्हां ) **भूतपृथग्भावं** = भूतानां प्रथक् भावं ( भूतमात्रांचें निरनिराळें अस्तित्व ) **एकस्थं** = एके स्थितं ( एकव्यांत असणें, एकव्यांत राहणें ) **अनुपश्यति** ( समजून घेतो ) **ततः** ( तेथून ) **एव** ( केवळ ) **च** ( आणि ) **विस्तारं** ( पसरणें, व्याप्ति ) **ब्रह्म** ( ब्रह्म ) **संपद्यते** ( होतो ) **तदा** ( नंतर ).

यदा भूतपृथग्भावं एकस्थं च ततः एव च विस्तारं अनुपश्यति तदा ब्रह्म संपद्यते.

भूतमात्रांच्या निरनिराळ्या अस्तित्वांचें मूळ एका ( ईश्वराच्या ) ठिकाणीं आहे, आणि त्याच ठिकाणापासून सर्व विस्तार झाला आहे असें जेव्हां त्याला समजतें तेव्हां तो ब्रह्माला पोंचतो ( ब्रह्मरूप होतो ) ॥ ३० ॥

**अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्माऽयमव्ययः ।**
**शरीरस्थोऽपि कौंतेय न करोति न लिप्यते ॥ ३१ ॥**

**अनादित्वात्** ( अनादि असल्यामुळें ) **निर्गुणत्वात्** ( गुणरहित आहे म्हणून ) **परमात्मा** ( परमेश्वर ) **अयं** ( हा ) **अव्ययः** ( अविनाशी ) **शरीरस्थः** ( शरीरांत राहिलेला ) **अपि** ( सुद्धां ) **कौंतेय** ( कुंतिपुत्रा ) **न** ( नाहीं ) **करोति** ( कर्में करींत ) **न** ( नाहीं ) **लिप्यते** ( विकार पावत ).

कौंतेय, अयं परमात्मा अनादित्वात्, निर्गुणत्वात्, अव्ययः अस्ति ( अतः ) सः शरीरस्थः ( सन् ) अपि न करोति न ( च ) लिप्यते.



हे अर्जुना, हा परमात्मा अनादि व गुणरहित असल्यामुळें अविनाशी

आहे; तो शरीरांत रहातो, तथापि तो कांहीं करीत नाहीं व कशानें लिप्त होत नाहीं ॥ ३१ ॥

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।**
**सर्वत्रावस्थितो देहे तथाऽत्मा नोपलिप्यते ॥ ३२ ॥**

**यथा** ( जसें ) **सर्वगतं** ( सर्व ठिकाणीं असलेलें ) **सौक्ष्म्यात्** ( अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें ) **आकाशं** ( आकाश ) **न उपलिप्यते** ( विकार पावत नाहीं ) **सर्वत्र** ( सर्व ठिकाणीं ) **अवस्थितः** ( राहिलेला ) **देहे** ( शरीरांत ) **तथा** ( त्याप्रमाणें ) **आत्मा** ( आत्मा ) **न उपलिप्यते** ( लिप्त होत नाहीं ).

यथा सर्वगतं आकाशं सौक्ष्म्यात् न उपलिप्यते, तथा सर्वत्र देहे अवस्थितः आत्मा न उपलिप्यते.

ज्याप्रमाणें सर्व ठिकाणीं असणारें आकाश अतिसूक्ष्म असल्यामुळें कशानेंही लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें सर्व शरीरांत राहणारा आत्मा कशानेंही लिप्त होत नाहीं ॥ ३२ ॥

**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ।**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३ ॥**

**यथा** ( ज्याप्रमाणें ) **प्रकाशयति** ( उजेड पाडतो ) **एकः** (एकटा) **कृत्स्नं** ( सर्व ) **लोकं** ( जगत् ) **इमं** ( हें ) **रविः** ( सूर्य ) **क्षेत्रं** ( शरीर ) **क्षेत्री** ( आत्मा ) **तथा** ( त्याप्रमाणें ) **कृत्स्नं** ( सर्व ) **प्रकाशयति** ( प्रकाश पाडतो ) **भारत** ( अर्जुना ).

भारत, यथा एकः रविः इमं कृत्स्नं लोकं प्रकाशयति, तथा क्षेत्री कृत्स्नं क्षेत्रं प्रकाशयति.

हे भारत, जसा एकटा सूर्य या सर्व जगताला प्रकाशित करतो त्याप्रमाणें क्षेत्रज्ञ ( आत्मा ) सर्व क्षेत्राला ( महाभूतापासून ते धारणेपर्यंत पूर्वी वर्णन केलेल्या क्षेत्राला ) प्रकाशित करतो ॥ ३३ ॥

क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमंतरं ज्ञानचक्षुषा ।
भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यांति ते परम् ॥ ३४ ॥

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोः** = क्षेत्रस्य च क्षेत्रज्ञस्य च ( क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचें ) **एवं** ( याप्रमाणें ) **अंतरं** ( भेदाभेद ) **ज्ञानचक्षुषा** = ज्ञानस्य चक्षुषा ( ज्ञानाच्या डोळ्यांनीं ) **भूतप्रकृतिमोक्षं** = भूतेभ्यः प्रकृतेश्च (आत्मनः) मोक्षं ( पंच महाभूतें व प्रकृति यांच्यापासून आत्म्याची सोडवणूक, निराळेपणा ) **च** ( आणि ) **ये** ( जे ) **विदुः** ( जाणतात ) **यांति** ( जातात ) **ते** ( ते ) **परं** ( अति उच्च पदाला ).

ये एवं ज्ञानचक्षुषा क्षेत्रक्षेत्रज्ञयोः ( ज्ञानं ) भूत प्रकृति मोक्षं च विदुः, ते परं यांति.

जे आपल्या ज्ञानाच्या डोळ्यांनीं ( ज्ञानानें ) क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांतील भेदाभेद पाहतात ( जाणतात ) आणि पंचमहाभूतें व प्रकृति ( माया ) यांच्यापासून आत्मा हा कसा निराळा आहे हें समजून त्याप्रमाणें वागतात, ते उत्तम पदाला जातात ॥ ३४ ॥

इति श्रीभगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगो नाम त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

---

# अध्याय चौदावा.

श्रीभगवानुवाच-परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।
यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥१॥

परं ( श्रेष्ठ, परमात्मविषयक ) भूयः ( पुनः, वारंवार ) प्रवक्ष्यामि ( मी सांगेन ) ज्ञानानां ( ज्ञानांमध्यें ) ज्ञानं ( ज्ञान, आत्मज्ञान ) उत्तमं ( श्रेष्ठ ) यत् ( जें ) ज्ञात्वा ( समजल्यावर, ज्ञान झाल्यावर ) मुनयः ( मुनी, तपस्वीजन ) सर्वे ( सकळ ) परां ( श्रेष्ठ ) सिद्धिम् ( कार्याच्या पूर्णतेला, फलोत्पत्तीला ) इतः ( येथून ) गताः ( गेले, पोंचले ).

भूयः ज्ञानानां परं उत्तमं ज्ञानं प्रवक्ष्यामि, यत् ज्ञात्वा सर्वे मुनयः इतः परां सिद्धिं गताः.

सर्व ज्ञानांमध्यें श्रेष्ठ आणि उत्तम असें जें ज्ञान तें मी पुनः ( तुला ) स्पष्ट करून सांगतों; हें ज्ञान झाल्यामुळें सर्व ब्रह्मविचारी मुनींनीं अतिश्रेष्ठ सिद्धि ( मोक्ष सिद्धि ) प्राप्त करून घेतली आहे ॥ १ ॥

इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ।
सर्गेऽपि नोपजायंते प्रलये न व्यथंति च ॥ २ ॥

इदं ( हें ) ज्ञानं ( ज्ञान ) उपाश्रित्य ( प्राप्त करून घेऊन, संपादून ) मम ( माझें ) साधर्म्यं = समान-धर्मतां ( सारखे धर्मांप्रत ) आगताः ( येतात ) सर्गे ( उत्पत्तीच्या वेळीं ) अपि ( तरी ) न उपजायंते ( पुनः जन्मास येत नाहींत ) प्रलये ( प्रलयकाळीं, मरणसमयीं ) न व्यथंति ( दुःख पावत नाहींत ) च ( आणि )

ये इदं ज्ञानं उपाश्रित्य मम साधर्म्यं आगताः ( संति ते ) सर्गे अपि न उपजायंते, च प्रलये च व्यथन्ति.

हें ज्ञान संपादन करून जे माझ्या स्वरूपाप्रत प्राप्त होतात, ते सृष्टि-उत्पत्तिकाळीं जन्म पावत नाहींत आणि विश्वसंहारकाळीं त्यांना ( संहाराचीं ) पीडा होत नाहीं ( त्यांचा नाश होत नाहीं ) म्हणजे ते जन्ममरणापासून मुक्त होतात. ॥ २ ॥

**मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहम् ।**
**संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ ३ ॥**

**मम** ( माझें ) **योनिः** ( गर्भ ठेवण्याचें ठिकाण ) **महत्ब्रह्म** (प्रकृति) **तस्मिन्** ( त्यांत ) **गर्भं** ( गर्भ ) **दधामि** ( ठेवतों ) **अहं** ( मी ) **संभवः** ( उत्पत्ति ) **सर्वभूतानां** ( सर्व प्राणिमात्रांची ) **ततः** ( त्यापासून ) **भवति** ( होते ) **भारत** ( पार्था, अर्जुना ).

भारत; महद्ब्रह्म मम योनिः ( अस्ति ), अहं तस्मिन् गर्भं दधामि सर्व भूतानां संभवः ततो भवति.

हे पार्था, माझें गर्भस्थान प्रकृति आहे. मी त्यामध्यें गर्भोत्पादन करतों. सर्व प्राणिमात्रांची उत्पत्ती त्यापासून होते ॥ ३ ॥

**सर्व योनिषु कौंतेय मूर्तयः संभवन्ति याः ।**
**तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ ४ ॥**

**सर्वयोनिषु** = सर्वासु योनिषु ( सर्व प्राणिकोटीमध्यें ) **कौन्तेय** ( कुंतिपुत्रा, अर्जुना ) **मूर्तयः** ( प्राणी, मूर्ती ) **संभवंति** ( उत्पन्न होतात ) **याः** ( ज्या ) **तासां** ( त्यांचा ) **ब्रह्म महत्** ( महत् ब्रह्म ) **योनिः** ( गर्भस्थान ) **अहं** ( मी ) **बीजप्रदः** = बीजं प्रदाति इति ( बीजारोपण करणारा, उत्पत्तिकर्ता ) **पिता** ( बाप ).

कौन्तेय, सर्व योनिषु याः मूर्तयः संभवंति, तासां महत् ब्रह्म योनिः, अहं बीजप्रदः पिता ( अस्मि ).

अर्जुना, सर्व प्राणिकोटीमध्यें ज्या ( स्थावर जंगमात्मक ) मूर्ती उत्पन्न होतात त्या सर्वांचें महत्-ब्रह्म ( महामाया, प्रकृति ) हें जन्मस्थान आहे, आणि तिच्यामध्यें बीजारोपण करणारा पिता मी आहें ॥ ४ ॥

सत्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।
निबध्नंति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ ५ ॥

सत्वं ( सत्व ) रजः ( रज ) तमः ( तम ) इति ( असे ) गुणाः ( गुण ) प्रकृतिसंभवाः = प्रकृते संभवः येषां ते ( आदिमायेपासून उत्पन्न झालेले ) निबध्नंति ( बांधतात ) महाबाहो ( अजानुबाहो, अर्जुना ) देहे ( शरीरामध्यें ) देहिनं ( शरीरस्थ आत्मा, जीवात्मा ) अव्ययं ( अक्षय्य, अविनाशी ).

महाबाहो, सत्वं रजः तमः इति ( ख्याताः ) गुणा प्रकृति संभवाः ( संति ) ते अव्ययं देहिनं देहे निबध्नन्ति.

अर्जुना, सत्व, रज, तम ( ह्या नांवांचे तीन ) गुण 'प्रकृति' म्हणजे आदिमायेपासून उत्पन्न झालेले असून ( ते ) अविनाशी जीवात्म्याला शरीरामध्यें बांधून टाकतात. सारांश सत्व, रज, तम या गुणत्रयीच्या बंधनामुळें जीवात्म्याला बंधनांत पडावें लागतें. शरीर धारण करावें लागतें ॥ ५ ॥

तत्र सत्व निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ।
सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ ॥ ६ ॥

तत्र ( त्या तीन गुणांपैकीं ) सत्त्वं ( सत्वगुण ) निर्मलत्वात् ( शुद्धपणामुळें ) प्रकाशकं ( प्रकाशित करणारा, व्यक्तत्वास आणणारा ) अनामयं ( रोगरहित उपद्रवरहित ) सुखसंगेन = सुखस्य संगेन ( सुखाच्या सहवासानें ) बध्नाति ( बांधतो ) ज्ञानसंगेन = ज्ञानस्य संगेन ( ज्ञानाच्या अभ्यासानें ) च ( आणि ) अनघ ( निष्पापा, अर्जुना ).

हे अनघ, तत्र निर्मलत्वात् प्रकाशकं अनामयं सत्वं, ( देहिनं ) सुखसंगेन च ज्ञानसंगेन च बध्नाति.

हे निष्पाप अर्जुना, या तीन गुणांपैकीं आपल्या निर्मळपणानें ( स्वच्छ तेजानें ) इतर वस्तूंना प्रकाश देणारा व निरुपद्रवी असा जो सत्त्वगुण तो जीवाला ज्ञानाच्या व सुखाच्या संगानें ( मोहानें ) बद्ध करतो ॥ ६ ॥

रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम् ।
तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसंगेन देहिनम् ॥ ७ ॥

रजः ( रजोगुण ) **रागात्मकं** = रागः आत्मा यस्य तत् ( इच्छा ही ज्याचें आदिकरण आहे तें ) **विद्धि** ( जाण ) **तृष्णासंगसमुद्भवम्** = तृष्णा च आसंगः च तयोः समुद्भवहः यस्मात् तत् ( वासना आणि आसक्ति या दोहींचा उगम ज्यापासून तें ) **तत्** ( तें ) **निबध्नाति** ( बांधतो ) **कौन्तेय** ( कुंतिपुत्रा, अर्जुना ) **कर्मसंगेन** = कर्मणः संगेन ( कर्मांच्या आसक्तीनें ) **देहिनम्** ( देह धारण करणारा जीव ).

कौन्तेय रजः रागात्मकं तृष्णासंगसमुद्भवं ( इति ) विद्धि, तत् देहिनं कर्मसंगेन बध्नाति.

हे अर्जुना, रजोगुण हा इच्छात्मक आहे, तो वासना आणि आसक्ति उत्पन्न करणारा आहे, हें ध्यानांत घे; तो जीवाला कर्मे करावयास लावून बद्ध करतो ॥ ७ ॥

तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्व देहिनाम् ।
प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८ ॥

**तमः** ( तमोगुण ) **तु** ( खरोखर ) **अज्ञानजं** = अज्ञानात् जातं ( अज्ञानापासून उत्पन्न झालेला ) **विद्धि** ( समज ) **मोहनं** (भुर [illegible] ळ पाड-णारा ) **सर्वदेहिनाम्** = सर्वेषां देहिनां ( सर्व जीवांना ) **प्रम**[illegible]**दालस्य-निद्राभिः** = प्रमादेन च अलस्येन च निद्रया च ( निष्काळजी[illegible]पणानें, आळसानें व झोपेनें ) **तत्** ( तें ) **निबध्नाति** ( बांधतो ) [illegible] भारत (अर्जुना).

हे भारत तमः तु अज्ञानजं सर्वदेहिनां मोहनं ( इति [illegible] ) विद्धि, तत् प्रमादालस्यनिद्राभिः निबध्नाति.

हे भारता, तमोगुण तर अज्ञानापासून उत्पन्न होऊन सर्व जीवांना मोह पाडतो, तो निष्काळजीपणाना, आळस, निद्रा यांच्या योगानें जीवाला बद्ध करतो ॥ ८ ॥

सत्वं सुखे संजयति रजः क[र्]मणि भारत ।
ज्ञानमावृत्य तु तमः प्रम[ा]द संजयत्युत ॥ ९ ॥

सत्वं ( सत्वगुण ) सुखे ( सुखाचे ठायीं ) संजयति ( आसक्त करतो ) रजः ( रजोगुण ) कर्मणि ( कर्मांमध्यें ) भारत ( अर्जुना ) ज्ञानं ( ज्ञानाला ) आवृत्य ( झांकून ) तु ( खरोखर ) तमः ( तमोगुण ) प्रमादे (गैरसावधपणांत) संजयति ( आसक्त करतो) उत (परंतु)

भारत, सत्वं सुखे ( संजयति ) रजः कर्मणि ( संजयति ) उत तमः तु ज्ञानं आवृत्य प्रमादे संजयति.

पार्था, सत्वगुण सुखाच्या ठिकाणीं आसक्ति उत्पन्न करतो. रजोगुण कर्माला प्रवृत्त करतो, परंतु तमोगुण ज्ञानाला झांकून टाकून अविचारी वर्तन करावयाला लावतो ॥ ९ ॥

**रजस्तमश्चाभिभूय सत्वं भवति भारत ।**
**रजः सत्वं तमश्चैव तमः सत्वं रजस्तथा ॥ १० ॥**

रजः ( रजोगुण ) तमः तमोगुण ) च (आणि) अभिभूय (जिंकून) सत्वं ( सत्वगुण ) भवति ( प्रकट होतो ) भारत ( पार्था ) रजः ( रजोगुण ) सत्वं ( सत्वगुण ) तमः ( तमोगुण ) च ( आणि ) एव ( देखील ) तमः ( तमोगुण ) सत्वं ( सत्वगुण ) रजः ( रजोगुण ) तथा ( तसेंच ).

हे भारत, रजः च तमः अभिभूय सत्वं भवति; सत्वं च तमः अभिभूय रजः ( भवति ) तथा सत्वं रजः अभिभूय तमः एव ( भवति ).

हे पार्था, रज आणि तम या गुणांना जिंकून सत्वगुण प्रकट होतो; सत्व आणि तम या गुणांना जिंकून रजोगुण प्रबल होतो; आणि सत्व व रज या गुणांचा जिंकून तमोगुण आपला अंमल चालवितो ॥ १० ॥

**सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते ।**
**ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्वमित्युत ॥ ११ ॥**

सर्वद्वारेषु = सर्वेषु द्वारेषु ( सर्व द्वारांमध्यें, सर्व इंद्रियांच्या ठिकाणीं ) देहे ( शरीरांत ) अस्मिन् ( यांत ) प्रकाशः ( तेज ) उपजायते ( उत्पन्न होतें ) ज्ञानं ( ज्ञान ) यदा ( जेव्हां ) तदा (तेव्हां) विद्यात्

( समजावें ) विवृद्धं ( वाढलेला ) सत्वं ( सत्वगुण ) इति ( याप्रमाणें ) उत ( खरोखर ).

यदा अस्मिन् देहे सर्व द्वारेषु प्रकाशः ज्ञानं उपजायते, तदा सत्वं विवृद्धं इति उत विद्यात्.

जेव्हां या देहाच्या सर्व द्वारांचे (इंद्रियांचे) ठिकाणीं प्रकाशाचा म्हणजे ज्ञानाचा उदय होतो तेव्हां सत्व गुणाची वाढ होत आहे असें खास समजावें ॥११॥

**लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा ।**
**रजस्येतानि जायंते विवृद्धे भरतर्षभ ॥ १२ ॥**

**लोभः** ( लोभ ) **प्रवृत्तिः** ( संसाराचा खटाटोप ) **आरंभः** ( उपक्रम, उद्योग ) **कर्मणाम्** ( कर्मांचा ) **अशमः** ( अस्थिरपणा, धडपड ) **स्पृहा** ( हावरेपणा ) **रजसि** (रजोगुणवृत्तींत) **एतानि** ( हे ) **जायन्ते** ( उत्पन्न होतात ) **विवृद्धे** ( वाढ झाली असतां ) **भरतर्षभ** ( भरतश्रेष्ठा, अर्जुना ).

भरतर्षभ ! लोभः, प्रवृत्तिः, कर्मणां आरंभः, अशमः स्पृहा एतानि रजसि विवृद्धे ( सति ) जायंते.

हे अर्जुना, रजोगुणाचें प्राबल्य झालें म्हणजे लोभ, संसाराचा खटाटोप, कर्मांचा उपक्रम, मनाची अस्थिरता (धडपड) व हावरेपणा हीं (हे विकार) उत्पन्न होतात ॥ १२ ॥

**अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ।**
**तमस्येतानि जायन्ते विवृद्धे कुरुनंदन ॥ १३ ॥**

**अप्रकाशः** ( अंधकार, अज्ञान ) **अप्रवृतिः** ( कांहीं करूं नये असें वाटणें, आळस, कर्मशून्यता ) **च** ( आणि ) **प्रमादः** ( निष्काळजीपणा ) **मोहः** ( मूढपण, भूरळ ) **एव** ( सुद्धां ) **च** ( आणि ) **तमसि** ( तमोगुणांत ) **एतानि** ( हे ) **जायन्ते** ( उत्पन्न होतात ) **विवृद्धे** ( वाढ झाली असतां ) **कुरुनंदन** ( कुरुपुत्रा, अर्जुना ).

कुरुनंदन, अप्रकाशः च अप्रवृत्तिः, प्रमादः च मोहः एव, एतानि तमसि विवृद्धे जायन्ते.

हे अर्जुना, तमोगुणाची वाढ झाली म्हणजे अज्ञान, आळस, निष्काळजी-पणा व मूढता हीं ( हे विकार ) उत्पन्न होतात ॥ १३ ॥

**यदासत्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत् ।**
**तदोत्तम विदां लोकानमलान्प्रतिपद्यते ॥ १४ ॥**

**यदा** ( जेव्हां ) **सत्वे** ( सत्ववृत्तींत ) **प्रवृद्धे** ( वाढ झाली असतां ) **तु** ( खरोखर ) **प्रलयं** ( मरणाप्रत ) **याति** (जातो, पावतो) **देहभृत्** ( देह धारण करणारा जीव ) **तदा** ( तेव्हां ) **उत्तमविदाम्** = उत्तमं विदंति इति तेषां ( उत्तम प्रकारें जे जाणतात म्हणजे श्रेष्ठ ज्ञानी त्यांच्या ) **लोकान्** (लोकांप्रत) **अमलान्** (निष्कलंक) **प्रतिपद्यते** (पोंचतो, जातो).

यदा तु प्रवृद्धे सत्वे देहभृत् प्रलयं याति, तदा उत्तमविदां अमलान् लोकान् प्रतिपद्यते.

सत्वगुणाची वाढ विशेष झाल्या वेळीं जर देहधारी जीवाला मरण आलें तर तो श्रेष्ठ ज्ञान्यांच्या निष्कलंक लोकांप्रत जातो ॥ १४ ॥

**रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते ।**
**तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥ १५ ॥**

**रजसि** ( राजस वृत्तींत ) **प्रलयं** ( मरणाप्रत ) **गत्वा** ( जाऊन ) **कर्मसंगिषु** = कर्मणि संगः येषां तेषु ( ज्यांची कर्माकडे आसक्ति आहे अशामध्यें ) **जायते** ( जन्मास येतो ) **तथा** ( त्याप्रमाणें ) **प्रलीनः** ( मेलेला ) **तमसि** ( तामस वृत्तींत ) **मूढयोनिषु** = मूढानां योनिषु ( अज्ञानी जनांच्या कोटींत ) **जायते** ( जन्मास येतो ).

रजसि प्रलयं गत्वा ( देहभृत् ) कर्म-संगिषु जायते; तथा तमसि प्रलीनः मूढयोनिषु जायते.

रजो गुणाचें प्राबल्य असतां जर मरण पावला तर तो ज्याची कर्में करण्याकडे आसक्ति आहे अशांमध्यें जन्म पावतो; त्याचप्रमाणें तमोगुणाचें प्राधान्य असतां मरण आलें तर तो अज्ञानी प्राण्यांच्या (पशु, पक्षी यांच्या) जन्मास येतो ॥ १५ ॥

कर्मणः सुकृतस्याहुः सात्विकं निर्मलं फलम् ।
रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम् ॥ १६ ॥

कर्मणः ( कर्माचें ) सुकृतस्य ( पुण्य कर्माचें ) आहुः (म्हणतात) सात्विकं ( सात्विक ) निर्मलं ( शुद्ध, निष्कलंक ) फलं ( फळ ) रजसः ( तमोगुणाचें ) तु ( खरोखर ) फलं ( फळ ) दुःखं ( दुःख ) अज्ञानं ( अज्ञान ) तमसः ( तमोगुणाचें ) फलम् ( फळ ).

सुकृतस्य कर्मणः निर्मलं सात्विकं फलं, रजसः फलं तु दुःखं (च) तमसः फलं अज्ञानं ( इति ) आहुः.

पुण्याकर्माचें शुद्ध सात्विक फळ मिळणें, राजसकर्माचें फळ दुःखदायक असतें आणि तामसकर्माचें फळ अज्ञान हें होय असें ( श्रेष्ठ मुनी ) म्हणतात ॥ १६ ॥

सत्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च ।
प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥ १७ ॥

सत्वात् ( सत्वगुणापासून ) संजायते ( उत्पन्न होतें ) ज्ञानं (ज्ञान) रजसः ( रजोगुणापासून ) लोभः ( लोभ ) एव (देखील) च (आणि) प्रमादमोहौ = प्रमादः च मोहः च ( गैरसावधपणा आणि भुरळ) तमसः ( तमोगुणापासून ) भवतः ( होतात ) अज्ञानं ( अविद्या, मूर्खपणा ) एव (सुद्धां) च ( आणि ).

सत्वात् ज्ञानं संजायते च रजसः लोभः एव, तपसः प्रमादमोहौ भवतः च अज्ञानं ( अपि जायते ).

सत्वगुणापासून ज्ञान उत्पन्न होतें, रजोगुणापासून केवळ लोभ उत्पन्न होतो आणि तमोगुणापासून निष्काळजीपणा, मोह आणि अज्ञान हीं उत्पन्न होतात ॥ १७ ॥

ऊर्ध्वं गच्छंति सत्वस्था मध्ये तिष्ठंति राजसाः ।
जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छंति तामसाः ॥ १८ ॥

उर्ध्वं ( वर ) गच्छंति (जातात) सत्वस्थाः=सत्वे स्थिताः ( सत्वगुणामध्यें स्थिरता पावलेले ) मध्ये ( मध्यें, मनुष्यलोकांत ) तिष्ठंति ( राहतात ) राजसाः ( रजोगुणी लोक ) जघन्यगुणवृत्तिस्थाः = जघन्यस्य गुणस्य वृत्तौ स्थिताः (नीच गुणवृत्तीनें वर्तणारे) अधः ( खालीं ) गच्छंति ( जातात ) तामसाः ( तमोगुणी ).

सत्वस्थाः उर्ध्वं गच्छंति, राजसाः मध्ये तिष्ठंति, जघन्यगुणवृत्तिस्थाः तामसाः अधः गच्छंति.

सात्विक जन वरच्या पायरीला चढतात (देवलोकांत जन्मतात,) राजसी जन मध्यें राहतात ( म्हणजे मनुष्ययोनींत, मृत्युलोकांत जन्मतात ) आणि नीच गुणवृत्तीनें वागणारे तामसी लोक अधोगतीला जातात ( नीच योनींत जन्म घेतात ) ॥ १८ ॥

नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टाऽनुपश्यति ।
गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥ १९ ॥

न ( नाहीं ) अन्यं ( दुसरा ) गुणेभ्यः ( गुणांहून ) कर्तारं ( करणारा ) यदा ( जेव्हां ) द्रष्टा (पहाणारा, ज्ञानी) अनुपश्याति (पाहतो) गुणेभ्यः (गुणांहून ) च ( आणि ) परं ( श्रेष्ठ ) वेत्ति (जाणतो)मद्भावं= मम भावं ( माझ्या स्वरूपाला ) सः ( तो ) अधिगच्छति ( जातो ).

यदा द्रष्टा गुणेभ्यः अन्यं कर्तारं न अनुपश्यति च गुणेभ्यः परं वेत्ति तदा सः मद्भावं अधिगच्छति.

गुणांहून दुसरा कोणी कर्ता नाहीं ( हे गुणच कर्मांचे प्रवर्तक आहेत ) असें जेव्हां विवेकी पुरुषाला दिसून येतें आणि गुणांच्या पलीकडे राहणारा आत्मा याची त्याला ओळख झाली, म्हणजे तो माझ्या स्वरूपाला पावतो १९

गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ।
जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ २० ॥

गुणान् ( गुणांना ) एतान् ( यांना ) अतीत्य ( उल्लंघून ) त्रीन् ( तीन ) देही ( देह ) धारण करणारा ) देहसमुद्भवान् = देहस्थ समु-

द्भव: येभ्य: तात् ( जे देहोत्पत्तीस कारण झाले ते ) जन्ममृत्युजरा-दुःखैः = जन्मनः च मृत्योः च जरायाः च दुःखैः ( जनन, मरण व म्हाता-रपण यांच्या दुःखांपासुन ) विमुक्तः ( मुक्त होऊन, सुटून ) अमृतं ( अमरत्व ) अश्नुते ( भोगतो ).

एतान् देहसमुद्भवान् त्रीन् गुणान् अतीत्य जन्ममृत्युजरादुःखैः विमुक्तः ( सन् ) देही अमृतं अश्नुते.

या देहोत्पत्तीस कारण झालेल्या तीन गुणांना उल्लंघून, जनन, मरण व वार्धक्य यांपासून उद्भवणाऱ्या दुःखांतून मुक्त होऊन देही ( जीव ) अमरत्व भोगतो ॥ २० ॥

अर्जुन उवाच—**कैर्लिंगैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो ।**
**किमाचारः कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते ॥ २१ ॥**

**कैः** ( कोणत्या ) **लिंगैः** (चिन्हांनीं) **त्रीन्** ( तीन ) **गुणान्** (गुणांना) **एतान्** (हे) **अतीतः** ( उल्लंघन केलेला ) **भवति** ( होतो ) **प्रभो** ( हे परमेश्वरा ) **किं** ( कोणता ) **आचारः** ( वर्तन, आचार ) **कथं** (कसें) **च** ( आणि ) **एतान्** ( यांना ) **त्रीन्** ( तीन ) **गुणान्** (गुणांना) **अति-वर्तते** ( ओलांडून जातो ).

प्रभो, एतान् त्रीन् गुणान् कैः लिंगैः अतितः (देही) भवति ? किं आचारः च कथं एतान् त्रीन् गुणान् ( सः ) अतिवर्तते ?

अर्जुन म्हणाला—हे प्रभो, या तीन गुणांना उल्लंघून जाणारांचीं लक्षणें कोणतीं ? ( कोणत्या सामर्थ्यानें विवेकी पुरुष या तीन गुणांला जिंकतो? ) त्याचें आचरण कसें असतें व तो या तीन गुणांचें कसें अतिक्रमण करतो ( तीन गुणांना कसें स्वाधीन करून घेतो ) ? ॥ २१ ॥

**प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव ।**
**न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ॥ २२ ॥**

**प्रकाशं** ( ज्ञान ) **च** ( आणि ) **प्रवृत्तिं** ( कर्में करावयाची तडफड ) **च** ( आणि ) **मोहं** ( भुरळ ) **एव** ( देखील ) **च** ( आणि ) **पांडव** ( पांडुपुत्रा, अर्जुना ) **न द्वेष्टि** ( तिरस्कार करीत नाहीं ) **संप्रवृत्तानि**

( प्राप्त झालीं असतां ) न ( नाहीं ) निवृत्तानि ( न प्राप्त झालीं तरी ) कांक्षति ( इच्छितो ).

हे पांडव, प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहं एव च संप्रवृत्तानि न द्वेष्टि; न निवृत्तानि कांक्षति.

अर्जुना ! ज्ञान, कर्मप्रवृत्ति व अज्ञान ( म्हणजे सत्व, रज आणि तम या गुणांचीं फळें ) प्राप्त झालीं असतां त्यांचा गुणांचा द्वेष (कंटाळा) करीत नाहीं, किंवा न प्राप्त झालीं तरी त्यांची इच्छा (हव्यास ) धरीत नाहीं ।२२।

**उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।**
**गुणा वर्तंत इत्येव योऽवतिष्ठति नेंगते ॥ २३ ॥**

**उदासीनवत्** ( त्रयस्थासारखा ) **आसीनः** ( राहणारा ). **गुणैः** ( गुणांनीं ) **यः** ( जो ) **न विचाल्यते** (डगमगत नाहीं) **गुणाः** (गुण) **वर्तंते** ( आपआपलीं कामें करतात; ) **इति** ( याप्रमाणें ) **एव** (देखील) **यः** ( जो ) **अवतिष्ठति** ( स्वस्थ राहतो ) **न इंगते** ( हालचाल करीत नाहीं ).

उदासीनवत् आसीनः यः गुणैः न विचाल्यते, यः 'गुणाः वर्तंते' इति एव ( मत्वा ) अवतिष्ठति ( च ) न इंगते.

त्रयस्थाप्रमाणें राहून जो ( पुरुष ) गुणांच्या योगानें ( कार्यांनीं, फलांनीं डगमगत नाहीं ( विकार पावत नाहीं); जो हे गुण आपल्या धर्मांप्रमाणें वागतात ( आपापलीं कामें करतात ) असें मानून स्वस्थ राहतो, चळवळ करीत नाहीं ॥ २३ ॥

**समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः ।**
**तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ॥ २४ ॥**

**समदुःखसुखः**=समं दुःखं च सुखं च यस्यै सः ( दुःख व सुख हीं दोन्ही ज्याला सारखींच वाटतात ) **स्वस्थः**=स्वात्मनि स्थितः ( आपल्या आत्मवृत्तींत स्थिर असणारा ) **समलोष्टाश्मकांचनः**=समः लोष्ठः च अश्मा च कांचनं च यस्यै सः ( ज्याला माती, दगड आणि सोनें हीं सारखींच वाटतात तो ) **तुल्यप्रियाप्रियः**=तुल्यः प्रियः च अप्रियः च यस्य

सः (आवडतें व नावडतें यांची किंमत ज्याला सारखीच वाटते तो) धीरः ( निश्चयी, करारी ) तुल्यनिंदात्मसंस्तुतिः=तुल्या निंदा च आत्मनः संस्तुतिः च यस्य सः ( निंदेची व आत्मस्तुतीची किंमत ज्याला सारखीच असते तो ).

यः समदुःखसुखः स्वस्थः समलोष्ठाश्मकांचनः, तुल्यप्रियाप्रियः धीरः तुल्यनिंदात्मसंस्तुतिः.

ज्याला सुखदु:खें सारखींच वाटतात, जो आपल्या ठिकाणींच शांतमनानें स्थिर राहतो, ज्याला माती, दगड व सोनें हीं सारखींच वाटतात, ज्याला आवडतें नावडतें दोन्हीं सारखींच, जो निश्चयी असून आत्मनिंदा व आत्मस्तुति हीं ज्याला सारखींच वाटतात ॥ २४ ॥

**मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ।**
**सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥ २५ ॥**

**मानापमानयोः**=माने च अपमाने च ( मान व अपमान यांत ) तुल्यः ( सारखा ) तुल्यः ( सारखा ) **मित्रारिपक्षयोः**=मित्रस्य च अरेः च पक्षयोः (मित्रपक्षाचा आणि शत्रुपक्षाचा) **सर्वारंभपरित्यागी**= सर्वेषां आरंभाणां परित्यागी ( ज्यानें सर्व सकाम कर्में सोडून दिलीं आहेत असा ) **गुणातीतः**=गुणान् अतीतः ( गुणांना उल्लंघणारा, गुणांच्या पलीकडचा ) **सः** ( तो ) **उच्यते** ( म्हणतात ).

( यः ) मानापमानयोः तुल्यः, मित्रारिपक्षयोः तुल्यः, सर्वारंभपरित्यागी सः गुणातीतः उच्यते.

ज्याला मान व अपमानाची किंमत सारखीच वाटते, जो शत्रूच्या अगर मित्राच्या पक्षाला सारखाच, ज्यानें सर्व सकाम कर्में सोडून दिलीं आहेत, त्याला ' गुणातीत ' म्हणजे जीवन्मुक्त असें म्हणतात ॥ २५ ॥

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।**
**स गुणान्समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते ॥ २६ ॥**

**मां** ( मला ) **च** ( आणि ) **यः** ( जो ) **अव्यभिचारेण** ( अनन्यपणें ) **भक्तियोगेन**=भक्त्याः योगेन ( भक्तियोगानें) **सेवते** ( सेवा करतो ) **सः** ( तो ) **गुणान्** ( गुणांना ) **समतीत्य** (उल्लंघून) **एतान्** ( यांना ) **ब्रह्मभूयाय**=ब्रह्मणः भूयाय ( ब्रह्म व्हावयाला ) **कल्पते** ( योग्य होतो ).

च यः मां अव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते सः एतान् गुणान् समतीत्य ब्रह्मभूयाय कल्पते.

आणि जो माझी अनन्यभावानें भक्तियोगाला[1] अनुसरून सेवा करतो, तो या गुणांपलीकडे जाऊन ( गुणांच्या आधीन न राहतां ) ब्रह्मभूतावस्था पावावयाला पात्र होतो ॥ २६ ॥

---

टीप—१ योग तीन प्रकारचे आहेत तेः—ज्ञानयोग, कर्मयोग व भक्तियोग. भक्तीचे प्रकार नऊ आहेत, ते येणेंप्रमाणें—**श्लोक**—

**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।**
**अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ १ ॥**

नवविधा भक्तींपैकीं कोणीं कोणती भक्ति केली तें खालील श्लोकांत आहे.

**श्रीविष्णोः श्रवणे परिक्षितिरभूद्वैय्यासिकिः कीर्तने ।**
**प्रल्हादःस्मरणे तदंघ्रि भजने लक्ष्मीः पृथुः पूजने ॥**
**अक्रूरस्त्वभिवंदने च हनुमान् दास्ये च सख्येऽर्जुनः ।**
**सर्व स्वात्मनिवेदने बलिरभूत्कैवल्यमेषां पदम् ॥ १ ॥**

भक्ती संश्रवणीं परिक्षितिनृपें केली शुकें कीर्तनीं ।
प्रल्हाद स्मरणीं सुरर्षिहि रमे, राजापृथू अर्चनीं ॥
झाली भक्तिबळें रमा रत सदा ईशांघ्रि–संवाहनीं ।
अक्रूरा रतिवंदनी, कपिमणी दास्यांत भक्ताग्रणी ॥ १ ॥
पार्थे प्रेमळ सख्य–भक्ति करुनी श्रीकृष्ण केला ऋणी ।
तारी कौरव–संगरार्णविं तया तो भक्त–चिंतामणी ॥
लावाया सुपथीं तया, निजरथीं, गीताकथी सारथी ।
भक्ति स्वात्मनिवेदनें बलि करीः द्वारीं उभा श्रीपती ॥

ल. पां. भोसेकर.

ब्रह्मणो हि प्रतिष्ठाऽहममृतस्याव्ययस्य च ।
शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकांतिकस्य च ॥ २७ ॥

ब्रह्मणः ( ब्रह्माचें ) हि ( कारण ) प्रतिष्ठा ( निवासस्थान, जागा ) अहं ( मी ) अमृतस्य ( अविनाशी जें त्याचें ) अव्ययस्य (निर्विकारी) जें त्याचें ) च ( आणि ) शाश्वतस्य ( नित्याचें ) च (आणि) धर्मस्य ( धर्माचें ) सुखस्य ( सुखाचें ) ऐकांतिकस्य ( पूर्णाचें ) च (आणि)

हि अमृतस्य च अव्ययस्य ब्रह्मणः शाश्वतस्य धर्मस्य च एकांतिकस्य सुखस्य अहं प्रतिष्ठा ( अस्मि ).

कारण अविनाशी आणि निर्विकारी ब्रह्माचें, सनातन धर्माचें आणि पूर्ण सुखाचें स्थान मी आहें ॥ २७ ॥

इति श्रीम. भ. सू. गुणत्रय विभागयोगो नाम चतुर्दशोध्यायः

---

# अध्याय पंधरावा.



श्रीभगवानुवाच—ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।
छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥१॥

ऊर्ध्वमूलम्--ऊर्ध्वं मूलं यस्य तं (ज्याचीं मुळें वर आहेत तो) अधः) शाखं=अधः शाखाः यस्य तम् (ज्याच्या फांद्या खालीं आहेत तो-अश्वत्थं (अश्वत्थ = ज्याची शाश्वति नाहीं तो) प्राहुः (म्हणतात) अव्ययं (ज्याचा नाश होत नाहीं असा) छंदांसि (छंद म्हणजे छंदोबद्ध वेद) यस्य (ज्याचीं) पर्णानि (पानें) यः (जो) तं (त्याप्रत) वे. (जाणतो) सः (तो) वेदवित् (वेद जाणणारा अथवा ज्ञानवान्=ज्ञानी

(इमं संसारवृक्षं) अश्वत्थं ऊर्ध्वमूलं, अधःशाखं च अव्ययं प्राहुः, छंदांसि यस्य पर्णानि (संति); यः तं वेद, सः वेदवित्.

भगवान् म्हणतातः—हा अश्वत्थ[१] वृक्ष ऊर्ध्वमूल[२] आहे, म्हणजे या वृक्षाचें मूळ वर आहे, ह्याच्या फांद्या खालीं आहेत; असा हा संसारवृक्ष

---

१ श्वः=उद्यां; श्वत्थः =उद्यांपर्यंत राहील असा; अश्वत्थः = म्हणजे उद्यां-पर्यंत राहील असा विश्वास धरण्यास योग्य नाहीं तो. पिंपळासारखा मोठा विस्तार असून फार काळपर्यंत टिकेल असा दिसणारा म्हणून या संसार-वृक्षाला अश्वत्थ असें म्हटलें आहे.

२ वर याचा अर्थ उंच म्हणजे श्रेष्ठ असा करावयाचा; या नश्वर वृक्षाचें मूळ सर्व श्रेष्ठ म्हणजे ब्रह्म होय.

३ संसारकालीं हा वृक्ष अनादि व अनंत आहे; परंतु ज्ञान झाल्याबरोबर ह्याचा नाश होतो म्हणून क्षणभंगुर आहे; एवढ्याकरितां भगवानांनीं ह्याला अश्वत्थ म्हटलें आहे.

अव्यय म्हणजे नाश न पावणारा आहे असें म्हणतात; ह्याचीं पानें छंदांसि[4] वेद होत; ज्याला या वृक्षाचें ज्ञान उत्तम रीतीनें अवगत झालें तोच खरोखर वेदवेत्ता = ज्ञानी होय. ऊर्ध्वमूल म्हणजे ब्रह्मोत्पन्न, अधःशाख म्हणजे वासना-अहंकारयुक्त, अनादि पण वस्तुतः क्षणभंगूर आणि वेदरक्षित अशा या संसारवृक्षाचें यथार्थ स्वरूप ज्याला समूळ समजलें, तोच वेदवेत्ता म्हणजे ज्ञानी होय. ॥१॥

**अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ॥**
**अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबंधीनि मनुष्यलोके ॥२॥**

**अधः** ( खालीं ) **च** ( आणि ) **ऊर्ध्वं** ( वर ) **प्रसृताः** ( पसरल्या आहेत ) **तस्य** ( त्याच्या ) **शाखाः** ( फांद्या ) **गुणप्रवृद्धाः** = गुणैः प्रवृद्धाः ( गुणांनीं[5] पोषण झालेल्या ) **विषयप्रवालाः** = विषयाः प्रवालाः यासां ताः ( विषय[6] हे ज्याचे कोंब किंवा अंकूर अथवा पालवी ) **अधः** ( खालीं ) **च** ( आणि ) **मूलानि** ( मुळें ) **अनुसंततानि** ( फांद्याला फांद्या फुटून पसरलीं आहेत ) **कर्मानुबंधीनि** = कर्म अनुबन्धः येषां तानि ( कर्म करावयास लावणारीं ) **मनुष्यलोके** ( मनुष्यलोकांत ).

गुणप्रवृद्धाः विषयप्रवालाः तस्य शाखाः अधः च ऊर्ध्वं प्रसृताः ( संति ); च मनुष्यलोके कर्मानुबंधीनि मूलानि अधः अनुसंततानि ( संति )

( सत्व, रज आणि तम या ) गुणानीं पुष्ट झालेल्या, ( रूपरसगंधादि ) विषय हे ज्याचे अंकूर ( पालवी ) अशा या (संसार) वृक्षाच्या शाखा खालीं ( मनुष्य, पशु, वृक्ष, पाषाणादि खनीज कोटीपर्यंत ), वर ( यक्ष, गंधर्व, देव, ब्रह्मदेवापर्यंत ) पसरल्या आहेत; आणि मनुष्यलोकांत कर्म करावयास लावणारीं ( या संसारवृक्षाचीं ) मुळें फांद्याला फांद्या फुटून खालीं पसरलीं

---

४ छादन म्हणजे रक्षण किंवा प्रावरण; वृक्षाचें प्रावरण किंवा रक्षण पानांपासून होतें, तसें या संसारवृक्षाचें रक्षण ऋग्, यजुः आणि साम वेद मंत्र करतात, म्हणून वेद हे याचीं पानें होत.

५ सत्व, रज आणि तम या गुणांनीं.

६ रूपरसगंधादि.

आहेत. वडाच्या झाडाच्या फांद्यास ज्या पारंब्या फुटतात, त्या पुनः खालीं (जमीनींत) जाऊन मुळें होतात (त्याप्रमाणें). ॥२॥

**न रूपमस्येह तथोपलभ्यते नांतो न चादिर्न च संप्रतिष्ठा ।**
**अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसंगशस्त्रेण दृढेन छित्वा ॥ ३ ॥**

**न** (नाहीं) **रूपं** (स्वरूप) **अस्य** (ह्याचें) **इह** (येथें) **तथा** (तसें=वर सांगितल्याप्रमाणें) **उपलभ्यते** (जाणलें जात) **न** (नाहीं) **अंतः** (शेवट) **न** (नाहीं) **च** (आणि) **आदिः** (प्रारंभ) **न** (नाहीं) **च** (आणि) **संप्रतिष्ठा** (स्थिति) **अश्वत्थं** (अश्वत्थ) **एनं** (याला) **सुविरूढमूलं**=सुविरूढानि मूलानि यस्य तम् (ज्यांचीं मुळें चांगलीं पोसलीं आहेत अशास) **असंगशस्त्रेण**=असंग एव शस्त्र तेन (असक्तिरूप, वैराग्य) (शस्त्रानें) **दृढेन** (बळकट) **छित्वा** (तोडून).

तथा अस्य रूपं इह न उपलभ्यते; (अस्य) अंतः न, च आदिः न, च संप्रतिष्ठा न (उपलभ्यते) सुविरूढमूलं एनं अश्वत्थं दृढेन असंगशस्त्रेण छित्वा,

वर सांगितल्याप्रमाणें ह्याचें (या संसारवृक्षाचें) स्वरूप येथें (मनुष्यलोकीं) समजून येत नाहीं; त्याला आदि नाहीं, अंत नाहीं व स्थितिही नाहीं; ज्यांचीं मुळें चांगलीं पोसलेलीं आहेत अशा ह्या अश्वत्थवृक्षाला (संसाराला) बळकट वैराग्यरूप शस्त्रानें तोडून. ॥३॥

**ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन् गता न निवर्तंति भूयः ।**
**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४ ॥**

**ततः** (नंतर) **पदं** (स्थान) **तत्** (तें) **परिमार्गितव्यं** (शोधावें) **यस्मिन्** (ज्यांत) **गताः** (गेलेले) **न** (नाहीं) **निवर्तंति** (परतत) **भूयः** (पुनः) **तम्** (त्याला) **एव** (देखील) **च** (आणि) **आद्यं** (मूळचे) **पुरुषं** (पुरुषाप्रत) **प्रपद्ये** (मी शरण जातों) **यतः** (जेथून) **प्रवृत्तिः** (संसारपरंपरा) **प्रसृता** (पसरली) **पुराणी** (जुनी=अनादि)

ततः यतः पुराणी प्रवृत्तिः प्रसृता तम् एव आद्यं पुरुषं प्रपद्ये (इति संस्मृत्य) यस्मिन् गताः भूयः न निवर्तंति तत् पदं परिमार्गितव्यम्.

नंतर ज्या पदाला गेलेले लोक पुन्हां परत येत नाहींत, तें पद शोधावें. ( तें कसें ? तर ) जेथून ( ज्या निर्विकार ब्रम्हापासून )ही अनादि संसार-परंपरा निघून विस्तार पावली आहे, त्या मूळपुरुषाला ( परमेश्वराला ) " तुला मी सर्व भावानें शरण आहें. " अशा भावनेनें ( शोधावें ). ॥४॥

**निर्मानमोहा जितसंगदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः।**
**द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छंत्यमूढाः पदमव्ययं तत् ॥ ५॥**

**निर्मानमोहाः** = मानः च मोहः च निर्गतौ येभ्यः ते ( ज्यांच्या-पासून अभिमान आणि मोह हे दोन्ही गेले आहेत ते ) **जितसंगदोषाः**= जिताः संगस्य दोषाः यैः ते ( ज्यांनीं असक्तिदोष जिंकले आहेत ) **अध्यात्मनित्याः** ( परमात्म स्वरूपाचे ध्यानांत अक्षयी गढून गेलेले ) **विनिवृत्तकामाः** = विनिवृत्ताः कामाः येषां ते ( ज्यांच्या इच्छा निघून गेल्या आहेत ते ) **द्वंद्वैः** (सुख-दुःख, प्रिय-अप्रिय वगैरे जोड्या यांपासून) **विमुक्ताः** ( सुटलेले = मोकळे झालेले ) **सुखदुःखसंज्ञैः** = सुखं च दुःखं च संज्ञा येषां ते ( सुख-दुःख असें ज्यानां नांव आहे त्यांपासून ) **गच्छंति** ( जातात ) **अमूढाः** ( ज्ञाते ) **पदं** ( पदाला ) **अव्ययं** ( अविनाशी ) **तत्** ( त्या ).

निर्मानमोहाः; जितसंगदोषाः, अध्यात्मनित्याः, विनिवृत्तकामाः, सुखदुः-खसंज्ञैः द्वंद्वैः विमुक्ताः, अमूढाः तत् अव्ययं पदं गच्छान्ति.

ज्यांच्या आंगचे अभिमान् आणि मोह हे गेले आहेत, ज्यांनीं विषया-सक्तीपासून उद्भवणारे दोष जिंकले आहेत, परमात्मस्वरूपाचे ध्यानांत जे अक्षयी गढून गेले आहेत, ज्यांच्या सर्व इच्छा नाहींशा झाल्या आहेत, सुख-दुःख, हर्ष-शोक वगैरे द्वंद्वे यांपासून जे सुटले आहेत, ते ज्ञानी पुरुष त्या अविनाशी पदाला पोंचतात ॥ ५ ॥

**न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ।**
**यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥**

**न** ( नाहीं ) **तत्** ( तें ) **भासयते** ( प्रकाशवितें, उजेडांत आणतें ) **सूर्यः** ( सूर्य ) **न** ( नाहीं ) **शशांकः** ( चंद्र ) **न** ( नाहीं ) **पावकः**

( अग्नि ) यत् ( जेथें ) गत्वा ( गेलें असतां ) न ( नाहीं ) निवर्तंते ( परतत ) तत् ( तें ) धाम ( ठिकाण ) परमं ( अत्युच्च ) मम (माझें).

न सूर्यः न शशांकः ( च ) न पावकः तत् ( पदं ) भासयते; यत् गत्वा न निवर्तंते, तत् मम परमं धाम.

त्या पदाला सूर्य, चंद्र अथवा अग्नि प्रकाशित करीत नाहीं ( त्या पदाला उजेडांत आणण्याकरतां सूर्य, चंद्र अग्नि यांची गरज लागत नाहीं, तें स्वयंप्रकाश आहे ) ज्या या पदाला गेलेले पुरुष परत येत नाहींत, तें माझें अत्युच्च ठिकाण होय. ॥ ६ ॥

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।**
**मनःषष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ ७ ॥**

मम ( माझा ) एव ( च ) अंशः ( भाग, अंश ) जीवलोके = जीवनाम् लोके ( जीवांच्या लोकांत ) जीवभूतः ( जीव होतो ) सनातनः ( पुरातन ) मनःषष्ठानि = मनः षष्ठ येषां तानि ( ज्यांच्यापैकीं मन हें सहावें आहे ) इंद्रियाणि ( इंद्रियें, अवयव ) प्रकृतिस्थानि = प्रकृतौ स्थितानि ( प्रकृतिमध्यें असलेलीं ) कर्षति ( ओढून घेतो ).

जीवलोके मम एव सनातनः जीवभूतः अंशः ( अस्ति; सः ) प्रकृतिस्थानि मनःषष्ठानि इंद्रियाणि कर्षति.

जीवलोकांत ( जीवसृष्टींत ) यच्चावत् जीवमात्र हा माझाच मूळचा अंश आहे व तो अंश प्रकृतींत असणारें मन व पंचज्ञानेंद्रियें यांस आपल्याकडे ओढून घेतो. ॥ ७ ॥

**शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः ।**
**गृहीत्वैतानि संयाति वायुर्गंधानिवाशयात् ॥ ८ ॥**

शरीरं ( शरीर ) यत् ( जें ) अवाप्नोति ( मिळवितो, घेतो ) यत् ( जें ) च ( आणि ) अपि ( सुद्धां ) उत्क्रामति ( सोडून जातो[1]) ईश्वरः ( ईश्वर ) गृहीत्वा ( घेऊन, धरून ) एतानि ( हीं ) संयाति



१ कर्ण, नेत्र, जिव्हा, नासिक, त्वचा आणि मन हीं सहा ज्ञानेंद्रियें होत.

( जातो ) वायुः ( वायु ) गंधान् ( सुवासांस ) इव ( त्याप्रमाणें ) आशयात् ( जाग्यापासून ).

यत् ईश्वरः शरीरं अवाप्नोति च यत् अपि उत्क्रामति; ( तदा ) वायुः आशयात् गंधान् इव एतानि गृहीत्वा संयाति.

ईश्वर ( ईश्वराचा अंश, जीव ) जेव्हां शरीर धारण करतो, आणि जेव्हां त्याचा त्याग करतो, तेव्हां सुद्धां जसा वायू निघाल्या जाग्यापासून ( पुष्पांवगैरेपासून ) तेथील सुवास घेऊन जातो, त्याप्रमाणें तो जीव मन आणि पंचज्ञानेंद्रियें यांस आपल्याबरोबर घेऊन जातो. ॥ ८ ॥

**श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।**
**अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥ ९ ॥**

**श्रोत्रं** ( कान ) **चक्षुः** ( डोळा ) **स्पर्शनं** ( स्पर्शेंद्रिय ) **च** ( आणि ) **रसनं** ( जीभ ) **घ्राणं** ( नाक ) **एव** ( देखील ) **च** ( आणि ) **अधिष्ठाय** ( सत्ता ठेऊन ) **मनः** ( मन ) **च** ( आणि ) **अयं** ( हा ) **विषयान्** ( विषय ) **उपसेवते** ( उपभोग घेतो ).

अयं ( जीवः ) श्रोत्रं, चक्षुः, स्पर्शनं, च रसनं घ्राणं एव च मनः अधिष्ठाय विषयान् उपसेवते.

हा जीव कान, डोळे, त्वचा, जिव्हा व नाक, तसेंच मन यांवर सत्ता ठेऊन विषयांचा उपभोग घेतो. ॥ ९ ॥

**उत्क्रामंतं स्थितं वापि भुंजानं वा गुणान्वितं ।**
**विमूढा नानुपश्यंति पश्यंति ज्ञानचक्षुषः ॥ १० ॥**

**उत्क्रामंतं** ( जातानां ) **स्थितं** ( राहतानां ) **वा** ( अथवा ) **अपि** ( सुद्धां ) **भुंजानं** ( उपभोग घेत असतांना ) **वा** ( अथवा ) **गुणान्वितं** = गुणैः अन्वितं ( गुणांनीं युक्त होऊन ) **विमूढाः** ( अज्ञानी ) **न** ( नाहीं ) **अनुपश्यंति** ( पहात ) **पश्यंति** ( पाहतात ) **ज्ञानचक्षुषः**= ज्ञानं चक्षुः येषां ते ( ज्यांचे ज्ञान हेच डोळे आहेत ते ).

उत्क्रामंतं, स्थितं वा अपि भुंजानं वा गुणान्वितं ( तं ) विमूढाः न अनुपश्यंति; ज्ञानचक्षुषः पश्यंति.

देह सोडून जातानां, देहांत रहात असतानां किंवा गुणांनीं युक्त होऊन उपभोग घेत असतांनां (ईश्वरी अंश जो जीव) तो अज्ञानी जनांस दिसत नाहीं. ज्यांना ज्ञान (हेच डोळे) चक्षु प्राप्त झाले आहेत त्यांना तो दिसतो.॥१०॥

**यतंतो योगिनश्चैनं पश्यंत्यात्मन्यवस्थितम् ।**
**यतंतोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यंत्यचेतसः ॥ ११ ॥**

**यतंतः** ( यत्न करणारे ) **योगिनः** ( योगी ) **च** ( आणि ) **एनं** ( याला ) **पश्यंति** ( पाहतात ) **आत्मनि** ( आत्म्यांत ) **अवस्थितं** ( राहिलेला ); **यतंतः** ( यत्न करणारे ); **अपि** ( सुद्धां ) **अकृतात्मनः**= न कृतः आत्मा यैः ते ( ज्यांनीं आत्मा शुद्ध ( सुसंस्कृत् ) केला नाहीं ते ) **न** ( नाहीं ) **एनं** ( हे ) **पश्यंति** ( पाहतात ) **अचेतसः** = नास्ति चेतो येषां ते ( ज्यांनां विवेक ( विचार ) नाहीं ते = अविवेकी ).

यतंतः योगिनः आत्मनि अवस्थितं एनं पश्यंति; च अचेतसः आकृतात्मानः यतन्तः अपि एनं न पश्यंति.

यत्न करून योगासिद्धि पावलेले योगीलोक यास ( परमात्म्याचे अंशास ) आपल्या आत्म्यांतच राहिलेला आहे असें जाणतात आणि अविवेकी, ज्यांचे मन सुसंस्कृत झालें नाहीं, अशांनां प्रयत्न करूनहां हा परमात्म्याचा अंश दिसत नाहीं. ॥ ११ ॥

**यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।**
**यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥ १२ ॥**

**यत्** ( जें ) **आदित्यगतं** = आदित्यं गतं ( सूर्याप्रत गेलेलें = सुर्यांत असलेलें ) **तेजः** ( प्रकाश ). **जगत्** ( जगाप्रत ) **भासयते** ( प्रकाशवितें ) **अखिलं** ( सर्व ) **यत्** ( जें ) **चंद्रमसि** ( चंद्रांत ) **यत्** ( जें ) **च** ( आणि ) **अग्नौ** ( अग्नीत ) **तत्** ( तें ) **तेजः** ( प्रकाश ) **विद्धि** ( समज ) **मामकम्** ( माझें ).

यत् आदित्यगतं तेजः अखिलं जगत् भासयते, यत् च चंद्रमसि च यत् अग्नौ ( स्थित असते ), तत् मामकं तेजः विद्धि

सूर्यांत असलेलें जें तेज सर्व जगास प्रकाशवितें तें, तसेंच चंद्रांत व अग्नींत असणारें तेज हें सर्व माझें (परमेश्वराचें) आहे असें लक्षांत ठेव.॥१२॥

**गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।**
**पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ॥१३॥**

**गाम्** ( पृथ्वीप्रत, पृथ्वींत ) **आविश्य** ( शिरून ) **च** ( आणि **भूतानि** ( जीवमात्र ) **धारयामि** ( आधार देतों ) **अहं** ( मी ) **ओजसा** ( स्वसामर्थ्यानें ) **पुष्णामि** ( पोषण करतों ) **च** ( आणि ) **औषधीः** ( वनस्पती ) **सर्वाः** ( सर्व ) **सोमः** ( सोम ) **भूत्वा** ( होऊन ) **रसात्मकः** = रसः आत्मा यस्य सः ( ज्याचें अंतर रस आहे तो. )

च अहं गाम् आविश्य ओजसा भूतानि धारयामि; च रसात्मकः सोमः भूत्वा सर्वाः औषधीः पुष्णामि.

आणि पृथ्वीमध्यें प्रवेश करून मी स्वसामर्थ्यानें सर्व भूतमात्रांस आधार देतों; आणि मूर्तिमंत रसच आहे असा जो सोम तो होऊन मी सर्व वनस्पतींस पुष्ट करतों. ॥ १३ ॥

**अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः ।**
**प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥ १४ ॥**

**अहं** ( मी ) **वैश्वानरः** ( उदरांत राहणारा अग्नि ) **भूत्वा** ( होऊन) **प्राणिनां** ( प्राण्यांच्या ) **देहं** ( देह ) **आश्रितः** ( आंत राहून ) **प्राणापानसमायुक्तः** = प्राणेन च अपानेन च समायुक्तः ( प्राण आणि अपान या दोन वायूंशीं संयुक्त होऊन ) **पचामि** ( पचवितों ) **अन्नं** ( अन्न ) **चतुर्विधं** ( चार[1] प्रकारचें ).

अहं वैश्वानरः भूत्वा प्राणिनां देहं आश्रितः प्राणापानसमायुक्तः चतुर्विधं अन्नं पचामि.

---

१ भक्ष्य, ( चर्व्य ) = चावून खाण्याचें, भोज्य ( पेय ) = पिण्याचें, लेह्य = चाटून खाण्याचें, चोष्य = चघळून आंतला रस शोषून घेऊन व चोथा बाहेर टाकून खाण्याचें. ॥ १४ ॥

मी जठराग्नि होऊन प्राण्यांच्या देहांमध्यें आश्रय करून राहतों, आणि प्राण आणि अपान या दोन वायूंशीं संयुक्त होऊन चारीही प्रकारच्या अन्नांचा परिपाक करतों. ॥१४॥

**सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च।**
**वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् ॥१५॥**

**सर्वस्य** ( सर्वांचे ) **च** ( आणि ) **अहं** ( मी ) **हृदि** ( हृदयांत ) **संन्निविष्टः** ( राहिलेलों आहें ) **मत्तः** ( माझ्यापासून ) **स्मृतिः** ( आठवण ) **ज्ञानं** ( ज्ञान ) **अपोहनं** ( अभाव ) **च** ( आणि ) **वेदैः** ( वेदांनीं ) **च** ( आणि ) **सर्वैः** ( सर्वांनीं ) **अहं** ( मी ) **एव** (देखील) **वेद्यः** ( जाणण्याचें ) **वेदान्तकृत्** ( वेदान्ताचा कर्ता ) **वेदवित्** ( वेद जाणणारा ) **एव** ( देखील ) **च** ( आणि ) **अहं** ( मी ).

च अहं सर्वस्य हृदि सन्निविष्टः ( अस्मि ), मत्तः स्मृतिः ज्ञानं अपोहनं च अहं एव सर्वैः वेदैः वेद्यः ( अस्मि ) अहं एव वेदान्तकृत् च वेदवित् ( अस्मि ).

आणखी मी सर्व प्राण्यांच्या हृदयांमध्यें राहिलेलों आहें; स्मरण, ज्ञान आणि त्यांचा अभाव ( विस्मरण आणि अज्ञान ) हीं सर्व मजपासूनच आहेत; सर्व वेदांनीं जाणावयाची वस्तु मी आहें आणि वेदांचा कर्ता व वेद जाणणाराही मीच आहें. ॥ १५ ॥

**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।**
**क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १६ ॥**

**द्वौ** ( दोन ) **इमौ** ( ह्यांत ) **पुरुषौ** ( दोन पुरुष ) **लोके** (लोकांत) **क्षरः** ( नाशवंत ) **च** ( आणि ) **अक्षरः** ( शाश्वत ) **एव** ( देखील ) **च** ( आणि ) **क्षरः** ( नाशवंत ) **सर्वाणि** ( सर्व ) **भूतानि** (भूतमात्र) **कूटस्थः** ( अचल, विकारशून्य राहाणारा ) **अक्षरः** (नाश न पावणारा) **उच्यते** ( म्हणतात ).

लोके क्षरः च अक्षरः एव इमौ द्वौ पुरुषौ ( स्तः ) सर्वाणि भूतानि क्षरः ( उच्यते ) कूटस्थः अक्षरः उच्यते.

या विश्वामध्यें क्षर आणि अक्षर ( नाशवंत आणि शाश्वत ) असे पुरुषांचे दोन वर्ग आहेत; सर्वभूतमात्र ( नाश पावणारे जे ते ) यांस क्षर म्हणतात, आणि अचल विकारशून्य राहणारा आत्मा ( जीव ) यास अक्षर म्हणतात. ॥ १६ )

**उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।**
**यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥ १७ ॥**

**उत्तमः** ( उत्तम ) **पुरुषः** ( पुरुष ) **तु** ( खरोखर ) **अन्यः** ( दुसराच ) **परमात्मा** ( परमात्मा ) **इति** ( याप्रमाणें ) **उदाहृतः** ( म्हणतात ) **यः** ( जो ) **लोकत्रयं** ( तिन्ही लोकांत ) **आविश्य** ( आंत शिरून ) **बिभर्ति** ( उचलून धरतो, आधार होतो ) **अव्ययः** ( नाश पावणारा ) **ईश्वरः** ( ईश्वर ).

उत्तमः पुरुषः तु अन्यः ( अस्ति ) सः परमात्मा इति उदाहृतः यः अव्ययः ईश्वरः लोकत्रयं आविश्य तत् बिभर्ति.

उत्तम पुरुष खरोखर दुसराच आहे. त्याला परमात्मा असें म्हणतात. हा जो अविनाशी ईश्वर तो तीन्हीही लोकांत प्रवेश करून त्यांचें धारण व पोषण करतो. ॥ १७ ॥

**यस्मात्क्षरमतीतोहमक्षरादपि चोत्तमः ।**
**अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १८ ॥**

**यस्मात्** ( ज्या अर्थी ) **क्षरं** ( नाशवंत ) **अतीतः** ( पलीकडे ) **अहं** ( मी ) **अक्षरात्** ( शाश्वतापेक्षां = आत्म्यापेक्षां ) **अपि** ( सुद्धां ) **च** ( आणि ) **उत्तमः** ( उत्तम ) **अतः** ( म्हणून ) **अस्मि** ( मी आहें ) **लोके** ( लोकांत, जगांत ) **वेदे** ( वेदांत ) **च** ( आणि ) **प्रथितः** ( प्रसिद्ध असलेला ) **पुरुषोत्तमः** ( पुरुषोत्तम )

यस्मात् अहं क्षरं अतितः च अक्षरात् अपि उत्तमः अतः अहं लोके च वेदे च पुरुषोत्तमः इति प्रथितः अस्मि.

ज्या अर्थी मी नाशवंत जें क्षर त्याच्या पलीकडला आहें आणि अक्षर जें शाश्वत त्यापेक्षांही उत्तम आहें; म्हणूनच व्यवहारांत ( लोकांत ) आणि वेदांत "पुरुषोत्तम" अशा नावानें प्रसिद्ध आहे.

यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ।
स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥ १९ ॥

यः ( जो ) माम् ( मला ) एवं ( त्याप्रमाणें ) असंमूढः ( मोह-शून्य होऊन ) जानाति ( जाणतो ) पुरुषोत्तमम् ( सर्वांत श्रेष्ठ ) सः ( तो ) सर्ववित् ( सर्व जाणणारा ) भजति ( पूजितो, उपासना करतो ) मां ( मला ) सर्वभावेन = सर्वेण भावेन (पूर्ण श्रद्धेनें) भारत (अर्जुना).

भारत ! यः असंमूढः मां पुरुषोत्तमं एवं जानाति, सः सर्ववित् (भूत्वा) मां सर्व भावेन भजति ।

अर्जुना, जो वासना, अभिमान वगैरे मनोविकारांपासून होणारे मोहास वश न होतां याप्रमाणें मला पुरुषोत्तमत्वानें जाणतो तो, सर्वज्ञ होऊन माझी पूर्ण श्रद्धेनें उपासना करतो. ॥१९॥

इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।
एतद् बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥ २० ॥

इति ( याप्रमाणें ) गुह्यतमं ( अत्यंत गूढ ) शास्त्रं ( शास्त्र ) इदं ( हें ) उक्तं ( सांगितलें ) मया ( म्यां ) अनघ ( हे निष्पापा ) एतत् ( हें ) बुद्ध्वा ( जाणल्यानें ) बुद्धिमान् ( शहाणा ) स्यात् ( होईल ) कृतकृत्यः = कृतं कृत्यं येन सः (करावयाचें तें ज्यानें केलें असा ) भारत ( अर्जुना ).

हे अनघ, इति मया इदं गुह्यतमं शास्त्रं उक्तम्; भारत एतत् बुद्ध्वा (पुरुषः) बुद्धिमान् च कृतकृत्यः स्यात्.

हे निष्पापा, याप्रमाणें हें अत्यंत गूढ असणारें शास्त्र ( व त्याचें रहस्य ) मीं तुला सांगितलें; भरतकुलश्रेष्ठा अर्जुना, हें शास्त्र जाणलें असतां पुरुष बुद्धिमान् (बुद्ध = जाणता, ज्ञानी) होतो व त्यानें जें करावयाचें तें केलें असा होतो ( त्याच्या कर्तव्याची परिसमाप्ति होते ).

इति श्री. म. भ. गीतासू० पुरुषोत्तम योगो नाम
पंचदशोऽध्यायः

# अध्याय सोळावा.



श्रीभगवानुवाच—अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ॥
दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥१॥

अभयं ( भीतिशून्यता, निःसंशयता ) सत्त्वसंशुद्धिः = सत्वस्य संशुद्धिः ( अंतःकरणाची निर्मलता ) ज्ञानयोगव्यवस्थितिः = ज्ञाने च योगे च व्यवस्थितिः ( आत्मवस्तूचा यथार्थ अवगम हें ज्ञान आणि या अवगमाचें ठाई एकाग्रता तो योग यांच्या ठिकाणीं अखंड एकनिष्ठता = ज्ञान आणि योग यांच्या ठिकाणीं अखंड एकनिष्ठता ) दानं ( दान = आपल्या स्वतःच्या अन्नादिकाचा अतिथि वगैरे सत्पात्रीं विभाग करून देणें ) दमः ( इंद्रियदमन = इंद्रियांस विषयांपासून पराङ्मुख करणें ) च ( आणि ) यज्ञः ( अग्निहोत्रादि श्रौत किंवा देवयज्ञादि स्मार्त यज्ञ ) स्वाध्यायः ( वेदपठण ) तपः ( तपश्चर्या ) आर्जवं ( सरळपणा ).

अभयं, सत्वसंशुद्धिः, ज्ञानयोगव्यवस्थितिः, दानं, दमः च, यज्ञः च, स्वाध्यायः, तपः, आर्जवं.

श्रीभगवान् म्हणाले:-अभय, चित्तशुद्धि, ज्ञान आणि योग यांच्या ठिकाणीं एकनिष्ठता, दान, इंद्रियदमन, यज्ञ, वेदपठण, तप, सरळपणा; ॥ १ ॥

अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम् ।
दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ऱ्हीरचापलम् ॥ २ ॥

अहिंसा ( अनुपद्रव ) सत्यं ( सत्य = खरेपणा ) अक्रोधः ( राग न येणें ) त्यागः ( संन्यास ) शांतिः ( शांति = अंतःकरणाचा उपशम = शांतता ) अपैशुनं ( चहाडी न करणें ) दया ( दया ) भूतेषु ( प्राणिमात्रांवर ) अलोलुप्त्वं ( निरभिलाषता ) मार्दवं ( नम्रता ) ऱ्हीः ( लज्जा, मर्यादा ) अचापलं ( स्थिरपणा ).

अहिंसा, सत्यं, अक्रोधः, त्यागः, शांतिः, अपैशुनं, भूतेषु दया, अलोलुप्त्वं, मार्दवं, ऱ्हीः, अचापलं.

अनुपद्रव, खरेपणा, राग न येणें, कर्मफलाची अपेक्षा न करणें, शांति, चहाडी न करणें, प्राणिमात्रांवर दया, निरभिलाषता, नम्रता, मर्यादा, स्थिरपणा, ॥ २ ॥

तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।
भवंति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥

तेजः ( प्रभाव, प्रगल्भता ) क्षमा ( क्षमा ) धृतिः ( धैर्य ) शौचं ( शुद्धता ) अद्रोहः ( दुसऱ्याचा दुष्टावा न करणें ) न ( नाहीं ) अतिमानिता ( अतिमानीपणा ) भवंति (आहेत) संपदं ( संपदेला ) दैवीं ( दैवी ) अभिजातस्य ( जन्मलेल्याचे ) भारत ( हे अर्जुना ).

भारत ! तेजः, क्षमा, धृतिः, शौचम्, अद्रोहः, नातिमानिता, ( इत्येतानि लक्षणानि ) दैवीं संपदं अभिजातस्य ( पुरुषस्य ) भवन्ति.

अर्जुना ! प्रभाव, क्षमा, धैर्य, शुचिर्भूतपणा, दुसऱ्याचा दुष्टावा न करणें आणि मानीपणाचा अभाव हीं लक्षणें दैवी संपत्तींत जन्म झालेल्या पुरुषाच्या ठिकाणीं असतात ॥ ३ ॥

दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ।
अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ ४ ॥

दंभः ( दांभिकपणा, ढोंग ) दर्पः ( गर्व, उन्मत्तपणा ) अभिमानः ( मानीपणा, अभिमान ) च ( आणि ) क्रोधः ( राग, संताप ) पारुष्यं ( कठोरपणा, निष्ठूर बोलणें ) एव ( देखील ) च ( आणि ) अज्ञानं ( अविवेक ) च ( आणि ) अभिजातस्य ( जन्मलेल्याचे ) पार्थ ( हे अर्जुना ) संपदं ( संपत्तीमध्यें ) आसुरीम् ( आसुरी ).

पार्थ ! दंभः, दर्पः, अभिमानः, क्रोधः, पारुष्यं एव च, अज्ञानं च ( एतानि लक्षणानि ) आसुरीं संपदं अभिजातस्य ( पुरुषस्य भवन्ति ).

अर्जुना ! दांभिकपणा, गर्व, अभिमान, संताप, कठोरपणा, आणि अज्ञान हीं लक्षणें आसुरी संपत्तींत उत्पन्न झालेल्या पुरुषाच्या ठिकाणीं असतात ॥ ४ ॥

दैवी संपद्विमोक्षाय निबंधायासुरी मता ।
मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पांडव ॥ ५ ॥

दैवी ( दैवी ) संपत् ( संपत्ति ) विमोक्षाय ( सुटण्याकरतां ) निबंधाय ( बंधनाकरतां ) आसुरी ( आसुरी ) मता ( मानलेली आहे ) मा ( करूं नको ) शुचः ( शोक, दुःख ) संपदं ( संपत्तीत ) दैवीम् ( दैवी ) अभिजातः ( जन्मलेला ) असि ( आहेस ) पांडव ( अर्जुना ).

दैवी संपत् विमोक्षाय आसुरी ( संपत् च ) निबंधाय मता; पांडव (त्वं) दैवी संपदं अभिजातः असि, ( तस्मात् ) मा शुचः.

दैवी संपत्तीपासून मोक्ष आणि आसुरी संपत्तीपासून बंधन हीं प्राप्त होतात असें माझें ( ईश्वराचें ) मत आहे. अर्जुना! तूं दैवी संपत्तींत जन्मला आहेस, तेव्हां तूं शोक करूं नकोस ॥ ५ ॥

द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च ।
दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥ ६ ॥

द्वौ ( दोन ) भूतसर्गौ = भूतानां सर्गौ ( प्राणिमात्रांच्या उत्पत्ति ) लोके ( विश्वामध्यें ) अस्मिन् ( ह्यांत ) दैवः ( दैवी ) आसुरः ( आसुरी ) एव ( देखील ) च ( आणि ) दैवः ( दैवी ) विस्तरशः ( विस्तारानें ) प्रोक्तः ( सांगितलें आहे ) आसुरं ( आसुरी ) पार्थ ( हे पार्थ ) मे ( माझ्यापासून ) शृणु ( ऐकून घे ).

पार्थ ! अस्मिन् लोके दैवः आसुरः च एव द्वौ भूतसर्गौ ( स्तः, तत्र ) दैवः विस्तरशः प्रोक्तः; आसुरं मे शृणु.

पार्था ! या लोकीं प्राण्यांची उत्पत्ति दैवी आणि आसुरी अशी दोन प्रकारची आहे; दैवी उत्पत्ति विस्तारेंकरून सांगितलीच आहे; आतां आसुरी उत्पत्ति सांगतों ती ऐकून घे ॥ ६ ॥

प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।
न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥ ७ ॥

प्रवृत्तिं ( पुढें जाणें, प्रघात ) च ( आणि ) निवृत्तिं ( मागें परतणें, विरक्ति ) च ( आणि ) जनाः ( मनुष्यें ) न ( नाहींत ) विदुः ( जाणत ) आसुराः ( आसुरी प्रकृतीचे ) न ( नाहीं ) शौचं ( शुद्धता, अंतःकरणशुद्धि ) न ( नाहीं ) अपि ( सुद्धां ) च ( आणि ) आचारः ( सदाचार ) न ( नाहीं ) सत्यं ( खरेपणा ) तेषु ( त्यांच्यांत ) विद्यते ( आहे ).

आसुराः जनाः प्रवृत्तिं च निवृत्तिं च न विदुः; तेषु, च न शौचं न आचारः, अपि न सत्यं विद्यते.

आसुरी मनुष्यानां प्रवृत्ति आणि निवृत्ति म्हणजे कर्तव्य–अकर्तव्य कोणतें तें समजत नाहीं; त्यांच्या ठिकाणीं अंतर्बाह्य शुचिर्भूतपणा तसेंच सदाचार व सत्य हीं नसतात ॥ ७ ॥

असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।
अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८ ॥

असत्यं ( खोटें ) अप्रतिष्ठं ( आधारशून्य ) ते ( ते ) जगत् ( जग ) आहुः ( म्हणतात ) अनीश्वरं (ईश्वररहित) अपरस्परसंभूतं= परस्पराभ्यां संभूतं न ( एकापासून दुसरें असें एकमेकांपासून न उत्पन्न झालेलें, कसें तरी एकदम ( आपोआप ) झालेलें ) किं ( काय ) अन्यत् ( दुसरें ) कामहैतुकम् = कामः हेतुः यस्य तत् ( ज्याचा हेतु विषयोपभोगाची इच्छा हाच ).

इदं जगत् असत्यं, अप्रतिष्ठं, अनीश्वरं, अपरस्परसंभूतं, कामहैतुकं (च) ( अस्ति ), अन्यत् किम् ? इति ते आहुः.

“ हें जग लबाड, आधारशून्य, ईश्वररहित, कसें तरी आपोआप उत्पन्न झालेलें आहे आणि त्याला विषयोपभोगाची इच्छा हाच मूळ हेतु आहे, दुसरें काय ? ” असें ते म्हणतात ॥ ८ ॥

एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ।
प्रभवंत्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ॥ ९ ॥

एतां ( हें ) दृष्टिम् ( मत ) अवष्टभ्य (दृढ धरून) नष्टात्मानः= नष्टाः आत्मानः येषां ते ( ज्यांचे आत्मे अज्ञान=समज नाहींसे झाले आहेत

ते = अज्ञानी, असमंजस, दुरात्मे ) अल्पबुद्धयः = अल्पा बुद्धिः येषां ते ( कोत्या बुद्धीचे ) प्रभवंति ( उत्पन्न होतात ) उग्रकर्माणः = उग्राणि कर्माणि येषां ते (घोर कर्मे करणारे) क्षयाय (नाश करण्याकरतां) जगतः ( जगताचा ) अहिताः ( अहित करणारे, शत्रू ).

एतां दृष्टिम् अवष्टभ्य नष्टात्मानः, अल्पबुद्धयः, उग्रकर्माणः अहिताः जगतः क्षयाय प्रभवंति.

हें मत दृढ धरून दुरात्मे, कोत्या बुद्धीचे, घोर कर्म करणारे, अहित करणारे हे लोक जगाचा नाश करण्याकरतां उत्पन्न होतात ॥ ९ ॥

कामसाश्रित्य दुष्पूरं दंभमानमदान्विताः ।
मोहाद्गृहीत्वाऽसद्ग्राहान्प्रवर्तंतेऽशुचिव्रताः ॥ १० ॥

कामं ( इच्छा ) आश्रित्य ( आश्रय धरून ) दुष्पूरं ( अनिवार, कधीं पुरीं न होणारी ) दंभमानमदान्विताः = दम्भेन च मानेन च मदेन च अन्विताः ( ढोंगानें किंवा दांभिकपणानें, गर्वानें आणि उन्मत्तपणानें युक्त असलेले ) मोहात् ( मूढपणानें ) गृहीत्वा ( धरून ) असद्ग्राहान् = असंतः ग्राहान् ( खोट्या आग्रहांस ) प्रवर्तंते ( व्यवहार करतात ) अशुचिव्रताः = अशुचीनि व्रतानि येषां ते ( ज्यांचें आचरण अमंगल असे जे ते ).

दुष्पूरं कामम् आश्रित्य मोहान् असद्ग्राहान् गृहीत्वा अशुचिव्रताः दंभमानमदान्विताः प्रवर्तंते.

कधीं तृप्त न होणाऱ्या वासनांचा आश्रय धरून; ढोंग, गर्व आणि उन्मत्तपणानें युक्त होऊन मूढपणानें खोट्या आग्रहांस धरून ( खोट्या गोष्टींना खऱ्या समजून) हे अमंगल आचरणाचे लोक ह्या जगांत व्यवहार करतात॥१०॥

चिंतामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः ।
कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥ ११ ॥

चिंताम् ( काळजी ) अपरिमेयां ( जिचें मोजमाप करतां येत नाहीं अशी ) च (आणि) प्रलयांताम् = प्रलयः अन्तः यस्याः तां ( मरणापर्यंत जिचा अंत होत नाहीं अशी ) उपाश्रिताः ( आश्रय करून ) कामो-

पभोगपरमाः=कामानां उपभोगः परमं ऐषां ते (आपल्या अनेक इच्छांची तृप्ति करणें हेंच ज्यांचें मुख्य ध्येय ते) एतावत् (इतकेंच, एवढेंच) इति (याप्रमाणें) निश्चिताः (निश्चय झाला आहे).

(ते) अपरिमेयां प्रलयांताम् चिंताम् उपाश्रिताः कामोपभोगपरमाः च एतावत् इति निश्चिताः.

जिचें मोजमाप करतां येत नाहीं आणि मरणापर्यंत जिचा अंत होत नाहीं, अशा चिंतेचा आश्रय करून (खोट्या, क्षणभंगुर गोष्टींच्या अपरिमित व अमरणान्त चिंतेंत मग्न होऊन) आपल्या अनेक इच्छांचीं तृप्ती करणें हाच आपला पुरुषार्थ असा त्यांचा निश्चय झालेला असतो ॥ ११ ॥

आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः ॥
ईहंते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥ १२ ॥

आशापाशशतैः=आशायाः पाशानां शतैः (आशेच्या शेंकडों पाशांनीं) बद्धाः (बांधलेले); कामक्रोधपरायणाः=कामः च क्रोधः च परम् अयनं येषां ते (कामक्रोधाच्या आधीन झालेले) ईहंते (मिळविण्याची इच्छा धरतात) कामभोगार्थं=कामस्य भोगस्य अर्थं (कामयांतिप्रीत्यर्थ, इच्छेप्रमाणें भोग भोगण्याकरतां) अन्यायेन (अन्यायानें) अर्थसंचयान्=अर्थस्य संचयान् (द्रव्याच्या संचयाकरतां).

आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः कामभोगार्थं अन्यायेन अर्थसंचयान् ईहन्ते.

शतशः आशापाशांनीं जे बांधले गेलेले, काम व क्रोध (प्रीति व द्वेष) या मनोविकारांच्या स्वाधीन झालेले हे लोक आपल्या इच्छा तृप्त करण्याकरतां अन्याय-मार्गानें द्रव्यसंचय करण्याची इच्छा धरतात ॥ १२ ॥

इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ॥
इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥ १३ ॥

इदं (हें) अद्य (आज) मया (म्या) लब्धं (मिळविलें) इमं (हें) प्राप्स्ये (मिळवीन) मनोरथं (इच्छित वस्तु) इदं (हें) अस्ति (आहे) इदं (हें) अपि (सुद्धां) मे (माझें) भविष्यति (होईल) पुनः (पुन्हां) धनं (द्रव्य).

अद्य इदम् मया लब्धं, इमं मनोरथं ( श्वः ) प्राप्स्ये, इदं धनं (अधुना) मे अस्ति, ( इदं ) अपि धनम् च पुनः भविष्यति.

हें आज मीं मिळविलें, हा मनोरथ मी साध्य करीन, हे धन मजपाशीं आहे, हें आणखी धन मला मिळेल ॥ १३ ॥

असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ॥
ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥ १४ ॥

**असौ** ( हा ) **मया** (म्यां ) **हतः** ( मारला ) **शत्रुः** ( शत्रु ) **हनिष्ये** ( मी मारीन ) **च** (आणि) **अपरान्** ( दुसरे ) **अपि** ( सुद्धां ) **ईश्वरः** ( स्वामी ) **अहं** ( मी ) **अहं** ( मी ) **भोगी** ( भोक्ता ) **सिद्धः** ( सर्वसंपन्न ) **अहं** ( मी ) **बलवान्** ( बलवान्, बलिष्ठ ) **सुखी** ( सुखी ).

असौ शत्रुः मया हतः, अपरान् च अपि हनिष्ये; अहं ईश्वरः अहं भोगी; अहं सिद्धः, बलवान् सुखी ( च अहं अस्मि ).

हा शत्रु मीं मारला व दुसरे सुद्धां मारीन, मी सर्वांचा स्वामी आहें; भोक्ता मी, सर्वसंपन्न मी, बलवान् व सुखीही मीच आहें ॥१४॥

आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।
यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥१५॥

**आढ्यः** ( संपत्तिवान् ) **अभिजनवान्** ( मोठा कुलीन ) **अस्मि** ( मी आहें ) **कः** ( कोण ) **अन्यः** ( दुसरा ) **अस्ति** ( आहे ) **सदृशः** ( सारखा ) **मया** ( माझ्याशीं ) **यक्ष्ये** ( मी यज्ञ करीन ) **दास्यामि** ( मी दान देईन ) **मोदिष्ये** ( आनंद करीन ) **इति** ( याप्रमाणें ) **अज्ञानविमोहिताः** = अज्ञानेन विमोहिताः ( अज्ञानानें मूढ झालेले ).

आढ्यः, अभिजनवान् अस्मि, मया सदृशः कः अन्यः अस्ति ? अहं यक्षे, दास्यामि, मोदिष्ये, इति ते अज्ञानविमोहिताः ( संतः ).

“ धनाढ्य मी, कुलीन मी, मजसारखा दुसरा कोण आहे ? मी यज्ञ करीन, मी दान देईन, मी आनंद करीन ” असे अज्ञानानें मूढ झालेले लोक ॥१५॥

अनेकचित्तविभ्रांता मोहजालसमावृताः ।
प्रसक्ताः कामभोगेषु पतंति नरकेऽशुचौ ॥ १६ ॥

अनेकचित्तविभ्रांताः = अनेकैः चित्तैः विभ्रांताः ( अनेक विचारांनीं भ्रांतिष्ट झालेले ) मोहजालसमावृताः = मोहस्य जालेन समावृताः ( मोहाच्या जाळ्यांत गुरफटलेले ) प्रसक्ताः ( असक्त असलेले ) कामभोगेषु = कामस्य भोगेषु ( विषय—उपभोगांत ) पतंति ( पडतात ) नरके ( नरकामध्यें ) अशुचौ ( अतिमलीन ).

अनेकचित्तविभ्रांताः, मोहजालसमावृताः, कामभोगेषु प्रसक्ताः, ते अशुचौ नरके पतंति.

अनेक मनोरथांनीं ज्यांचें चित्त भ्रांतिष्ट झालेलें आहे, जे मोहाच्या जाळ्यांत गुरफटून गेलेले आणि विषय—उपभोगांत आसक्त झालेले आहेत, असे पुरुष अमंगल नरकांत पडतात ॥१६॥

आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ।
यजंते नामयज्ञैस्ते दंभेनाविधिपूर्वकम् ॥ १७ ॥

आत्मसंभाविताः = आत्मना संभाविताः ( आपण आपली प्रशंसा करणारे ) स्तब्धाः ( ताठ्यानें वागवणारे ) धनमानमदान्विताः = धनस्य मानेन च मदेन च अन्विताः ( धन, गर्व आणि अभिमान यांनीं उन्मत्त झालेले ) यजंते ( करतात ) नामयज्ञैः ( नांवाचे मात्र यज्ञ ) ते ( ते ) दंभेन ( ढोंगानें ) अविधिपूर्वकम् ( शास्त्राला सोडून ).

आत्मसंभाविताः, स्तब्धाः, धनमानमदान्विताः, ते दंभेन अविधिपूर्वकम् नामयज्ञैः यजंते.

आपणच आपली प्रशंसा करून ताठ्यानें वागणारे, धनाचा गर्व आणि मद यांनीं उन्मत्त होऊन ते लोक शास्त्रविधीला सोडून दांभिकपणानें केवळ नांवाचे यज्ञ करतात ॥१७॥

अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ।
मामात्मपरदेहेषु प्रद्विषंतोऽभ्यसूयकाः ॥ १८ ॥

अहंकारं ( अहंकार, मीपणा ) बलं ( बळ ) दर्पं ( उन्माद, गर्व ) कामं ( काम ) क्रोधं ( राग ) च ( आणि ) संश्रिताः ( आश्रय

करून ) माम् ( मला ) आत्मपरदेहेषु = आत्मनः च परेषां च देहेषु ( आपल्या आणि दुसऱ्यांच्या शरीरांत ) प्रद्विषंतः ( तिरस्कार करीत ) अभ्यसूयकाः ( दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न करणारे ).

अहंकारं, बलं, दर्पं, कामं, क्रोधं च संश्रिताः, आत्मपरदेहेषु ( स्थितं ) मां प्रद्विषंतः, अभ्यसूयकाः च.

मीपणा, बल, गर्व, काम व क्रोध यांचा आश्रय करून त्यांच्या व इतरांच्या शरीरांत राहणारा जो मी त्या माझा ते तिरस्कार करतात, व त्यानां दुसऱ्यांचा उत्कर्ष सहन होत नाहीं ॥ १८॥

तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् ॥
क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥ १९ ॥

तान् ( त्यांना ) अहं ( मी ) द्विषतः ( द्वेष करणारे ) क्रूरान् ( क्रूर लोकांस ) संसारेषु ( संसारांत ) नराधमान् = नरेषु अधमान् ( पुरुषांतील नीच ) क्षिपामि ( मी टाकतों ) अजस्रम् ( नेहमीं ) अशुभान् ( अमंगल ) आसुरीषु ( आसुरींमधील ) एव ( देखील ) योनिषु ( योनींत, कोटींत ).

तान् द्विषतः क्रूरान्, अशुभान् नराधमान् संसारेषु आसुरीषु एव योनिषु अजस्रं अहं क्षिपामि.

त्या द्वेषी, क्रूर, नराधम व अमंगल लोकांस मी नेहमीं संसारांतील राक्षसी योनीमध्यें जन्मास घालतों ॥१९॥

आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ।
मामप्राप्यैव कौंतेय ततो यांत्यधमां गतिम् ॥ २० ॥

आसुरीं ( आसुरी ) योनिम् ( योनी, कोटी ) आपन्नाः ( आंत पडलेले ) मूढाः ( अज्ञानी ) जन्मनि ( जन्मामध्यें ) जन्मनि ( जन्मामध्यें ) मां ( मला ) अप्राप्य ( मिळविल्याशिवाय ) कौंतेय ( कुंतिपुत्रा ) ततः ( तेथून ) यांति ( जातात ) अधमां ( अगदीं खालच्या ) गतिम् ( स्थितीला, गतीला ).

कौंतेय असुरीं योनिं आपन्नाः जन्मनि जन्मनि मूढाः ( संतः ) माम् अप्राप्य एव ततः अधमां गतिं यांति.

हे कुंतिपुत्रा अर्जुना! आसुरी योनींत पडलेले ते पुरुष जन्मोजन्मीं मूढ होऊन माझ्या प्राप्तीचा प्रयत्न करीत नाहींत. त्यामुळें माझी प्राप्ति न होतां ते उत्तरोत्तर अधोगतीला जातात ( नीच स्थितीला पोंचतात ) ॥२०॥

त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।
कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥ २१ ॥

त्रिविधं ( तिहिरी ) नरकस्य ( नरकाची ) इदं ( ह्या ) द्वारं ( मार्ग ) नाशनं ( नाश करणारीं ) आत्मनः ( आत्म्याचा ) कामः ( काम ) क्रोधः ( क्रोध ) तथा ( सुद्धां ) लोभः ( लोभ ) तस्मात् ( म्हणून ) एतत् ( हे ) त्रयं ( तिन्हि ) त्यजेत् ( त्यागावेत ).

कामः, क्रोधः तथा लोभः, इदं त्रिविधं आत्मनः नाशनं नरकस्य द्वारं ( अस्ति ); तस्मात् एतत् त्रयं त्यजेत्.

काम, क्रोध आणि लोभ हीं आत्म्याचा नाश करणारीं ( आत्म्याला अधोगतीला पोंचविणारीं ) नरकाचीं तीन द्वारें आहेत, यास्तव या तिहींचा त्याग करावा. ॥२१॥

एतैर्विमुक्तः कौंतेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ।
आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥ २२ ॥

एतैः ( यांच्यापासून ) विमुक्तः ( सुटलेला ) कौंतेय ( अर्जुना ) तमोद्वारैः ( काळोखाच्या द्वारांतून = अज्ञानमार्गांतून ) त्रिभिः (तिहीं) नरः ( पुरुष ) आचरति ( आचरण करतो ) आत्मनः ( आपलें = आपल्या आत्म्याचें ) श्रेयः ( कल्याण ) ततः ( तेथून ) याति (जातो) परां ( उत्तम ) गतिं ( गति, स्थिति ).

कौंतेय, एतैः त्रिभिः तमोद्वारैः विमुक्तः नरः आत्मनः श्रेयः आचरति, ततः परां गतिं याति.

अर्जुना, नरकाच्या या तिन्ही द्वारांपासून जो पुरुष अलिप्त राहतो, तो आपल्या कल्याणाच्या मार्गाला लागतो; आणि नंतर ( क्रमाक्रमानें ) उत्तमगतीला पोहोंचतो ॥ २२ ॥

यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।

न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ २३ ॥

**यः** ( जो ) **शास्त्रविधिं** = शास्त्राणां विधिं ( शास्त्रांतील नियम, रीत ) **उत्सृज्य** ( सोडून देऊन ) **वर्तते** ( वर्तन करतो ) **कामकारतः** ( इच्छेनें प्रेरित होऊन = वासनेच्या अंकित होऊन ) **न** ( नाहीं ) **सः** (तो) **सिद्धिम्** ( पूर्णता ) **अवाप्नोति** ( मिळवितो ) **न** ( नाहीं ) **सुखं** ( सुख ) **न** ( नाहीं ) **परां** ( उत्तम ) **गतिं** ( गति, स्थिति ).

यः शास्त्रविधिं उत्सृज्य कामकारतः वर्तते, सः न सिद्धिम् न सुखं न च परां गतिं अवाप्नोति.

जो शास्त्रमार्ग सोडून आपल्या इच्छेस येईल तसें वर्तन करतो, त्याला सिद्धि, ( पूर्णता ) सुख आणि उत्तम गति हीं प्राप्त होत नाहींत ॥ २३ ॥

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।**
**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २४ ॥**

**तस्मात्** ( म्हणून ) **शास्त्रं** ( शास्त्र ) **प्रमाणं** ( आधार ) **ते** (तुझें) **कार्याकार्यव्यवस्थितौ** = कार्यस्य अकार्यस्य च व्यवस्थितौ ( कार्य आणि अकार्य = कोणतें कर्म चांगलें व कोणतें कर्म वाईट हें ठरविण्यांत ) **ज्ञात्वा** ( समजून घेऊन ) **शास्त्रविधानोक्तं** = शास्त्रस्य विधानेन उक्तं ( शास्त्र-नियमानें सांगितलेलें ) **कर्म** ( कर्म ) **कर्तुं** ( करणें ) **इह** (येथें) **अर्हसि** ( योग्य आहे ).

तस्मात् कार्याकार्यव्यवस्थितौ ते शास्त्रंप्रमाणं ( अस्ति ) शास्त्रविधानोक्तं कर्म ज्ञात्वा ( तत् त्वं ) इह कर्तुं अर्हसि.

( म्हणून ) याकरतां, काय करावें व काय करूं नये हें ठरविण्यासाठीं तुला शास्त्र हेंच प्रमाण आहे; शास्त्रानें सांगितलेलें कर्म समजून घेऊन तेंच या लोकीं करणें तुला योग्य आहे. ( शास्त्रपूतं समाचरेत् इतिभावः) ॥२४॥

इ. श्रीम. भ. दैवासुरसंपद्विभागायोगोनाम षोडशोऽध्यायः ।

———

# अध्याय सतरावा.

अर्जुन उवाच—ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजंते श्रद्धयाऽन्विताः ।
तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्वमाहो रजस्तमः ॥१॥

ये ( जे ) शास्त्रविधिं ( शास्त्राच्या नियमाला ) उत्सृज्य ( सोडून देऊन ) यजंते ( यज्ञ करतात ) श्रद्धया (श्रद्धेनें, विश्वासानें) अन्विताः ( युक्त होऊन ) तेषां ( त्यांची ) निष्ठा ( निष्ठा, भाव, भक्ति ) तु ( खरोखर ) का ( कशा प्रकारची ) कृष्ण ( हे कृष्णा ) सत्वं (सत्व) आहो ( अथवा ) रजः ( रज ) तमः ( तम ).

हे कृष्ण, श्रद्धया अन्विताः ये शास्त्रविधिं उत्सृज्य यजंते तेषां तु का निष्ठा ? सत्वं आहो रजः तमः ?

अर्जुन म्हणाला—हे कृष्णा ! श्रद्धायुक्त असूनही जे ( अज्ञानामुळें ) शास्त्रनियमांना सोडून देऊन यज्ञयागादिक करतात, त्यांची निष्ठा कोणत्या प्रकारची असते ? ती का सात्विक असते, अथवा राजसी असते, किंवा तामसी असते ? ॥ १ ॥

श्रीभगवानुवाच—त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा ।
सात्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु २

त्रिविधा ( तीन प्रकारची ) भवति ( असते ) श्रद्धा ( श्रद्धा, विश्वास ) देहिनां ( देह धारण करणारांची, मनुष्यांची ) सा ( ती ) स्वभावजा = स्वभाव जाता (आपल्या जन्माबरोबर जन्मास आलेली) सात्विकी ( सात्विक ) राजसी ( राजस ) च ( आणि ) एव ( देखील ) तामसी ( तामस ) च ( आणि ) इति ( याप्रमाणें ) तां ( ती ) शृणु ( ऐक ).

देहिनां त्रिविधा श्रद्धा भवति, सा स्वभावजा, सात्विकी, राजसी च एव तामसी इति तां शृणु.

श्रीभगवान् म्हणाले—मनुष्याची श्रद्धा तीन प्रकारची आहे, ती श्रद्धा त्यांच्या जन्माबरोबरच उत्पन्न होते; सात्विक, राजस आणि तामस असे तिचे तीन प्रकार आहेत, ते सांगतों ऐक ॥ २ ॥

**सत्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ।**
**श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ ३ ॥**

**सत्वानुरूपा** = सत्वस्य अनुरूपा ( सत्वाच्या रूपाप्रमाणें, जन्म-स्वभाव असेल त्याप्रमाणें ) **सर्वस्य** ( सर्वांची ) **श्रद्धा** ( विश्वास ) **भवति** ( होते ) **भारत** ( अर्जुना ) **श्रद्धामयः** (श्रद्धेनें युक्त, श्रद्धाळू) **अयं** ( हा ) **पुरुषः** ( संसारी जीव ) **यः** ( जो ) **यच्छ्रद्धः** = या श्रद्धा यस्य सः ( जशी श्रद्धा ज्याची असेल तो ) **सः** ( तो ) **एव** ( देखील ) **सः** ( तो ).

भारत, सर्वस्य सत्वानुरूपा श्रद्धा भवति अयं पुरुषः श्रद्धामयः, यः यच्छ्रद्धः सः एव सः.

हे अर्जुना, सर्वांची श्रद्धा त्यांच्या त्यांच्या जन्मस्वभावाप्रमाणें असते; कारण मनुष्य हा श्रद्धायुक्त ( श्रद्धाळू ) असतो, व ज्याची जशी श्रद्धा असते त्याप्रमाणेंच तो असतो ॥ ३ ॥

**यजंते सात्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः ।**
**प्रेतान् भूतगणांश्चान्ये यजंते तामसा जनाः ॥ ४ ॥**

**यजंते** ( पूजन करतात, भजतात ) **सात्विकाः** ( सात्विक जन, सत्वगुणी लोक ) **देवान्** ( देवांना ) **यक्षरक्षांसि** = यक्षांसि च रक्षांसि च ( यक्षांना व राक्षसांना ) **राजसाः** ( राजस लोक ) **प्रेतान्** ( प्रेत-गणांना ) **भूतगणान्** ( भूतांच्या समुदायांना ) **च** ( आणि ) **अन्ये** ( दुसरे ) **यजंते** ( आराधना करतात, भजतात ) **तामसाः** ( तमोगुणी) **जनाः** ( लोक ).

सात्विकाः देवान् यजंते ( च ) राजसाः यक्षरक्षांसि ( यजंते ) च अन्ये तामसाः जनाः प्रेतान् ( च ) भूतगणान् यजंते.

सात्विकजन देवांचें पूजन करतात, आणि रजोगुणी लोक यक्षांना व राक्षसांना भजतात, आणि इतर तामसी लोक प्रेतगणांना,[1] भुतांच्या समुदायांना, भजतात ॥ ४ ॥

**अशास्त्रविहितं घोरं तप्यंते ये तपो जनाः ।**
**दंभाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥ ५ ॥**

**अशास्त्रविहितं** = न शास्त्रेण विहितं ( शास्त्रानें न सांगितलेलें, शास्त्र-निषिद्ध ) **घोरं** ( भयंकर ) **तप्यंते** ( तप करतात ) **ये** ( जे ) **तपः** ( तप ) **जनाः** ( लोक ) **दंभाहंकारसंयुक्ताः** = दंभेन च अहंकारेण च संयुक्ताः ( गर्व आणि मीपणा यांनीं युक्त असणारे ) **कामरागबला-न्विताः** = कामस्य च रागस्य च बलेन अन्विताः ( इच्छा आणि आवड यांच्या ओढीनें व्याप्त ).

दंभाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ये जनाः अशास्त्रविहितं घोरं तपः तप्यंते.

दंभ आणि अहंकार यांनीं युक्त, तसेंच इच्छा व आवड यांच्या ओढीनें व्यापलेले जे लोक शास्त्रानें सांगितलेल्या मार्गानें न जातां उग्र तपाचरण करतात, ( संबंध पुढें आहे ).

**कर्षयंतः शरीरस्थं भूतग्राममचेतसः ।**
**मां चैवांतः शरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान् ॥६॥**

**कर्षयंतः** ( त्रासविणारे ) **शरीरस्थं** = शरीरे स्थितं ( शरीरांत असणाराला ) **भूतग्रामं** = भूतानां ग्रामं ( पंचमहा भूतांच्या समुदायाला ) **अचेतसः** ( बुद्धिहीन, असमंजस ) **मां** ( मला ) **च** ( आणि ) **एव** ( देखील ) **अंतःशरीरस्थं** = अंतः शरीरे स्थितं ( अंतर्यामीं वास कर-णाराला ) **तान्** ( त्यांना ) **विद्धि** ( जाण ) **आसुरनिश्चयान्** = आसु-राणां निश्चयः येषां ते ( आसुरी निश्चय ज्यांचा त्यांना ).

---

१. मनुष्य मेल्यानंतर वासना देहांत असतांना पूर्वीचीं कर्में व वासना यांच्या अनुरोधानें भूत, प्रेत, किंवा पिशाच्च या तीन योनींपैकीं एका योनींत असतो. भूत, प्रेत आणि पिशाच्च या वासनादेहांत प्राप्त होणाऱ्या तीन निरनिराळ्या योनी आहेत.

(च) शरीरस्थं भूतग्रामं, अंतःशरीरस्थं मां च एव कर्षयंतः (ये) अचेतसः (संति) तान् आसुरनिश्चयान् विद्धि.

आणि शरीरांत असणाऱ्या पंचमहाभूतांच्या समुदायाला आणि अंतर्यामीं वास करणाऱ्या मला त्रासविणारे असंमजस लोक आसुरी निश्चयाचे (घोर कर्म करणारे) असतात असें समज ॥ ६ ॥

आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः ।
यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥ ७ ॥

आहारः (अन्न, खाण्याचे पदार्थ) तु (खरोखर) अपि (सुद्धां) सर्वस्य (सर्वांचें) त्रिविधः (तीन प्रकारचें) भवति (असतें) प्रियः (आवडीचें) यज्ञः (यज्ञ) तपः (तप) तथा (त्याचप्रमाणें) दानं (दान) तेषां (त्याचा) भेदं (फरक) इमं (हा) शृणु (ऐक).

तु सर्वस्य प्रियः आहारः अपि त्रिविधः भवति, तथा यज्ञः तपः दानं च, तेषां इमं भेदं शृणु.

सर्वांचे आवडीच्या अन्नाचे तीन प्रकार आहेत, त्याप्रमाणें यज्ञ, तप व दान हीं प्रत्येक तीन प्रकारचीं आहेत; त्यांचे भेद कोणते ते ऐक ॥ ७ ॥

आयुःसत्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।
रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्विकप्रियाः ८

आयुःसत्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः = आयुः च सत्वं च बलं च आरोग्यं च सुखं च प्रीतिः च तासाम् विवर्धनाः (आयुष्य, तेज, बळ, आरोग्य, सुख आणि प्रीति यांची वाढ करणारे) रस्याः (सरस) स्निग्धाः (ओषट) स्थिराः (टिकाऊ) हृद्याः (अंतःकरणाला आनंद देणारे) आहाराः (खावयाचे पदार्थ, अन्न) सात्विकप्रियाः सात्विकानां प्रियाः (सात्विक पुरुषांना आवडणारे).

आयुःसत्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः रस्याः स्निग्धाः स्थिराः हृद्याः आहाराः सात्विकप्रियाः (संति).

आयुष्य, तेज, बल, आरोग्य, सुख आणि प्रीति यांची वृद्धि करणारे, रसभरीत, ओषट, टिकाऊ आणि अंतःकरणाला आनंद देणारे असे खाण्याचे पदार्थ सात्विक पुरुषांना आवडतात ॥ ८ ॥

**कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः ॥**
**आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥**

**कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः** = कटुः च अम्लः च लवणः च अत्युष्णः च तीक्ष्णः च रूक्षः च विदाहिनः च ( कडु, आंबट, खारट, अति उष्ण, तिखट, निरस, जळजळ करणारे ) **आहाराः** ( खाण्याचे पदार्थ ) **राजसस्य** ( रजोगुणी पुरुषाला ) **इष्टाः** ( प्रिय ) **दुःखशोकामयप्रदाः** = दुखं च शोकं च आमयं च प्रददति इति ( दुःख, शोक आणि रोग उत्पन्न करणारे ).

दुःखशोकामयप्रदाः कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः आहाराः राजसस्य इष्टाः

दुःख, शोक आणि रोग उत्पन्न करणारे, अति कडु, अति आंबट, अति खारट, अति उष्ण, अति तिखट, निरस, जळजळ उत्पन्न करणारे असे खाण्याचे पदार्थ राजसवृत्तीच्या पुरुषाला आवडतात ॥ ९ ॥

**यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत् ।**
**उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥ १० ॥**

**यातयामं** = यातः यामः यस्य तत् ( ज्याचा वेळ निघून गेला आहे म्हणजे जें अन्न थंड झालें आहे ) **गतरसं** = गतः रसः यस्य तत् ( ज्याचा रस गेला आहे तें, निरस, वाळलेलें ) **पूति** ( कुजलेलें ) **पर्युषितं** ( शिळें ) **च** ( आणि ) **यत्** ( जें ) **उच्छिष्टं** ( उष्टें ) **अपि** ( सुद्धां ) **च** ( आणि ) **अमेध्यं** ( हवनास अयोग्य, अशुद्ध ) **भोजनं** ( अन्न ) **तामसप्रियम्** = तामसानां प्रियं ( तामस वृत्तीच्या लोकांस आवडणारें ).

यत् यातयामं, गतरसं, पूति, पर्युषितं च अपि उच्छिष्टं च अमेध्यं भोजनं ( तत् ) तामसप्रियं ( अस्ति )

थंड झालेलें, वाळून गेलेलें, शिळें, तसेंच उष्टें, अशुद्ध असें अन्न तामसवृत्तीच्या पुरुषाला आवडतें ॥ १० ॥

**अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ।**
**यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ॥ ११ ॥**

**अफलाकांक्षिभिः** = न फलस्य कांक्षिभिः (फलाची आशा न करणारे, निरपेक्ष ) **यज्ञः** ( यज्ञ ) **विधिदृष्टः** = विधौ दृष्टः ( आचारविहित ) **यः** ( जो ) **इज्यते** ( यज्ञ करण्यांत येतो ) **यष्टव्यम्** ( हवन करणें इष्ट आहे ह्मणून ) **एव** ( देखील ) **इति** ( याप्रमाणें ) **मनः** ( मन ) **समाधाय** ( समता राखून ) **सः** ( तो ) **सात्विकः** ( सात्विक ).

यः विधिदृष्टः यज्ञः, यष्टव्यं इति मनः समाधाय अफलाकांक्षिभिः इज्यते सः सात्विकः ( अस्ति ).

' करणें कर्तव्य आहे ' अशी आपल्या मनानी समभावना करून घेऊन निरपेक्ष पुरुषांकडून जो आचारविहित यज्ञ करण्यांत येतो, तो सात्विक यज्ञ होय ॥ ११ ॥

**अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत् ।**
**इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥ १२ ॥**

**अभिसंधाय** ( अपेक्षा करून ) **तु** ( परंतु ) **फलं** (फळ) **दंभार्थं** = दंभस्य अर्थे ( लोकांत दाखविण्याकरतां ) **अपि** ( सुद्धां ) **च** ( आणि ) **एव** ( देखील ) **यत्** ( जें ) **इज्यते** ( हवन करण्यांत येतें ) **भरतश्रेष्ठ** ( भरतश्रेष्ठा अर्जुना ) **तं** ( तो ) **यज्ञं** ( यज्ञ ) **विद्धि** ( जाण ) **राजसम्** ( रजोगुणी ).

तु, भरतश्रेष्ठा ! फलं अभिसंधाय च दंभार्थं एव यत् इज्यते तं यज्ञं राजसं ( इति ) विद्धि.

परंतु हे अर्जुना ! फलाची अपेक्षा करून आणि केवळ लोकांस दाखविण्याकरतां ( आपण धार्मिक आहों अशी आपली कीर्ति व्हावी येवढ्याकरतां ) जें हवन करण्यांत येतें, जो यज्ञ करण्यांत येतो तो राजस यज्ञ असें समज ॥ १२ ॥

**विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणम् ।**
**श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १३ ॥**

**विधिहीनम्** = विधिना हीनं ( शास्त्रोक्त सोडून ) **असृष्टान्नं** = असृष्टं अन्नं यस्मिन् तत् ( ज्यामध्यें अन्नदान मुळींच नाहीं असा ) **मंत्रहीनं**



( मंत्ररहित ) अदाक्षिणं ( दाक्षिणा न देतां ) श्रद्धाविरहितं = श्रद्धया विरहितं ( श्रद्धारहित ) यज्ञं ( यज्ञ ) तामसं ( तामस ) परिचक्षते ( म्हणतात ).

विधिहीनं, असृष्टान्नं, मंत्रहीन, अदक्षिणं, श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते,

शास्त्रानें सांगितलेल्या विधीला सोडून देऊन, कांहीं अन्नदान न करतां, वेदोक्त मंत्र न म्हणतां, दक्षणा न देतां अश्रद्धेनें केलेल्या यज्ञास तमोगुणी यज्ञ म्हणतात ॥ १३ ॥

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।
ब्रम्हचर्यमहिंसा च शारिरं तप उच्यते ॥ १४ ॥

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं = देवानां च द्विजानां च गुरुणां च प्राज्ञानां च पूजनं ( देव, ब्राम्हण, गुरु, आणि ज्ञानी पुरुषांची पूजा करणें ) शौचं ( अंतरबाह्य शुद्ध असणें ) आर्जवम् ( सरळपणा ) ब्रम्हचर्यं ( ब्रम्हचर्यव्रतानें असणें ) अहिंसा ( निरुपद्रवपणा ) च ( आणि ) शारिरं ( देहसंबंधीं, शारिरीक ) तपः ( तप ) उच्यते ( म्हटलें आहे. )

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं, शौचं, आर्जवं, ब्रम्हचर्यं, अहिंसा च शारीरं तपः उच्यते.

देव, ब्राम्हण, गुरु व ज्ञानी पुरुषांची पूजा करणें, अंतर्बाह्य शुद्ध असणें, सरळपणानें वागणें, ब्रम्हचर्यव्रतानें राहणें, आणि दुसऱ्याला उपद्रव न देणें, या सर्वांला शारिरीक तप असें म्हणतात. हें कायिक तप होय ॥ १४ ॥

अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।
स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ १५ ॥

अनुद्वेगकरं = न उद्वेगं करोति इति ( मन उद्विग्न न करणारें, खेद उत्पन्न न करणारें ) वाक्यं ( भाषण ) सत्यं ( खरें ) प्रियहितं = प्रियं च हितं च ( प्रेमळ व हितकर ) च ( आणि ) यत् ( जें ) स्वाध्यायाभ्यसनं = स्वाध्यायस्य अभ्यसनं (पारमार्थिक विषयांचा अभ्यास) च ( आणि ) एव ( खरोखर ) वाङ्मयं ( वाणीच्या संबंधाचें, वाचिक) तपः ( तप ) उच्यते ( म्हटलें आहे ).

यत् अनुद्वेगकरं वाक्यं, सत्यं च प्रियहितं च एव स्वाध्यायाभ्यसनं (तत्) वाङ्मयं तपः उच्यते.

कोणाचेंही मन न दुखविणारें, खरें, प्रेमळ आणि हितकर भाषण आणि तसेंच पारमार्थिक विषयांचा अभ्यास, या सर्वांना 'वाङ्मयं' म्हणजे वाणी-विषयक तप असें म्हणतात. हें वाचिक तप होय ॥ १५ ॥

मनः प्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।
भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ १६ ॥

मनःप्रसादः = मनसः प्रसादः (मनाची प्रसन्नता) सौम्यत्वं (मार्दव, मृदुपणा) मौनं (मूकवृत्ति, वाणीचा निग्रह) आत्मविनिग्रहः (आत्मसंयमन) भावसंशुद्धिः = भावस्य संशुद्धिः (शुद्ध स्वभाव) इति (याप्रमाणें) एतत् (हें) तपः (तप) मानसं (मानसिक) उच्यते (म्हटलें आहे.)

मनः प्रसादः, सौम्यत्वं, मौनं, आत्मविनिग्रहः, भावसंशुद्धिः इति एतत् मानसं तपः उच्यते.

मनाची प्रसन्नता, कोमलता, मौन, आत्मसंयमन आणि शुद्ध भाव हीं मानसिक तपाचीं लक्षणें होत ॥ १६ ॥

श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः ।
अफलाकांक्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥ १७ ॥

श्रद्धया (श्रद्धेनें) परया (श्रेष्ठ) तप्तं (तप केलेलें) तपः (तप) तत् (तें) त्रिविधं (तीन प्रकारचें) नरैः (मनुष्यांनीं) अफलाकांक्षिभिः = न फलस्य अकांक्षिभिः (फलाची अपेक्षा न करणा-

---

टीप १ वामनपंडिताच्या यथार्थदीपिकेंतील या श्लोकावरच्या टीकेंत "हें वाङ्मय तप संसारिक व्यवहारांत कधींही साध्य होणारें नाहीं; परमात्म-विषयक चर्चा, ईश्वरगुणानुवाद-कथा इत्यादि परमार्थविषयक बोलणें व अशा प्रकारचाच अभ्यास करणें हें वाङ्मय तप होय" असें सांगितलें आहे.

रांनीं, निरपेक्ष पुरुषांनीं ) युक्तैः ( योगनिष्ठांनीं ) सात्विकं ( सात्विक ) परिचक्षते ( म्हणतात ).

तत्तपस्त्रिविधम्; अफलाकांक्षिभिः युक्तैः नरैः परया श्रद्धया यतः तप्तं तत् ( तपः ) सात्त्विकं परिचक्षते.

हें ( कायिक, वाचिक, मानसिक ) तप तीन प्रकारचें आहे; निरपेक्ष व योगनिष्ठ पुरुषांनीं उत्तम श्रद्धेनें आचरलेल्या तपाला सात्विक तप असें म्हणतात ॥१७॥

सत्कारमानपूजार्थं तपो दंभेन चैव यत् ।
क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥ १८ ॥

सत्कारमानपूजार्थं = सत्कारः च मानः पूजा च तासां अर्थं ( आदर, मान आणि पूजा यांकरितां ) तपः ( तप ) दंभेन ( दांभिकपणानें ) च ( आणि ) एव ( मात्र ) यत् ( जें ) क्रियते ( करण्यांत येतें ) तत् ( तें ) इह ( या लोकीं ) प्रोक्तं ( म्हटलें आहे ) राजसं ( रजोगुणी ) चलं ( चंचल ) अध्रुवं ( अस्थिर ).

आपला आदरसत्कार व्हावा, मानमरातब वाढावा, मोठे साधू असें समजून लोकांनीं आपली पादप्रक्षालनादिकांनीं पूजा करावी, अशा दांभिक हेतूनें जें तप करण्यांत येतें त्याला राजस तप म्हणतात. तें चंचल, चिरकाल न टिकाणारें असतें ॥ १८ ॥

मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः ।
परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥ १९ ॥

मूढग्राहेण = मूढेन ग्राहेण ( मूढपणाचा ग्रह करून घेऊन ) आत्मनः ( आपल्या आत्म्याचा ) यत् ( जें ) पीडया ( पीडा देऊन ) क्रियते ( करण्यांत येतें ) तपः ( तप ) परस्य ( दुसऱ्याच्या ) उत्सादनार्थं उत्सादनस्य अर्थं ( नाशाकरतां ) वा ( अथवा ) तत् ( तें ) तामसं ( तमोगुणी ) उदाहृतं ( म्हटलें आहे ).

मूढग्राहेण आत्मनः पीडया वा परस्य उत्सादनार्थं यत् क्रियते तत् तामसं तपः उदाहृतं.

आपल्या मनाचा मूर्खपणाचा ग्रह करून घेऊन त्यामुळें आपल्या आत्म्यास त्रास देऊन अथवा दुसऱ्याचा नाश व्हावा म्हणून जें तप आचरण्यांत येतें त्याला तमोगुणी तप असें म्हणतात ॥ १९ ॥

**दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।**
**देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥ २० ॥**

**दातव्यं** ( द्यावयाचें म्हणून ) **इति** ( याप्रमाणें ) **यत्** ( जें ) **दानं** ( दान ) **दीयते** ( देण्यांत येतें ) **अनुपकारिणे** ( आपणावर उपकार न करणाऱ्याला ) **देशे** ( देशांत, ठिकाणीं ) **काले** ( वेळीं ) **च** ( आणि ) **पात्रे** ( योग्य मनुष्याला ) **च** ( आणि ) **तत्** ( तें ) **दानं** ( दान ) **सात्त्विकं** ( सात्विक ) **स्मृतं** ( मानण्यांत येतें ).

दातव्यं इति यत् अनुपकारिणे दानं, देशे, काले, च पात्रे च दीयते तत् दानं सात्विकं स्मृतम्

दान देणें कर्तव्य आहे अशा भावनेनें, आपणावर उपकार न करणाऱ्याला योग्य ठिकाणीं, योग्यकाळीं, योग्य पात्रीं दान देण्यांत येतें सात्विकदान असें समजतात ॥ २० ॥

**यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः ।**
**दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम् ॥ २१ ॥**

**यत्** ( जें ) **तु** ( मात्र ) **प्रत्युपकारार्थं**=प्रत्युपकारस्य अर्थं ( उपकाराची उलट फेड व्हावी याकारितां ) **फलं** ( फल ) **उद्दिश्य** ( अपेक्षा

---

टीप १—वामनपंडितानीं टीकेंत असें विवरण केलें आहे कीं, देश, काल, पात्र हीं तिन्हीं एकसमयावच्छेदानें उत्तम मिळणें सर्वदां शक्य नसतें त्या वेळीं उत्तम देश(तीर्थादि पवित्र स्थळें)उत्तम काळ(अर्धोदय, महोदय संक्रांति अशी पुण्य पर्वणी ) अथवा सत्पात्र ( सद्गुणी वेदशास्त्रसंपन्न, अनाथ भगवद्भक्त असे सत्पात्र जन ) यांपैकीं कोणतेंही एक मिळालें तरी त्या उत्तम काळीं किंवा सत्पात्रीं निरपेक्षबुद्धीनें कर्तव्य म्हणून दिलेलें दान तें सात्विक दान असेंच समजावें. म्हणजे यांपैकीं कोणतेंही एक असलें तरी पुरतें, दुसऱ्याची अशक्यता असल्यास त्याची अवश्यकताच आहे असें नाहीं.

करून ) वा ( अथवा ) पुनः ( पुनः, आणखी एक वेळा ) दीयते ( देण्यांत येतें ) च ( आणि ) परिक्लिष्टं ( कष्टानें ) तत् ( तें ) दानं ( दान ) राजसं ( रजोगुणी ) स्मृतं ( मानण्यांत येतें ).

तु फलं उद्दिश्य च पुनः प्रत्युपकारार्थं वा परिक्लिष्टं यत् दीयते तत् दानं राजसं स्मृतं.

फळाची अपेक्षा करून, उपकाराची फेड व्हावी अशा हेतूनें, अथवा खेदयुक्त अंतःकरणानें ( कुरकुरत ) जें दान देण्यांत येतें तें राजस दान असें समजतात ॥ २१ ॥

अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।
असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

अदेशकाले=न देशे काले च ( अयोग्य ठिकाणीं व अयोग्यकालीं ) यत् ( जें ) दानं ( दान ) अपात्रेभ्यः ( अयोग्य मनुष्यांना ) दीयते ( देण्यांत येतें ) असत्कृतं ( उपमर्द करून, उद्दामपणानें ) अवज्ञातं ( तिरस्कारपूर्वक ) तत् (तें) तामसं (तमोगुणी ) उदाहृतं (म्हणतात.)

अदेशकाले, अपात्रेभ्यः च यत् दानं असत्कृतं अवज्ञातं दीयते तत् ( दानं ) तामसं उदाहृतं

अयोग्य ठिकाणीं, अयोग्य वेळीं, अयोग्य माणसांना जें दान उद्दामपणानें व तिरस्कारपूर्वक देण्यांत येतें त्याला तमोगुणी दान असें म्हणतात ॥ २२ ॥

ओं तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ॥
ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ २३ ॥

ओं, तत्, सत् ( ॐ तत् सत् ) इति ( याप्रमाणें ) निर्देशः ( नांव, नामाभिधान ) ब्रह्मणः ( ब्राह्मणाचें ) त्रिविधः ( तीन प्रकारचें ) स्मृतः ( मानलेलें आहे ) ब्राह्मणाः ( ब्राम्हण ) तेन ( त्यानें ) वेदाः ( वेद ) च ( आणि ) यज्ञाः ( यज्ञ ) च ( आणि ) विहिताः ( निर्माण केले ) पुरा ( पूर्वी, पुरातन काळीं ).

ओं तत् सत्, इति ब्रह्मणः त्रिविधः निर्देशः स्मृतः पुरा तेन ब्राह्मणाः च वेदः च यज्ञाः विहिताः.

ॐ तत् सत्, अशा तीन नांवांनी ब्रह्म संबोधलें जातें. पुरातन कालीं या त्रिप्रकारक ब्रह्मानें ब्राह्मण, वेद व यज्ञ यांना निर्मिलें ॥ २३ ॥

**तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः ।**
**प्रवर्तंते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥ २४ ॥**

**तस्मात्** ( म्हणून ) **ओं** ( ओम् ) **इति** ( असा ) **उदाहृत्य** ( उच्चार करून ) **यज्ञदानतपक्रियाः** = यज्ञस्य च दानस्य च तपसः च क्रियाः ( यज्ञः दान, तप, क्रिया यांचा ) **प्रवर्तंते** ( प्रघात होतो, प्रारंभ होतो ) **विधानोक्तः** = विधानेन उक्ताः ( शास्त्रोक्त पद्धतीनें ) **सततं** ( सर्व काळ ) **ब्रह्मवादिनाम्** ( ब्रह्मवेत्ते लोकांचा )

तस्मात् ओं इति उदाहृत्य ब्रह्मवादिनां यज्ञदानतपःक्रियाः विधानोक्ताः सततं प्रवर्तंते.

ओं असा प्रणवोच्चार करून ब्रह्मवेत्ते लोक आपल्या यज्ञ, दान, तपादिक क्रिया करीत असल्यामुळें त्या सर्वदा शास्त्रोक्त पद्धतीनें होतात२४

**तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपः क्रियाः ।**
**दानक्रियाश्च विविधाः क्रियंते मोक्षकांक्षिभिः ॥ २५ ॥**

**तत्** ( तें ) **इति** ( याप्रमाणें ) **अनभिसंधाय** आकांक्षा न धरतां, संधान न साधतां ) **फलं** ( फल ) **यज्ञतपः क्रियाः** = यज्ञस्य च तपसः क्रियाः ( यज्ञ व तप यांच्या क्रिया ) **दानक्रियाः** ( दानाच्या क्रिया ) **च** ( आणि ) **विविधाः** ( नाना प्रकारच्या ) **क्रियंते** ( करण्यांत येतात ) **मोक्षकांक्षिभिः** = मोक्षस्य कांक्षिभिः ( मोक्षाची इच्छा करणारांनीं, मुमुक्षु लोकांनीं )

'तत्' इति फलं अनभिसंधाय विविधाः यज्ञ तपः क्रियाः च दान क्रियाः मोक्षकांक्षिभिः क्रियंते.

'तत्' असा ब्रह्मनामाचा उच्चार करून, फलाची अपेक्षा न करतां, नाना प्रकारच्या यज्ञ, दान, तपादिक क्रिया मुमुक्षुजन आचरतात ॥ २५ ॥

**सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ।**
**प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥ २६ ॥**

**सद्भावे** ( खरेपणा, अस्तित्व दर्शवितांना ) **साधुभावे** ( चांगुलपणा दर्शवितांना ) **च** ( आणि ) **सत्** ( 'सत' हें ब्रह्म नाम ) **इति** ( याप्रमाणें ) **एतत्** ( हें ) **प्रयुज्यते** ( लावण्यांत येतें) **प्रशस्ते** (मंगळ, स्तुत्य ) **कर्मणि** ( कर्म करतांना ) **तथा** ( तसेंच ) **सत्** ( सत् ) **शब्दः** ( शब्द ) **पार्थ** ( अर्जुना ! ) **युज्यते** ( योजण्यांत येतो).

सद्भावे, साधुभावे च 'सत्' इति एतत् प्रयुज्यते तथा पार्थ ! 'सत्' शब्दः प्रशस्ते कर्मणि युज्यते.

'सत्' हें ब्रह्मनाम खरेपणा आणि चांगुलपणा दर्शवितांना लावण्यांत येतें; तसेंच, हे अर्जुना ! 'सत् हा शब्द सर्व स्तुत्य ( शुभ ) कृत्यांत वापरण्यांत येतो ॥ २६ ॥

**यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ।**
**कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ २७ ॥**

**यज्ञे** ( यज्ञामध्यें ) **तपसि** ( तप आचरतांना ) **दाने** ( दानामध्यें ) **च** ( आणि ) **स्थितिः** ( निष्ठा, स्थिरता ) **सत्** ( सत् ) **इति** ( याप्रमाणें ) **च** ( आणि ) **उच्यते** ( म्हणतात ) **कर्म** ( कर्म ) **च** (आणि) **एव** ( देखील ) **तदर्थीयं** = सः अर्थः यस्य तत् ( तो अर्थ ज्याचा आहे तें; त्या अर्थाचें ) **सत्** ( सत् ) **इति** ( याप्रमाणें ) **एव** ( देखील ) **अभिधीयते** ( नांव आहे, म्हटलें आहे ).

यज्ञे, तपसि, दाने च, स्थितिः, सत् इति उच्यते, च तदर्थीयं कर्म एव, सत् इति एव अभिधीयते.

यज्ञ, दान व तप यांमध्यें वास्तव्य करणारी जी निष्ठा तिला 'सत्' असेंच म्हणतात, आणि त्याकरितां ( परमेश्वराकरितां, अथवा यज्ञ, दान, तपादिकांकरतां ) करावयाचें जें कर्म त्यालाही सत् असें नांव आहे ॥ २७ ॥

अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।
असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥ २८ ॥

अश्रद्धया ( अश्रद्धेनें ) हुतं ( हवन केलेलें, अग्नीला समर्पिलेलें ) दत्तं ( दिलेलें ) तपः ( तप ) तप्तं ( तप केलेलें ) कृतं (केलेलें) च (आणि) यत् ( जें ) असत् ( असत्, खोटें, विनाशी, नश्वर ) इति ( याप्रमाणें ) उच्यते ( म्हणतात ) पार्थ ( हे अर्जुना ) न ( नाहीं ) च ( आणि ) तत् ( तें ) प्रेत्य ( मरणानंतर, प्रेतलोकीं ) नो ( नाहीं ) इह ( येथें, या लोकीं.)

अश्रद्धया हुतं, दत्तं, तपः तप्तं, च यत् कृतं, असत् इति उच्यते; पार्थ, तत् प्रेत्य नो इह च न ( फलाय भवति ).

अश्रद्धेनें जें यज्ञ, दान, तप अथवा कोणतेंहि कर्म करण्यांत येतें त्याला 'असत्' म्हणजे विनाशी असें म्हणतात; हे अर्जुना ! त्या 'असदाचा' या लोकीं अथवा मरणानंतर. प्रेतलोकींहि कांहीं उपयोग होत नाहीं. ॥२८॥

इति श्रीद्भगवद्गीतासू० श्रद्धात्रय विभागयोगो नाम सप्तदशोध्यायः

---

# अध्याय आठरावा.



अर्जुन उवाच–संन्यासस्य महाबाहो तत्वमिच्छामि वेदितुम् ।
त्यागस्य च हृषींकेश पृथक्केशिनिषुदन ॥ १ ॥

संन्यासस्य ( संन्यासाचे ) महाबाहो ( हे अजानुबाहो कृष्णा ) तत्वम् ( यथार्थरूप ) इच्छामि ( मी इच्छितों ) वेदितुं ( जाणण्याला त्यागस्य ( त्यागाचे ) च ( आणि ) हृषीकेश = हृषीकानां ईश ( इंद्रियांचा स्वामी, इंद्रिय निग्रह करणाऱ्या कृष्णा ) पृथक् (निरनिराळें) केशिनिषुदन = केशिनः निषुदन ( केशिनामक राक्षसास मारणाऱ्या, कृष्णा ). महाबाहो, हृषीकेश, केशिनिषुदन ! ( अहं ) संन्यासस्य च त्यागस्य पृथक् तत्वं वेदितुम् इच्छामि.

हे अजानबाहो, हृषीकेशा, केशिदैत्यांतका कृष्णा ! 'संन्यास' आणि 'त्याग' यांचें यथार्थ स्वरूप काय हें निरनिराळें समजावें अशी माझी इच्छा आहे ॥ १ ॥

श्रीभगवानुवाच–काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।
सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥

काम्यानां ( इच्छित फलप्राप्तीचीं ) कर्मणां ( कर्मांचें ) न्यासं ( सोडणें ) संन्यासं ( संन्यास, विसर्जन ) कवयः ( कवी, विद्वान् ) विदुः ( समजतात ) सर्वकर्मफलत्यागं = सर्वेषाम् कर्माणाम् फलस्य त्यागं ( सर्वकर्मांचें फल सोडणें ) प्राहुः ( म्हणतात ) त्यागं ( त्याग ) विचक्षणाः ( ज्ञाते ).

कवयः काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं विदुः; विचक्षणाः च सर्वकर्मफलत्यागं त्यागं प्राहुः.

शाहाणे ( विद्वान ) लोक, इच्छित फलप्राप्तीचीं कर्मे न करणें याला ' संन्यास ' म्हणतात, व ज्ञातेजन सर्व कर्मांच्या फलाचा त्याग करणें याला ' त्याग ' म्हणतात ॥ २ ॥

त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः ।
यज्ञदानतपः कर्म न त्याज्यमिति चापरे ॥ ३ ॥

त्याज्यं ( सोडावीत ) दोषवत् ( ज्यांत दोष आहेत तीं, पापमूलक ) इति ( याप्रमाणें ) एके ( कांहीं ) कर्म ( कर्मे ) प्राहुः ( म्हणतात ) मनीषिणः ( शाहाणे, विद्वान् ) यज्ञदानतपःकर्म ( यज्ञ, दान, तप हीं कर्मे ) न त्याज्यम् ( सोडूं नये ) इति ( याप्रमाणें ) च ( आणि ) अपरे ( दुसरे ).

एके मनीषिणः कर्म दोषवत् ( अस्ति, तस्मात् ) त्याज्यं इति प्राहुः; अपरे च यज्ञदानतपः कर्म न त्याज्यं इति ( आहुः ).

कांहीं विद्वान् लोक म्हणतात कीं, कर्म दोषमूलक आहे, सबब करूं नये; दुसरे म्हणतात कीं, यज्ञ, दान, तप हीं कर्मे सोडूं नयेत ॥ ३ ॥

निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ।
त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥ ४ ॥

निश्चयं ( निर्णय ) शृणु ( ऐक ) मे ( माझा ) तत्र ( तेथें ) त्यागे ( त्यागाच्या संबंधांत ) भरतसत्तम ( भरतकुलश्रेष्ठा ) त्यागः ( त्याग ) हि ( खरोखर ) पुरुषव्याघ्र ( पुरुषश्रेष्ठा ) त्रिविधः ( तीन प्रकारचा ) संप्रकीर्तितः ( सांगितलेला आहे ).

भरतसत्तम, तत्र त्यागे मे निश्चयं शृणु; पुरुषव्याघ्र, त्यागः हि त्रिविधः संप्रकीर्तितः.

हे भरतश्रेष्ठा अर्जुना, या त्यागाच्या संबंधांत माझा निर्णय ऐक; हे पुरुषश्रेष्ठा, त्याग हा तीन प्रकारचा सांगितलेला आहे ॥ ४ ॥

यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।
यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥ ५ ॥

यज्ञदानतपःकर्म ( यज्ञ, दान, तप हीं कर्मे ) न त्याज्यम् ( सोडूं नयेत ) कार्यम् ( करावीत ) एव ( देखील ) तत् ( तें ) यज्ञः

( याग, होम ) दानं ( दान ) तपः ( तप ) च ( आणि ) एव (देखील) पावनानि ( पवित्र करणारीं ) मनीषिणाम् ( शाहाण्यांचीं )

यज्ञः, दानं, तपः कर्म त्याज्यं न, तत् कार्यं एव; यज्ञः दानं तपः च एव मनीषिणाम् पावनानि ( एव संति ).

यज्ञ, दान, तप हीं कर्में करण्याचें सोडूं नये, तीं केलीं पाहिजेत; यज्ञ, दान व तप हीं बुद्धिवानाला पवित्र ( मनाची शुद्धि ) करणारीं आहेत ॥५॥

**एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च ।**
**कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ ६ ॥**

**एतानि** ( हीं ) **अपि** ( सुद्धां ) **तु** ( पण ) **कर्माणि** ( कर्में ) **संगं** ( आसक्ति ) **त्यक्त्वा** ( सोडून देऊन ) **फलानि** ( कर्मापासून प्राप्त परिणाम ते ) **च** ( आणि ) **कर्तव्यानि** ( केलीं पाहिजेत ) **इति** ( याप्रमाणें ) **मे** ( माझें ) **पार्थ** ( अर्जुना ) **निश्चितं** ( ठाम ) **मतं** ( अभिप्राय ) **उत्तमम्** ( उत्तम, श्रेष्ठ ).

अपि तु एतानि कर्माणि संगं फलानि च त्यक्त्वा कर्तव्यानि, इति पार्थ मे निश्चितं उत्तमं मतं ( अस्ति ).

हीं कर्में केलींच पाहिजेत, परंतु त्यांची आसक्ति व त्यांच्या फलाची आशा न धरतां केलीं पाहिजेत, असें पार्था, माझें ( परमेश्वराचें ) ठाम मत आहे; हेंच उत्तम मत होय ॥ ६ ॥

**नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ।**
**मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥**

**नियतस्य** ( नेहमींचीं, नित्याचीं ) **तु** ( खरोखर ) **संन्यासः** (त्याग, सोडून देणें ) **कर्मणः** ( कर्माचा ) **न उपपद्यते** (योग्य नाहीं) **मोहात्** ( मोहाच्या योगानें ) **तस्य** ( त्याचा ) **परित्यागः** ( सोडणें, त्याग ) **तामसः** ( तमोगुणी ) **परिकीर्तितः** ( म्हणतात ).

तु नियतस्य कर्मणः संन्यासः न उपपद्यते; तस्य मोहात् परित्यागः तामसः परिकीर्तितः.

खरोखरी नित्य ( दररोज ) करावयाचीं जीं कर्मे त्यांचा त्याग करणें योग्य नाहीं; अज्ञानानें ( मनाला भ्रांति पडून ) जर तीं करावयाचीं सोडून दिलीं तर त्या त्यागाला ' तामसी त्याग ' म्हणतात ॥ ७ ॥

**दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् ।**
**स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥ ८ ॥**

**दुःखं** ( दुःख ) **इति** ( याप्रमाणें ) **एव** ( केवल ) **यत्** ( जें ) **कर्म** ( कर्म ) **कायक्लेशभयात्** = कायस्य क्लेशस्य भयात् ( शारिर श्रमाच्या भयापासून ) **त्यजेत्** ( सोडतो ) **सः** ( तो ) **कृत्वा** ( करून ) **राजसं** ( रजोगुणी ) **त्यागं** ( त्याग ) **न** ( नाहीं ) **एव** ( देखील ) **त्यागफलं** = त्यागस्य फलं ( त्यागाचें फळ ) **लभेत्** ( मिळवीत ).

कायक्लेशभयात् दुःखं इति एव यत् कर्म त्यजेत् सः राजसं त्यागं कृत्वा त्यागफलं न एव लभेत्.

शरीराला श्रम होऊन दुःख होईल या भयानें जो कर्म करण्याचें सोडून देतो तो रजोगुणापासून उत्पन्न झालेल्या वृत्तीमुळें ' त्याग ' करतो, त्या त्यागाचें फळ ( चित्तशुद्धि ) त्याला मिळत नाहीं ॥ ८ ॥

**कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ।**
**संगं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्विको मतः ॥ ९ ॥**

**कार्यं** ( केलें पाहिजे असे ) **इति** ( असें ) **एव** ( केवळ ) **यत्** (जें) **कर्म** ( कर्म ) **नियतं** ( नेहमींचें, नेमून दिलेलें ) **क्रियते** ( केलें जातें ) **अर्जुन** ( अर्जुना ) **संगं** ( आसक्ति ) **त्यक्त्वा** ( सोडून देऊन ) **फलं** ( फल ) **च** ( आणि ) **एव** ( देखील ) **सः** ( तो ) **त्यागः** ( त्याग ) **सात्विकः** ( सत्वगुणी ) **मतः** ( समजला आहे ).

अर्जुन, कार्यं इति एव यत् नियतं, कर्म संगं फलं च एव त्यक्त्वा क्रियते, स त्यागः सात्विकः मतः.

अर्जुना, नेहमींचें केलेंच पाहिजे असें जें कर्म तें आसक्ति व फलाशा सोडून केलें म्हणजे तो ' त्याग ' सत्वगुणी समजला जातो ॥ ९ ॥

**न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ।**

**त्यागी सत्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥ १० ॥**

न ( नाहीं ) द्वेष्टि ( तिरस्कार करीत ) अकुशलं (असुखी, अमंगल) कर्म ( कर्म ) कुशले ( मंगल, कल्याणकारक अशा कर्माविषयीं ) न अनुषज्जते ( आसक्त होत नाहीं ) त्यागी ( 'त्याग' करणारा ) सत्वसमाविष्टः ( सत्वगुणपूर्ण ) मेधावी (बुद्धिमान् ) छिन्नसंशयः= छिन्नः संशयः यस्य सः ( ज्याची शंका नाहींशी झाली तो ).

( यः ) अकुशलं कर्म न द्वेष्टि, कुशले न अनुषज्जते, ( सः ) त्यागी सत्वसमाविष्टः मेधावी छिन्नसंशयः.

जो वाईट कर्माचा तिरस्कार करीत नाहीं. चांगले कर्मांत आसक्त होत नाहीं, तो 'त्यागी' सत्वगुणानें पूर्ण, बुद्धिमान् आणि संशयरहित असतो ॥ १० ॥

न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ।
यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥ ११ ॥

न ( नाहीं ) हि ( खरोखर ) देहभृता ( देह धारण करणारानें ) शक्यं ( शक्य ) त्यक्तुं ( सोडणें ) कर्माणि ( कर्में ) अशेषतः ( सर्व, एकूणएक ) यः ( जो ) तु ( खरोखर ) कर्मफलत्यागी = कर्मणः फलस्य त्यागी ( कर्माच्या फलाचा त्याग करणारा ) सः ( तो ) त्यागी ( 'त्यागी' ) इति ( असें ) अभिधीयते ( म्हटला जातो ).

हि, देहभृता कर्माणि अशेषतः त्यक्तुं न शक्यं, यः तु कर्मफलत्यागी, सः त्यागी इति अभिधीयते.

देहधारी पुरुषाला निखालस सर्व कर्में सोडणें शक्यच नाहीं; जो कर्मफलाचा त्याग करतो त्यालाच 'त्यागी' असें म्हणतात ॥ ११ ॥

अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ।
भवत्यत्यागिनां प्रेत्य न संन्यासिनां क्वचित् ॥ १२ ॥

अनिष्टं ( आवडीचें नव्हे असें ) इष्टं ( आवडीचें ) मिश्रं ( आवडनावडीचें मिसळलेलें ) च ( आणि ) त्रिविधं ( तीन प्रकारचें ) कर्मणः ( कर्माचें ) फलं ( फल ) भवति ( आहे ) अत्यागिनां ( त्याग न करणारांचें ) प्रेत्य ( मरणानंतर ) न ( नाहीं ) तु ( खरोखर ) संन्यासिनां ( संन्यास्यांचें ) क्वचित् ( कोठेंही ).

प्रेत्य अनिष्टं, इष्टं, मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलं अत्यागिनां भवति; संन्यासिनां तु क्वचित् न ( भवति ).

जो कर्म-फलाचा त्याग करीत नाहीं त्याला मरणानंतर त्यानें केलेल्या कर्मांचें फल तीन तऱ्हेचें म्हणजे दुःखद, सुखकारक आणि सुखदुःख-मिश्रित असें प्राप्त होतें. संन्यासी यांना कोठेंही कर्मांचें फळ भोगावें लागत नाहीं ॥ १२ ॥

**पंचैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ।**
**सांख्ये कृतांते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥ १३ ॥**

**पंच** ( पांच ) **एतानि** ( हीं ) **महाबाहो** ( अजानुबाहो अर्जुना ) **कारणानि** ( कारणें ) **निबोध** ( समजून घे ) **मे** ( माझ्याकडून ) **सांख्ये** ( सांख्यशास्त्रांत, वेदांतशास्त्रांत ) **कृतांते** = कृतस्य अंतः यत्र तस्मिन् (कर्मांचा जेथें शेवट त्याठिकाणीं) **प्रोक्तानि** ( सांगितले आहेत ) **सिद्धये** ( सिद्धीकरतां ) **सर्वकर्मणाम्** = सर्वेषाम् कर्मणाम् ( सर्व कर्मांचे ).

महाबाहो, सर्व कर्मणां सिद्धये सांख्ये कृतान्ते प्रोक्तानि एतानि पंच कारणानि मे निबोध.

अजानुबाहो अर्जुना, सर्व कर्मांच्या सिद्धीकरतां सांख्यांच्या सिद्धांतांत हीं पांच कारणें सांगितलीं आहेत, तीं तूं मजपासून समजून घे ॥ १३ ॥

**अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।**
**विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ॥ १४ ॥**

**अधिष्ठानं** ( आश्रयस्थान, शरीर ) **तथा** ( तसाच ) **कर्ता** ( करणारा, जीव ) **करणं** ( कर्म करण्याचीं साधनें, इंद्रियें ) **च** ( आणि ) **पृथग्विधम्** (वेगळालीं) **विविधाः** ( अनेक प्रकारचीं ) **च** ( आणि ) **पृथक्** ( निरनिराळ्या ) **चेष्टाः** ( चलनक्रिया ) **दैवं** ( देवता ) **च** ( आणि ) **एव** ( देखील ) **अत्र** ( येथें ) **पंचमम्** ( पांचव्या ).

अधिष्ठानं तथा कर्ता पृथग्विधं करणं च विविधाः पृथक्चेष्टाः, अत्र दैवं पंचमं एव ( भवति ).

जागा ( शरीर ) कर्ता ( जीव ) निरनिराळीं साधणें ( इंद्रियें ) अनेक निरनिराळ्या क्रिया आणि पांचवें दैव ( देवता ) ॥ १४ ॥

**शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ।**
**न्याय्यं वा विपरीतं वा पंचैते तस्य हेतवः ॥ १५ ॥**

**शरीरवाङ्मनोभिः** = शरीरेण च वाचा च मनसा च (शरीरानें, वाणीनें आणि मनानें ) **यत्** ( जें ) **कर्म** ( कर्म ) **प्रारभते** (आरंभतो, करतो) **नरः** ( पुरुष ) **न्याय्यं** ( नीतीला अनुसरून ) **वा** ( अथवा ) **विपरीतं** ( उलट ) **वा** ( किंवा ) **पंच** ( पांच ) **एते** ( हीं ) **तस्य** ( त्याचीं ) **हेतवः** ( करणें ).

नरः शरीरवाङ्मनोभिः न्याय्यं वा विपरीतं वा यत् कर्म प्रारभते, तस्य एते पंच हेतवः ( संति ).

मनुष्य जें बरें वाईट कर्म शरीर, वाणी आणि मन यांच्या सहायानें करतो त्याला हीं पांच कारणें असतात ॥ १५ ॥

**तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।**
**पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १६ ॥**

**तत्र** ( तेथें ) **एवं** ( याप्रमाणें ) **सति** ( असण्यांत ) **कर्तारं** ( करणारा ) **आत्मानं** ( आत्मा ) **केवलं** ( एकटा ) **तु** ( खरोखर ) **यः** ( जो ) **पश्यति** ( पहातो ) **अकृतबुद्धित्वात्** = न कृता बुद्धिः येन तस्य भावात् ( बुद्धीच्या प्रगल्भतेच्या अभावापासून, बुद्धीस संस्कार नसल्यामुळें ) **न** ( नाहीं ) **सः** ( तो ) **पश्यति** ( पहातो ) **दुर्मतिः** ( दुष्ट बुद्धीचा ).

तत्र एवं सति यः तु केवलं आत्मानं कर्तारं अकृतबुद्धित्वात् पश्यति सः दुर्मतिः न पश्यति.

अशी स्थिति असूनही बुद्धीचा विकास झाला नसल्यामुळें जो मीच काय तो एकटा कर्ता आहें असें समजतो, त्या दुर्बुद्धीच्या पुरुषाला कांहीं समज ( ज्ञान ) नाहीं असें समजावें ॥ १६ ॥

**यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।**



**हत्वापि स इमांल्लोकान्न हंति न निबध्यते ॥ १७ ॥**

यस्य ( ज्याचा ) न ( नाहीं ) अहंकृतः ( मीपणा, अभिमान ) भावः ( कल्पना ) बुद्धिः ( बुद्धि ) यस्य ( ज्याची ) न लिप्यते ( विकार पावत नाहींत ) हत्वा ( वध करून ) अपि ( सुद्धां ) सः (तो) इमान् ( हे ) लोकान् ( लोक ) न हंति ( वध करीत नाहीं ) न निबध्यते ( बांधला जात नाहीं ).

यस्य अहंकृतः भावः न, यस्य बुद्धिः न लिप्यते, सः इमान् लोकान् हत्वा अपि न हंति न निबध्यते.

ज्याच्या ठिकाणीं अहंपणा मुळींच नसतो व ज्याची बुद्धि निर्लेप म्हणजे शुद्ध असते ( निर्विकार असते ) त्यानें ह्या लोकांचा वध केला तरी त्यानें तें कर्म केलें नाहीं असेंच समजावयाचें; आणि त्या कर्माबद्दल तो बांधला जात नाहीं, म्हणजे त्या कर्माबद्दल त्याला कांहीं भोगावें लागत नाहीं ।१७।

ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ।
करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥

ज्ञानं ( ज्ञान ) ज्ञेयं ( जाणावयाचें तें ) परिज्ञाता ( जाणणारा त्रिविधा ( तीन प्रकारांनीं , कर्मचोदनाः कर्मणां चोदना ( कर्मांची प्रवृत्ति, कर्म करण्याला उत्तेजन ) करणं ( कर्म करण्याचें साधन ) कर्म ( कर्म ) कर्ता ( करणारा ) इति ( असा ) त्रिविधः (तीन प्रकारांनीं) कर्मसंग्रहः ( कर्मांचा संचय. )

ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता ( इति ) त्रिविधा कर्मचोदना ( अस्ति ); करणं कर्म कर्ता इति त्रिविधः कर्मसंग्रहः ( अस्ति ).

ज्ञान, जाणावयाची वस्तु आणि जाणणारा हीं तीन कर्म करावयाला लावणारीं आहेत; कर्म करण्याचें साधन ( इंद्रियें ), कर्म आणि कर्म करणारा हीं तीन कर्मांचा संचय करणारीं आहेत ॥ १८ ॥

ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ।
प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥ १९ ॥

ज्ञानं ( ज्ञान ) कर्म ( कर्म ) च ( आणि ) कर्ता ( करणारा ) च ( आणि ) त्रिधा ( तीन प्रकारचीं ) एव ( केवळ ) गुणभेदतः

गुणानाम् भेदतः ( गुणांच्या भेदापासून ) प्रोच्यंते ( म्हटलें आहे ) गुणसंख्याने = गुणानाम् संख्याने ( गुणांची मोजणी करण्याचे शास्त्रांत ) यथावत् ( त्याप्रमाणें ) शृणु ( ऐक ) तानि ( तीं ) अपि ( सुद्धां ).

गुणभेदतः ज्ञानं कर्म च, कर्ता च, त्रिधा एव गुणसंख्याने प्रोच्यंते; तानि अपि यथावत् शृणु.

सांख्यशास्त्रांत ज्ञान, कर्म आणि कर्ता हीं प्रत्येक गुणभेदानें तीन तीन प्रकारचीं होतात असें सांगितलें आहे. त्यांचें यथार्थ स्वरूप सांगतों तेंही ऐक ॥ १९ ॥

**सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।**
**अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्विकम् ॥ २० ॥**

सर्वभूतेषु ( सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं ) येन ( ज्यानें ) एकं (एक) भावं ( अस्तित्व ) अव्ययं ( अविनाशी ) ईक्षते ( पाहतो ) अविभक्तं ( निरनिराळा नाहीं असें ) विभक्तेषु ( निरनिराळयांमध्यें ) तत् ( तें ) ज्ञानं ( ज्ञान ) विद्धि ( समज ) सात्विकं ( सत्वगुणी ).

येन विभक्तेषु सर्वभूतेषु अविभक्तं एकं अव्ययं भावं ईक्षते, तत् ज्ञानं सात्विकं विद्धि.

ज्या ज्ञानानें वेगळाल्या सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं एकच अविनाशी अस्तित्व आहे असें ( जीवाला ) दिसतें, तें ज्ञान सत्वगुणी असें तूं समज ॥ २० ॥

**पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् ।**
**वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥ २१ ॥**

पृथक्त्वेन ( वेगळेपणानें ) तु ( खरोखर ) यत् ( जें ) ज्ञानं ( ज्ञान ) नाना ( निरनिराळया ) भावान् ( अस्तित्वें ) पृथग्विधान् ( वेगवेगळया जातीचे ) वेत्ति ( जाणतें ) सर्वेषु ( सर्वांत ) भूतेषु ( भूतमात्रांच्या ठिकाणीं ) तत् ( तें ) ज्ञानं ( ज्ञान ) विद्धि (समज) राजसम् ( रजोगुणी ).

सर्वेषु भूतेषु पृथक्त्वेन पृथग्विधान् नाना भावान् यज्ज्ञानं वेत्ति, तत् ज्ञानं राजसं विद्धि.

सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं निरनिराळ्या स्वभावाचें वेगळालें अस्तित्व आहे असा ज्या ज्ञानाच्या योगानें बोध होतो तें ज्ञान राजस असें समज ॥ २१ ॥

यत्तु कृत्स्नवदेकस्मिन् कार्ये सक्तमहैतुकम् ।
अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

यत् ( जें ) तु ( परंतु ), कृत्स्नवत् ( सर्व कांहीं ) एकस्मिन् ( एकांतच ) कार्ये ( कार्यांत ) सक्तं ( आसक्त झालेला ) अहैतुकम् ( कारणाशिवाय ) अतत्त्वार्थवत् ( मूळ स्वरूपाविरुद्ध ) अल्पं ( थोडें ) च ( आणि ) तत् ( तें ) तामसं ( तमोगुणी ) उदाहृतं ( म्हटलें जातें ).

तु यत् एकस्मिन् कार्ये कृत्स्नवत् सक्तं अहैतुकं अतत्त्वार्थवत् च अल्पं तत् ( ज्ञानं ) तामसं उदाहृतं.

परंतु जें ज्ञान एकाच गोष्टीत सर्व कांहीं आहे अशी आसक्ति उत्पन्न करतें, ज्या ज्ञानांत मूळ हेतु किंवा कारण याचा विचार नाहीं, ज्यांत खरें स्वरूप काय याची कल्पना किंवा शोध नाहीं आणि जें फारच कोतें असतें तें ज्ञान तमोगुणी म्हणतात ॥ २२ ॥

नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतम् ।
अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्विकमुच्यते ॥ २३ ॥

नियतं ( रोजचें नेमलेलें ) संगरहितं = संगेन रहितं ( आसक्ति-विरहित ) अरागद्वेषतः = न रागात् वा द्वेषात् वा इति ( प्रीति अथवा द्वेष नसून ) कृतं ( केलेलें ) अफलप्रेप्सुना = न फलस्य प्रेप्सुना ( यः अफलप्राप्तिमिच्छति स फलप्रेप्सुः तेन = ज्यास फलप्राप्तीची इच्छा नाहीं त्यानें ) कर्म ( कर्म ) यत् ( जें ) तत् ( तें ) सात्विकं ( सत्व-गुणी ) उच्यते ( म्हणतात ).

अफलप्रेप्सुना यत् नियतं कर्म संगरहितं अरागद्वेषतः कृतं, तत् सात्विकं उच्यते.

फलाची इच्छा न करतां, आसक्ति नसून आणि प्रीति किंवा द्वेष न धरतां जें रोजचें अवश्यक कर्म केलें जातें तें सत्वगुणी कर्म असें म्हणतात ॥ २३ ॥

यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः ।
क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥ २४ ॥

यत् ( जें ) तु ( परंतु ) कामेप्सुना = कामस्य ईप्सुना ( आप्तुमिच्छा = ईप्सा, कामस्य ईप्सा यस्य स कामेप्सु तेन = आपली इच्छा सफल व्हावी या हेतूनें ) कर्म ( कर्म ) साहंकारेण = अहंकारः यस्य अस्ति तेन ( अभिमानानें ) वा ( अथवा ) पुनः ( पुन्हां ) क्रियते ( केलें जातें ) बहुलायासं = बहुलः आयासः यस्मिन् तत् ( ज्यांत फार श्रम आहेत तें ) तत् ( तें ) राजसं ( रजोगुणी ) उदाहृतं ( म्हटलें जातें ).

यत् तु कामेप्सुना पुनः साहंकारेण वा बहुलायासं कर्म क्रियते, तत् राजसं उदाहृतं.

परंतु उपभोगाच्या इच्छेनें आणि पुनः अभिमानानें अथवा फार कष्टानें जें कर्म केलें जातें त्याला रजोगुणी कर्म म्हणतात ॥ २४ ॥

अनुबंधं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम् ।
मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ॥ २५ ॥

अनुबंधं ( परिणाम ) क्षयं ( नाश ) हिंसा ( पीडा ) अनपेक्ष्य ( लक्ष न देतां ) च ( आणि ) पौरुषम् ( शक्ति, पराक्रम ) मोहात् ( अज्ञान, भ्रांतीच्या योगानें ) आरभ्यते ( प्रारंभ केलें जातें) कर्म(कर्म) यत् ( जें ) तत् ( तें ) तामसं ( तमोगुणी ) उच्यते ( म्हणतात )

अनुबंधं, क्षयं, हिंसां च पौरुषं अनपेक्ष्य यत् कर्म मोहात् आरभ्यते, तत् तामसं उच्यते.

परिणाम, नुकसान, दुसऱ्यास पीडा, आपली शक्ति या सर्वांकडे अज्ञानामुळें दुर्लक्ष करून जें कर्म केलें जातें तें तमोगुणी म्हणतात ॥ २५ ॥

मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः ।
सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्विक उच्यते ॥२६॥

मुक्तसंगः = मुक्तः संगः येन सः ( वासनेचा ज्यानें त्याग केला तो ) अनहंवादी = न अहं वदति इति ( बोलण्यांत अहंपणा नाहीं असा )

धृत्युत्साहसमन्वितः = धृत्या च उत्साहेन च समन्वितः ( धैर्य आणि उत्साह ज्याच्यामध्यें परिपूर्ण आहेत ) सिद्ध्यसिद्ध्योः = सिद्धौ च असिद्धौ च ( सिद्धि होवो अगर न होवो ) निर्विकारः ( ज्याच्या रूपांत अगर स्वभावांत फरक होत नाहीं असा ) कर्ता ( कर्म करणारा ) सात्विकः ( सत्वगुणी ) उच्यते ( म्हटला जातो ).

मुक्तसंगः, अनहंवादी, धृत्युत्साहसमन्वितः, सिद्ध्यसिद्ध्योः निर्विकारः, कर्ता सात्विकः उच्यते.

वासनेपासून अलिप्त, मीपणाचा तोंडी शब्द नाहीं, धैर्य आणि उत्साह ज्याच्या अंगीं पूर्णतेनें वास करतात, कार्यसिद्धि होवो, अगर न होवो त्याबद्दल ज्यास हर्षशोकादि विकार नाहीं अशा रीतीनें जो कर्म करतो त्याला सत्वगुणी कर्ता म्हणतात ॥ २६ ॥

रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ।
हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥ २७ ॥

रागी ( आसक्त ) कर्मफलप्रेप्सुः = कर्मणः फलस्य प्रेप्सुः ( केल्या कर्मापासून फल इच्छिणारा ) लुब्धः ( लोभी ) हिंसात्मकः = हिंसा आत्मनि यस्य सः ( ज्याच्या अंतर्यामीं क्रूरता तो ) अशुचिः (अमंगळ) हर्षशोकान्वितः = हर्षेण च शोकेन च अन्वितः ( हर्ष आणि शोक यांनीं युक्त ) कर्ता ( कर्म करणारा ) राजसः ( रजोगुणी ) परिकीर्तितः ( समजला जातो ).

रागी, कर्मफलप्रेप्सुः, लुब्धः, हिंसात्मकः, अशुचिः, हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः.

कर्मासक्त, केल्या कर्मांचें फल इच्छिणारा, अंतर्यामीं क्रूर, अमंगळ, हर्ष व शोक या दोहोंसही अनुभविणारा असा जो त्याला रजोगुणी कर्ता म्हणतात ॥ २७ ॥

अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः ।
विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥ २८ ॥

अयुक्तः ( चंचळ चित्ताचा ) प्राकृतः ( गांवढळ ) स्तब्धः ( हट्टी ) शठः ( अप्रामाणिक ) नैष्कृतिकः ( दुष्ट कर्म करणारा ) अलसः

( आळशी ) विषादी ( निराश ) दीर्घसूत्री ( चेंगट ) च ( आणि ) कर्ता ( कर्म करणारा ) तामसः ( तमोगुणी ) उच्यते ( म्हणतात ).

अयुक्तः, प्राकृतः, स्तब्धः, शठः, नैष्कृतिकः अलसः, विषादी च दीर्घसूत्री कर्ता तामसः उच्यते.

चंचळ चित्ताचा, मूर्ख, हट्टी, ठक, दुष्ट कर्म करणारा, आळशी, निराश आणि चेंगट असा जो त्याला तमोगुणी कर्ता म्हणतात ॥ २८ ॥

**बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु ।**
**प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय ॥ २९ ॥**

बुद्धेः ( बुद्धीचा ) भेदं ( भेद ) धृतेः ( धारणाशक्तीचा ) च ( आणि ) एव ( देखील ) गुणतः ( गुणापासून ) त्रिविधं ( तीन तऱ्हेनें ) शृणु ( श्रवण कर ) प्रोच्यमानम् ( सांगितले जाणारे ) अशेषेण ( साग्र ) पृथक्त्वेन ( निरनिराळें ) धनंजय ( अर्जुना ).

धनंजय, बुद्धेः च एव धृतेः गुणतः त्रिविधं भेदं अशेषेण पृथक्त्वेन प्रोच्यमानम् शृणु.

हे धनंजया, बुद्धीचे आणि धृतीचे ( धारणाशक्तीचे ) गुणांमुळें होणारे तीन प्रकारचे वेगळाले भेद कांहीं शिल्लक न ठेवतां उघड करून सागतों ते ऐक ॥ २९ ॥

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ।**
**बंधं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्विकी ॥३०॥**

प्रवृत्तिं ( पुढें जाणें, संसारचक्रांत पडणें ) च ( आणि ) निवृत्तिं ( मागें परतणें, परमार्थमार्ग धरणें, विरक्ति ) च ( आणि ) कार्याकार्ये = कार्यं च अकार्यं च ( करणें योग्य कोणतें व अयोग्य कोणतें ) भयाभये = भयं च अभयं च ( भीति आणि निर्भयपणा ) बंधं ( अटक ) मोक्षं ( सुटका ) च ( आणि ) वा ( अथवा ) वेत्ति ( जाणतो ) बुद्धिः ( बुद्धि ) सा ( ती ) पार्थ ( अर्जुना ) सात्विकी ( सत्वगुणी ).

पार्थ या बुद्धिः प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये, भयाभये, बंधं मोक्षं च वेत्ति, सा सात्विकी.

अर्जुना, ज्या बुद्धीच्या योगानें संसारचक्र कोणतें व परमार्थ मार्ग कोणता हें समजतें; कोणतें करावें, कोणतें करूं नये हें कळतें; भीति कशाची धरावी व कशाची धरूं नये हें समजतें; बंध म्हणजे काय, मोक्ष म्हणजे काय हीं समजतात, ती बुद्धि सत्वगुणी होय ॥ ३० ॥

**यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ।**
**अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥ ३१ ॥**

**यया** ( जिच्या योगानें ) **धर्मं** ( धर्म ) **अधर्मं** ( अधर्म ) **च** ( आणि ) **कार्यं** ( करणें कोणतें ) **च** ( आणि ) **अकार्यं** ( करूं नये कोणतें ) **एव** ( देखील ) **च** ( आणि ) **अयथावत्** ( गैर-शिस्तपणें ) **प्रजानाति** ( समजतें ) **बुद्धि** ( बुद्धि ) **सा** ( ती ) **पार्थ** ( अर्जुना ) **राजसी** ( रजोगुणी ).

पार्थ, यया धर्मं च अधर्मं, कार्यं च अकार्यं एव च बुद्धिः अयथावत् प्रजानाति, सा राजसी.

अर्जुना, ज्या बुद्धीच्या योगानें धर्म कोणता, अधर्म कोणता, काय करावें, काय करूं नये हें नीट समजत नाहीं, ती बुद्धि रजोगुणी होय ॥ ३१ ॥

**अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता ।**
**सर्वार्थान् विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥ ३२ ॥**

**अधर्मं** ( अधर्म ) **धर्मं** ( धर्म ) **इति** ( याप्रमाणें ) **यः** ( जी ) **मन्यते** ( समजते ) **तमसा** ( अज्ञानानें ) **आवृता** ( झांकलेली ) **सर्वार्थान् = सर्वान् अर्थान्** ( सर्व वस्तु ) **विपरीतान्** ( उलट ) **च** ( आणि ) **बुद्धिः** ( बुद्धि ) **सा** ( ती ) **पार्थ** ( अर्जुना ) **तामसी** ( तमोगुणी ).

पार्थ, तमसा आवृता या बुद्धिः अधर्मं धर्मं इति. मन्यते, च सर्वार्थान् विपरीतान् ( मन्यते ) सा बुद्धि तामसी.

अर्जुना, अज्ञानानें झांकलेली जी बुद्धि अधर्म हा धर्म समजते, व सर्व गोष्टी उलट्या भासविते ती बुद्धि तमोगुणी होय ॥ ३२ ॥

**धृत्या यया धारयते मनःप्राणेंद्रियक्रियाः ।**
**योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्विकी ॥ ३३ ॥**

**धृत्या** ( धैर्यानें, स्थैर्यानें ) **यया** ( जियेतें ) **धारयते** ( धारण केल्या जातात ) **मनःप्राणेंद्रियक्रियाः** = मनसः च प्राणानाम् च इंद्रियाणाम् च क्रियाः ( मन, प्राण आणि इंद्रियें यांच्या कृती ) **योगेन** ( योगानें ) **अव्यभिचारिण्या** ( एकनिष्ठ, दृढतर ) **धृतिः** ( स्थैर्य, धैर्य ) **सा** ( ती ) **पार्थ** ( अर्जुना ) **सात्त्विकी** ( सत्वगुणी ).

पार्थ, यया अव्यभिचारिण्या धृत्या मनः प्राणेंद्रियक्रियाः योगेन धारयते, सा धृतिः सात्विकी.

अर्जुना, ज्या एकनिष्ठ स्थैर्यानें ( स्थिरतेनें ) मन, प्राण आणि इंद्रियें यांच्या कृती योगयुक्त चालतातत ती स्थिरता सात्विकी होय ॥ ३३ ॥

**यया तु धर्मकामार्थान् धृत्या धारयतेऽर्जुन ।**
**प्रसंगेन फलाकांक्षी धृतिः सा राजसी ॥ ३४ ॥**

**यया** ( जिनें ) **तु** ( खरोखर ) **धर्मकामार्थान्** = धर्मः च कामः च अर्थः च तान् ( धर्म, अर्थ आणि काम हे तीन पुरुषार्थ ) **धृत्या** ( स्थिरतेनें ) **धारयते** ( धरतो ) **अर्जुन** (अर्जुना ) **प्रसंगेन** ( आसक्तीनें ) **फलाकांक्षी** = फलस्य आकांक्षी ( फलाची इच्छा करीत होतसातां ) **धृतिः** ( धारणा ) **सा** ( ती ) **पार्थ** ( हे पार्था ) **राजसी** ( रजोगुणी ),

तु, अर्जुन, यया धृत्या धर्मकामार्थान् धारयते, प्रसंगेन पार्थ या फलाकांक्षी भवति सा धृतिः राजसी.

हे पार्था, अर्जुना, ज्या स्थिरतेनें (धैर्यानें ) धर्म, काम आणि अर्थ हीं प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न होत असतां फलाची इच्छा जागृत असते ती स्थिरता रजोगुणी होय ॥ ३४ ॥

**यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च ।**
**न विमुंचति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥ ३५ ॥**

**यया** (जिनें) **स्वप्नं** (स्वप्न) **भयं** ( भय) **शोकं** ( शोक) **विषादं** ( खिन्नता ) **मदं** ( ताठा ) **एव** ( केवळ ) **च** ( आणि ) **न विमुंचति** (सोडली जात नाहीत ) **दुर्मेधा** ( दुष्ट बुद्धि ) **धृतिः** (धारणा) **सा** ( ती ) **पार्थ** ( अर्जुना ) **तामसी** ( तमोगुणी ).

पार्थ, यया स्वप्नं भयं शोकं विषादं च मदं एव दुर्मेधाः न विमुंचति, सा धृति तामसी.

अर्जुना, ज्या धोरणेनें दुष्ट बुद्धीचा पुरुष, झोंप, भय, शोक, खिन्नता आणि ताठा ह्यांचा त्याग करीत नाहीं त्याची धृति (धारणा) तमोगुणी होय ॥ ३५ ॥

सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ।
अभ्यासाद्रमते यत्र दुःखांतं च निगच्छति ॥ ३६ ॥

सुखं (सुख) तु (खरोखर) इदानीं (आतां) त्रिविधं (तीन प्रकारचें) शृणु (ऐक) मे (माझ्याकडून) भरतर्षभ (अर्जुना) अभ्यासात् (अभ्यापासून) रमते (आनंद पावतो) यत्र (जेथें) दुःखांतं=दुःखस्य अंतं (दुःखाचा शेवट) च (आणि) निगच्छति (जातो)

भरतर्षभ, इदानीं तु त्रिविधं सुखं मे शृणु; यत्र मनुष्यः अभ्यासात् रमते, च दुःखांतं निगच्छति.

भरतकुलश्रेष्ठा अर्जुना, आतां सुखाचे तीन प्रकार माझ्याकडून घे, ज्या सुखाचा अभ्यास (परिचय) केल्यानें मन रमतें आणि दुःख नाहींसें होतें ॥ ३६ ॥

यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।
तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥३७॥

यत्तत् (जें जें, जें कांहीं) अग्रे (प्रारंभीं) विषं (विषासारखें कडू) इव (जसें कांहीं) परिणामे (परिणामीं) अमृतोपमम्= अमृतं उपमा यस्य तत् (अमृतासारखें) तत् (तें) सुखं (सुख) सात्विकं (सत्वगुणी) प्रोक्तं (म्हटलें आहे) आत्मबुद्धिप्रसादजम्= आत्मनः बुद्धेः प्रसादात् जातं (आत्मज्ञानाच्या योगानें मनाला प्रसन्नता येते तीपासून उत्पन्न झालेलें, आत्मज्ञानाच्या प्रसन्नतेपासून उत्पन्न झालेलें).

यत्तत् अग्रे विषं इव, परिणामे अमृतोपमं, आत्मबुद्धिप्रसादजं, तत् सुखं सात्विकं प्रोक्तं.

जें सुख प्रारंभीं विषासारखें कडू व परिणामीं अमृतासारखें गोड असतें, आणि आत्मज्ञानाच्या योगानें अंतरीं प्रसन्नता येते तीपासून उत्पन्न झालेलें जें सुख तें सत्वगुणी म्हणतात ॥ ३७ ॥

**विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।**
**परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥ ३८ ॥**

**विषयेंद्रियसंयोगात्** = विषयेभ्यः इंद्रियाणाम् संयोगात् ( इंद्रियांची विषयांशीं संगति झाल्यापासून ) **यत्** ( जें ) **तत्** ( तें ) **अग्रे** ( आरंभीं ) **अमृतोपमम्** ( अमृतासारखें गोड ) **परिणामे** ( शेवटीं ) **विषं** ( विष ) **इव** ( सारखें ) **तत्** ( तें ) **सुखं** ( सुख ) **राजसं** ( रजोगुणी ) **स्मृतम्** ( आठवलेलें ).

यत् तत् विषयेंद्रियसंयोगात् अग्रे अमृतोपमं, परिणामे विषं इव तत् सुखं राजसं स्मृतं.

जें सुख इंद्रियांना विषय–संगति ( विषयोपभोग ) मिळाल्यानें आरंभीं अमृतासारखें व परिणामीं विषासारखें होतें तें सुख रजोगुणी असें स्मृतिकार म्हणतात ॥ ३८ ॥

**यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनात्मनः ।**
**निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥**

**यत्** ( जें ) **अग्रे** (प्रारंभीं) **च** ( आणि ) **अनुबंधे** ( परिणामीं ) **च** ( आणि ) **सुखं** ( सुख ) **मोहनं** ( भुरळ पाडणारें ) **आत्मनः** ( आत्म्याला ) **निद्रालस्यप्रमादोत्थं** = निद्रा च आलस्यं च प्रमादः च तेभ्यः उत्थितं ( निद्रा, आळस व दुर्लक्ष यांपासून उत्पन्न झालेलें ) **तत्** ( तें ) **तामसं** ( तमोगुणी ) **उदाहृतं** ( म्हणतात. )

यत् सुखं अग्रे च अनुबंधे आत्मनः मोहनं च निद्रालस्यप्रमादोत्थं, तत् ( सुखं ) तामसं उदाहृतं.

जें सुख आरंभीं व शेवटीं आत्म्याला ( जीवाला ) मोह पाडतें, व जें निद्रा, आळस आणि दुर्लक्ष यांपासून उत्पन्न होतें तें सुख तमोगुणी म्हणतात ॥ ३९ ॥

न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।
सत्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिःस्यात्त्रिभिर्गुणैः ॥ ४० ॥

न ( नाहीं ) तत् ( तें ) अस्ति ( आहे ) पृथिव्यां ( पृथ्वींत ) वा ( अथवा ) दिवि ( स्वर्गांत ) देवेषु ( देवांमध्यें ) वा ( अथवा ) पुनः ( पुन्हां ) सत्वं ( वस्तुमात्र ) प्रकृतिजैः ( प्रकृतीपासून जन्मलेला ) मुक्तं ( सुटलेला ) यत् ( जें ) एभिः ( यांनीं ) स्यात् ( असतील ) त्रिभिः ( तिहींनीं ) गुणैः ( गुणांनीं, गुणांपासून ).

यत् सत्वं एभिः प्रकृतिजैः त्रिभिः गुणैः मुक्तं स्यात्, तत् पृथिव्यां वा दिवि वा पुनः देवेषु न अस्ति.

पृथ्वीवर, स्वर्गामध्यें अथवा देवांमध्यें अशी कोणतीही वस्तु नाहीं, कीं जी प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या या तीन गुणांपासून सुटली आहे ॥ ४० ॥

ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप ।
कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ ४१ ॥

ब्राह्मणक्षत्रियविशां = ब्राह्मणानां च क्षत्रियाणां च विशां च ( ब्राह्मणांचीं, क्षत्रियांचीं व वैशांचीं ) शूद्राणां ( शूद्रांचीं ) च ( आणि ) परंतप ( अर्जुना ) कर्माणि ( कर्मे ) प्रविभक्तानि ( विभागलेलीं आहेत ) स्वभावप्रभवैः ( स्वाभाविक उत्पन्न झालेल्यानीं ) गुणैः ( गुणांनीं ).

परंतप, ब्राम्हणक्षत्रियविशां च शूद्राणां कर्माणि स्वभावप्रभवैः गुणैः प्रविभक्तानि ( संति ).

हे अर्जुना, ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचीं कर्मे, त्यांच्या स्वाभाविक उत्पन्न झालेल्या गुणांप्रमाणें निरनिराळीं आहेत ॥ ४१ ॥

शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च ।
ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥ ४२ ॥

शमः ( अंतःकरणाची स्वस्थता ) दमः ( इंद्रियनिग्रह, आत्मसंयमन ) तपः ( तपश्चर्या ) शौचं ( अंतरबाह्य शुद्धि ) क्षांतिः ( क्षमा ) आर्जवं ( सरळपणा ) एव ( देखील ) च ( आणि ) ज्ञानं ( ईश्वरस्वरूपाविषयीं बोध, ज्ञान ) विज्ञानं ( अनुभविक ज्ञान ) आस्तिक्यं ( ईश्वर आहे

असा भाव असणें ) ब्रह्मकर्म = ब्रह्मणः कर्म ( ब्राह्मणाचें कर्म ) स्वभावजं ( स्वभावसिद्ध, स्वाभाविक ).

शमः, दमः, तपः, शौचं, क्षांतिः च आर्जवं एव, ज्ञानं विज्ञानं आस्तिक्यं ( इति ) स्वभावजं ब्रह्मकर्म ( अस्ति ).

शम, दम, तप, अंतर्बाह्य शुद्धि, क्षमा, सरळपणा, तसेंच ज्ञान, अनुभव, ईश्वराविषयीं आस्तिक्य बुद्धि हीं ब्राम्हणांचीं स्वाभाविक कर्मे होत ॥ ४२ ॥

शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।
दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥ ४३ ॥

शौर्यं ( शूरत्व, पराक्रम ) तेजः ( अंगचें पाणी, इभ्रत ) धृतिः ( धैर्य ) दाक्ष्यं ( दक्षता, सावधपणा ) युद्धे ( युद्धांत ) च ( आणि ) अपि ( सुद्धां ) अपलायनम् ( पळून न जाणें ) दानं ( दान ) ईश्वरभावः = ईश्वरस्य भावः ( सत्ता चालविण्याचें सामर्थ्य ) च ( आणि ) क्षात्रं ( क्षत्रियांचें ) कर्म ( कर्म ) स्वभावजम् ( स्वभावसिद्ध, स्वाभाविक ).

शौर्यं, तेजः धृतिः, दाक्ष्यं, च युद्धे अपि अपलायनम्, दानं च ईश्वर-भावः क्षात्रं कर्म स्वभावजं ( अस्ति ).

शूरत्व, इभ्रत, धैर्य, दक्षता युद्धातून पळून न जाणें, तसेंच दान व सत्ता चालविण्याचें सामर्थ्य हीं क्षत्रियांचीं स्वाभाविक कर्मे होत ॥ ४३ ॥

कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभाजम् ।
परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥ ४४ ॥

कृषिगोरक्ष्यवाणिज्यं = कृषिः च गोरक्ष्यं च वाणिज्यं च ( शेती करणें, पशुपालन आणि व्यापार ) वैश्यकर्म = वैश्यांना कर्म ( वैश्यांचें कर्म ) स्वभावजम् ( स्वभावसिद्ध ) परिचर्यात्मकं = परिचर्या आत्मा यस्य तं ( दास्य हें ज्याचा स्वभाव तें ) कर्म ( कर्म ) शूद्रस्य ( शूद्राचें ) अपि ( सुद्धां ) स्वभावजं ( स्वभावसिद्ध ).

कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजं, शूद्रस्य अपि परिचर्यात्मकं कर्म स्वभावजं.

शेती करणें, पशूंचें पालन करणें आणि व्यापार करणें हीं वैश्याचीं स्वाभाविक कर्में होत, आणि दास्य करणें हें शूद्राचें स्वाभाविक कर्म होय ॥ ४४ ॥

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।**
**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विंदति तच्छृणु ॥ ४५ ॥**

**स्वे** ( आपल्यांत ) **स्वे** ( आपल्यांत ) **कर्मणि** (कर्मांत) **अभिरतः** ( गुंतलेला ) **संसिद्धिं** ( पूर्णता ) **लभते** ( मिळवितो ) **नरः** ( पुरुष ) **स्वकर्मनिरतः** = स्वस्य कर्मणि निरतः (स्वतःच्या कर्मांत गढून गेलेला) **सिद्धिं** ( पूर्णता ) **यथा** ( ज्याप्रमाणें ) **विंदति** ( मिळवितो ) **तत्** ( तें ) **शृणु** ( ऐक ).

स्वे स्वे कर्मणि अभिरतः नरः संसिद्धिं लभते, स्वकर्मनिरतः यथा सिद्धिं विन्दति, तत् शृणु.

आपापल्या कर्मांत जो पुरुष निष्ठेनें गढून राहतो त्याला पूर्णता प्राप्त होते, आपल्या कर्मांत एकनिष्ठेनें तत्पर राहणाऱ्या पुरुषाला सिद्धि कशी प्राप्त होते तें ऐक ॥ ४५ ॥

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदंततम् ।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः ॥ ४६ ॥**

**यतः** ( ज्याच्यापासून ) **प्रवृत्तिः** ( पुढें येणें, उत्पन्न होणें ) **भूतानां** ( भूतमात्रांचें ) **येन** ( ज्यानें ) **सर्वं** ( सर्व ) **इदं** ( हें ) **ततं** (व्यापलें आहे) **स्वकर्मणा** ( आपल्या कर्मानें ) **तम्** ( त्याला ) **अभ्यर्च्य** ( आराधना करून ) **सिद्धिं** ( पूर्णता ) **विंदति** ( मिळवितो ) **मानवः** ( मनुष्य ).

यतः भूतानां प्रवृत्तिः, येन इदं सर्वं ततं, तं स्वकर्मणा अभ्यर्च्य मानवः सिद्धिं विंदति.

ज्याच्यापासून सर्व भूतमात्रांची उत्पत्ति होते व ज्यानें हें सर्व ( विश्व ) व्यापून टाकलें आहे, त्या ईश्वराची स्वकर्मानें आराधना करणाऱ्या पुरुषाला सिद्धि प्राप्त होते ॥ ४६ ॥

श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ ४७ ॥

श्रेयान् ( अधिक चांगलें ) स्वधर्मः ( आपला धर्म ) विगुणः ( ज्यामध्यें कमीपणा आहे असा ) परधर्मात् = परस्य धर्मात् ( दुसऱ्याच्या धर्मापेक्षां ) स्वनुष्ठितात् ( चांगल्या प्रकारें अनुष्ठान केलेलें ) स्वभावनियतं = स्वभावेन नियतं ( आपल्या स्वभावानें नियमित केलेलें ) कर्म ( कर्म ) कुर्वन् ( करून ) न ( नाहीं ) आप्नोति ( मिळवितो ) किल्बिषम् ( पातक ).

विगुणः स्वधर्मः स्वनुष्ठितात् परधर्मात् श्रेयान् ( अस्ति ), स्वभावनियतं कर्म कुर्वन् किल्बिषं न आप्नोति.

आपला धर्म जरी कमी प्रतीचा असला तरी त्याचें आचरण करणें हें परक्याचा धर्म उत्तम रीतीनें पाळण्यापेक्षां ज्यास्त चांगलें आहे. आपल्या गुणकर्मांनीं ठरविलेलें स्वाभाविक कर्म केल्यानें पातक लागत नाहीं ॥४७॥

सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् ।
सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ ४८ ॥

सहजं ( आपलें स्वभावसिद्ध ) कर्म ( कर्म ) कौंतेय ( अर्जुना ) सदोषं ( दोषयुक्त, वाईट ) अपि ( सुद्धां ) न त्यजेत् ( सोडूं नये ) सर्वारंभाः = सर्वे आरंभाः ( सर्व कर्मारंभ ) हि ( खरोखर ) दोषेण ( दोषानें ) धूमेन ( धुरानें ) अग्निः ( अग्नि ) इव ( सारखा ) आवृताः ( झांकलेले ).

कौंतेय, सहजं कर्म सदोषं अपि न त्यजेत्; हि धूमेन अग्निः इव सर्वारंभाः दोषेण आवृताः ( संति ).

अर्जुना, आपल्या जन्माबरोबरचें स्वाभाविक कर्म कमी दर्जाचें ( दोषयुक्त, हलकें ) असलें तरी तें करण्याचें सोडूं नये; कारण अग्नि जसा धुरानें व्यापलेला असतो, तशी सर्व कर्मांचीं कृत्यें दोषानें व्यापलेलीं आहेत ॥ ४८ ॥

असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।

नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥ ४९ ॥

**असक्तबुद्धिः** = असक्ता बुद्धिः यस्य सः ( अनासक्त बुद्धि ज्याची आहे तो ) **सर्वत्र** ( सर्व ठिकाणीं ) **जितात्मा** = जितः आत्मा येन सः ( ज्याचें अंतःकरण स्वाधीन तो ) **विगतस्पृहः** = विगताः स्पृहाः यस्मात् सः ( ज्याच्यापासून वासना निघून गेल्या आहेत तो ) **नैष्कर्म्य-सिद्धिं** = निर्गतानि कर्माणि यस्मात् सः निष्कर्मा तस्य भावः नैष्कर्म्यं, तस्य सिद्धि ( ज्याच्यापासून कर्में गेलीं असा जो निष्कर्मा त्याची स्थिति तें नैष्कर्म, त्याची सिद्धि ) **परमां** ( अति उच्च ) **संन्यासेन** ( कर्म-फलाची आसक्ति सोडल्यानें ) **अधिगच्छति** ( मिळवितो ).

सर्वत्र असक्तबुद्धिः जितात्मा विगतस्पृहः ( नरः ) संन्यासेन परमां नैष्कर्म्यसिद्धिं अधिगच्छति.

सर्व ठिकाणीं ज्याची निःसंगबुद्धि, आत्मसंयमी, ज्याच्या वासना नष्ट झाल्या आहेत असा पुरुष सर्व कर्मफलाची आसक्ति सोडून अतिश्रेष्ठ जी नैष्कर्म्य सिद्धि ( कर्में करूनही त्यांचे बंधनापासून अलिप्तता ) ती प्राप्त करून घेतो ॥ ४९ ॥

**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे ।**
**समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥ ५० ॥**

**सिद्धिं** ( पूर्णता ) **प्राप्तः** ( मिळविलेली ) **यथा** ( जसें ) **ब्रह्म** ( ब्रह्म ) **तथा** ( तसें ) **आप्नोति** ( मिळवितो ) **निबोध** ( शिकून घे ) **मे** ( माझ्यापासून ) **समासेन** ( थोडक्यांत ) **एव** ( केवळ ) **कौंतेय** ( अर्जुना ) **निष्ठा** ( स्थिति ) **ज्ञानस्य** ( ज्ञानाची ) **या** ( अथवा ) **परां** ( अतिश्रेष्ठ ).

कौंतेय, सिद्धिं प्राप्तः यथा ब्रह्म आप्नोति तथा मे समासेन एव निबोध; या ज्ञानस्य परा निष्ठा ( वर्तते ).

अर्जुना, सिद्धि प्राप्त झाल्यानंतर ब्रह्मप्राप्ति कशी होते तें मजकडून थोड-क्यांत समजून घे. ही ब्रह्मज्ञानाची पराकाष्ठा होय ॥ ५० ॥

**बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।**

**शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥ ५१ ॥**

बुद्ध्या ( बुद्धीनें ) विशुद्धया ( निर्मळ ) युक्तः ( प्राप्त झालेला, संपन्न झालेला ) धृत्या ( धैर्यानें, धारणेनें ) आत्मानं ( स्वतः ) नियम्य ( संयमन करून ) च ( आणि ) शब्दादीन् = शब्दाः आदिः येषाम् तान् ( ज्यांचा आरंभ शब्दापासून ते ) विषयान् ( उपभोग्य विषय ) त्यक्त्वा ( सोडून देऊन ) रागद्वेषौ = रागः च द्वेषः च ( स्नेहभाव आणि शत्रुत्व ) व्युदस्य ( टाकून देऊन ) च ( आणि ).

विशुद्धया बुध्या युक्तः, धृत्या आत्मानं नियम्य च, शब्दादीन् विषयान् त्यक्त्वा, च रागद्वेषौ व्युदस्य.

शुद्ध बुद्धीनें युक्त असलेला, धैर्यानें आत्मसंयमन करणारा, शब्दस्पर्श वगैरे विषयांचा त्याग करणारा आणि शत्रु-मित्रत्व हीं दोन्हींही झाडून टाकणारा ( संबंध पुढें आहे ) ॥ ५१ ॥

**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ।**
**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥ ५२ ॥**

विविक्तसेवी = विविक्तं सेवते इति (एकटा राहणारा) लघ्वाशी = लघु अश्नाति इति ( थोडें खातो असा ) यतवाक्कायमानसः = यता वाक् च कायः च मानसं च येन सः ( वाचा, शरीर आणि मन ज्याच्या स्वाधीन आहेत असा ) ध्यानयोगपरः = ध्यानं च योगः च परः यस्य सः ( ध्यान व योग हेंच ध्येय आहे ज्याचें असा ) नित्यं ( सतत ) वैराग्यं ( वैराग्य ) समुपाश्रितः ( आश्रय करून ).

विविक्तसेवी, लघ्वाशी, यतवाक्कायमानसः, नित्यं ध्यानयोगपरः वैराग्यं समुपाश्रितः.

एकान्तवास सेवन करणारा, मिताहारी, कायावाचामन यांवर ताबा ठेवणारा, निरंतर ध्यान-योगांत असणारा आणि वैराग्याचा आश्रय करून रहाणारा ( संबंध पुढें आहे ) ॥ ५२ ॥

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।**

**विमुच्य निर्ममः शांतो ब्रम्हभूयाय कल्पते ॥ ५३ ॥**

**अहंकारं** ( अहंकार, मीपणा ) **बलं** ( बल ) **दर्पं** ( उन्माद, गर्व ) **कामं** ( काम ) **क्रोधं** ( राग ) **परिग्रहम्** ( परिवार, पाश ) **विमुच्य** ( सोडून देऊन ) **निर्ममः** ( ममत्व नाहीं असा ) **शांतः** ( शांत, स्वस्थ-चित्त ) **ब्रम्हभूयाय** = ब्रम्हणः भूयाय ( ब्रम्हरूप होण्याला ) **कल्पते** ( योग्य होतो ).

अहंकारं, बलं, दर्पं, कामं, क्रोधं, परिग्रहं ( च ) विमुच्य (च) निर्ममः शांतः ( सः नरः ) ब्रम्हभूयाय कल्पते.

मीपणा, बल, गर्व, काम, क्रोध, मायापाश हीं टाकून देऊन, ममत्व सोडून, स्थिर चित्त असणारा जो हा ज्ञाननिष्ठ यति तो ब्रम्हरूप होण्याला समर्थ होतो ॥ ५३ ॥

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ ५४ ॥**

**ब्रम्हभूतः** ( ब्रह्मरूप झालेला ) **प्रसन्नात्मा** = प्रसन्नः आत्मा यस्य सः ( ज्याचें अंतःकरण संतुष्ट तो ) **न शोचति** ( शोक करीत नाहीं ) **न कांक्षति** ( कशाची इच्छा करीत नाहीं ) **समः** ( सारखा ) **सर्वेषु** ( सर्वांत ) **भुतेषु** ( भूतमात्रांच्या ठिकाणीं ) **मद्भक्तिं** = मयि भक्ति ( माझ्या ठिकाणीं भक्ति ) **लभते** ( मिळवितो ) **पराम्** ( अत्युच्च ).

ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा ( सन् ) न शोचति, न कांक्षति; सर्वेषु भूतेषु समः ( भूत्वा ) परां मद्भक्तिं लभते.

ब्रम्हस्वरूपास पावलेल्या पुरुषाचें अंतःकरण सदा संतुष्ट असतें, त्याला कशाबद्दल खेद होत नाहीं व तो कशाची इच्छा करीत नाहीं; सर्व भूत-मात्रांच्या ठिकाणीं सारखा राहून श्रेष्ठ अशी जी माझी भक्ति ती प्राप्त करून घेतो ॥ ५४ ॥

**भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्वतः ।**
**ततो मां तत्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ॥ ५५ ॥**

**भक्त्या** ( भक्तीनें ) **मां** ( मला ) **अभिजानाति** ( जो जाणतो ) **यावान्** ( जेवढा, जशा प्रकारचा ) **यः** ( जो ) **च** ( आणि ) **अस्मि**

( मी आहें ) तत्वतः ( मूळरूपानें ) ततः ( नंतर ) मां (मला) तत्वतः ( मूळरूपानें ) ज्ञात्वा ( जाणून ) विशते ( शिरतो ) तदनंतरम् = ततः अनंतरम् ( त्यानंतर ).

भक्त्या मां तत्वतः अभिजानाति, यावान् यः च अस्मि, ततः मां तत्वतः ज्ञात्वा, तदनंतरं ( मां ) विशते.

भक्तीच्या योगानें तो मला मूळरूपानें जाणतो, मी केवढा कोण आहें हें समजून मग माझ्या स्वरूपाचा बोध तत्वदृष्टीनें झाल्यानंतर तो माझ्या स्वरूपामध्यें प्रवेश करतो ॥ ५५ ॥

**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ।**
**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ ५६ ॥**

**सर्वकर्माणि** = सर्वाणि कर्माणि ( सर्व कर्में ) **आपि** ( सुद्धां ) **सदा** ( नेहमीं ) **कुर्वाणः** ( करून ) **मद्व्यपाश्रयः** = अहं व्यपाश्रयः यस्यः सः ( मी ज्याचा आश्रय असा तो ) **मत्प्रसादात्** = मम प्रसादात् ( माझ्या कृपेनें ) **अवाप्नोति** ( मिळवितो ) **शाश्वतं** ( कायमचें ) **पदं** ( पद, स्थान ) **अव्ययं** ( अविनाशी ).

सदा सर्व कर्माणि अपि कुर्वाणः, मद्व्यपाश्रयः, मत्प्रसादात् शाश्वतं अव्ययं पदं अवाप्नोति.

सर्वदा आपलीं सर्व कर्में करूनही जो माझा आश्रय करतो तो माझ्या कृपेनें निरंतरचें अविनाशी असें पद (मोक्षलोक, ब्रह्मस्थिति) मिळवितो॥५६।

**चेतसा सर्व कर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।**
**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चितः सततं भव ॥ ५७ ॥**

**चेतसा** ( अंतःकरणानें, मनानें ) **सर्वकर्माणि** ( सर्व कर्में ) **मयि** ( माझ्या ठिकाणीं ) **संन्यस्य** ( अर्पण करून ) **मत्परः** ( माझें ध्यान करीत ) **बुद्धियोगम्** = बुद्धेः योगम् = बुद्धेः बुद्धिप्रकाशेन ( ज्ञानेन ) सहयोगम् ( अविवेकी बुद्धि नाहींशी होऊन ज्ञानबुद्धीच्या योगें, ज्ञानयोग त्याचा ) **उपाश्रित्य** ( आश्रय करून ) **मच्चित्तः** = मयि चित्तं यस्य सः ( माझ्याच ठिकाणीं ज्याचें मन तो ) **सततं** ( सर्व काळ ) **भव** ( हो ).

( त्वं ) सर्व कर्माणि चेतसा मयि संन्यस्य मत्परः ( सन् ) बुद्धियोगं उपाश्रित्य मच्चित्तः सततं भव.

सर्व कर्में अंतःकरणपूर्वक मला अर्पण करून माझेच ठिकाणीं ध्यान धरून ज्ञानयोगानें सारखें माझ्याकडे तुझें चित्त ठेव ॥ ५७ ॥

मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।
अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि ॥ ५८ ॥

मच्चित्तः ( माझ्या ठिकाणीं ज्याचें मन तो ) सर्वदुर्गाणि = सर्वाणि दुर्गाणि ( सर्व संकटांचे पर्वत ) मत्प्रसादात् (माझ्या प्रसन्नतेनें) तरिष्यसि ( तरून जाशील ) अथ ( आतां ) चेत् ( जर ) त्वं ( तूं ) अहंकारात् ( मीपणापासून, अहंमतेपासून ) न श्रोष्यसि ( ऐकणार नाहींस ) विनंक्ष्यसि ( तुझा नाश होईल ).

मच्चित्तः ( सन् ) मत्प्रसादात् सर्व दुर्गाणि तरिष्यसि; अथ चेत् त्वं अहंकारात् न श्रोष्यसि ( तर्हि ) विनंक्ष्यसि.

तूं माझ्या ठिकाणीं मन लाऊन राहशील तर माझ्या कृपेनें सर्व संकटांतून पार पडशील; परंतु जर तूं अभिमानानें माझें ऐकणार नाहींस तर नाश पावशील ॥ ५८ ॥

यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।
मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥ ५९ ॥

यत् ( जर ) अहंकारं ( मीपणा ) आश्रित्य ( आश्रय धरून ) न योत्स्ये ( मी युद्ध करणार नाहीं ) इति ( याप्रमाणें ) मन्यसे ( समजत असशील, विचार करीत असशील ) मिथ्या ( निरर्थक, व्यर्थ ) एष ( हा ) व्यवसायः ( निश्चय ) ते ( तुझा ) प्रकृतिः ( मूळ स्वभाव ) त्वां ( तुला ) नियोक्ष्यति ( भाग पाडील ).

यत् अहंकारं आश्रित्य ' न योत्स्ये ' इति मन्यसे, एष ते व्यवसायः मिथ्यः ( अस्ति ); प्रकृतिः त्वां नियोक्ष्यति.

जर अहंकाराचा आश्रय धरून ' मी युद्ध करणार नाहीं ' असें मनांत आणशील तर तुझा हा निश्चय व्यर्थ आहे; कारण तुझा स्वभावच तुला युद्ध करावयाला लावील ॥ ५९ ॥

स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा ।
कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥ ६० ॥

**स्वभावजेन** ( स्वभावतः उत्पन्न झालेल्यानें ) **कौंतेय** ( कुंतिपुत्रा अर्जुना ) **निबद्धः** ( बांधला गेलेला ) **स्वेन** (स्वतःच्या ) **कर्मणा** ( कर्मानें ) **कर्तुं** ( करणें ) **न इच्छसि** ( इच्छित नाहींस ) **यत्** (तें) **मोहात्** ( भ्रांतीपासून ) **करिष्यसि** ( तूं करशील ) **अवशः** ( आपोआप ) **अपि** ( सुद्धां ) **तत्** ( तें ).

कौंतेय, स्वभावजेन स्वेन कर्मणा निबद्धः ( त्वं ) यत् मोहात् कर्तुं न इच्छसि, तत् अवशः अपि करिष्यसि.

अर्जुना, स्वभावसिद्ध जें तुझें युद्ध–कर्म त्यानें बांधला गेलेला असल्यामुळें जरी मोहानें तें करूं इच्छित नाहींस तरी स्वाभावापुढें निर्बळ होऊन तें तूं आपण होऊनच करशील ॥ ६० ॥

ईश्वरः सर्व भूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ ६१ ॥

**ईश्वरः** ( ईश्वर ) **सर्वभूतानां** ( सर्व भूतमात्रांच्या ) **हृद्देशे** = हृदः देशे ( हृदयाच्या ठिकाणीं ) **अर्जुन** ( अर्जुना ) **तिष्ठति** ( राहतो, वास करतो ) **भ्रामयन्** ( फिरवीत ) **सर्वभूतानि** ( सर्व भूतें ) **यंत्रारूढानि** = यंत्रे आरूढानि ( यंत्रावर बसलेलीं ) **मायया** (मायेनें).

अर्जुन, यंत्रारूढानि सर्व भूतानि मायया भ्रामयन् ईश्वरः सर्व भूतानां हृद्देशे तिष्ठति.

अर्जुना, यंत्रावर बसविल्याप्रमाणें सर्व भूतमात्रांना मायेच्या योगानें ( या जन्मरणरूप संसारचक्रावर ) फिरविणारा ईश्वर सर्व जीवांच्या हृदयांतरांत वास करीत आहे ॥ ६१ ॥

तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।
तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥ ६२ ॥



**तम्** ( त्याला ) **एव** ( केवळ ) **शरणं** ( शरण ) **गच्छ** ( जा ) **सर्वभावेन** ( अनन्यभावानें ) **भारत** ( अर्जुना ) **तत्प्रसादात्**

( त्याच्या कृपेनें ) परां ( उत्तम ) शांतिं ( शांति ) स्थानं (धाम, स्थान ) प्राप्स्यसि ( तूं मिळविशील ) शाश्वतं ( कायमचें ).

भारत, सर्वभावेन तं एव शरणं गच्छ, तत्प्रसादात् परां शांति शाश्वतं स्थानं ( च ) प्राप्स्यसि.

हे भरतकुलश्रेष्ठा अर्जुना, अनन्यभावानें तूं त्याला शरण जा, त्याच्या कृपेनें तुला उत्तम प्रकारची शांति आणि अविनाशी स्थान प्राप्त होईल॥६२॥

इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।
विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ ६३ ॥

इति ( याप्रमाणें ) ते ( तुला ) ज्ञानं ( ज्ञान ) आख्यातं ( सांगितलें ) गुह्यात् ( गुह्याहून ) गुह्यतरं ( जास्त गुह्य ) मया ( म्यां ) विमृश्य ( विचार करून ) एतत् ( हें ) अशेषेण ( पुर्णपणें, कांहीं बाकी न ठेवतां ) यथा ( जसें ) इच्छसि ( इच्छितोस ) तथा ( तसें ) कुरु ( कर ).

इति गुह्यात् गुह्यतरं ज्ञानं मया ते अशेषेण आख्यातं, एतत् विमृश्य यथा इच्छसि तथा कुरु.

याप्रमाणें गुह्याहूनही अतिगुह्य असें हें ज्ञान मीं तुला कांहीं न सोडतां साद्यंत सांगितलें. याचा विचार करून जसें तुझ्या इच्छेस येईल तसें कर६३

सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः ।
इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ॥ ६४ ॥

सर्वगुह्यतमं = सर्वेषां गुह्यतमं ( सर्वांहून अति गुप्त )भूयः ( पुनः) शृणु ( ऐक ) मे ( माझें ) परमं ( उत्तम, श्रेष्ठ ) वचः ( वचन ) इष्टः ( आवडता ) असि ( तूं आहेस ) मे ( माझा ) दृढं ( अत्यंत) इति ( याप्रमाणें ) ततः ( म्हणून ) वक्ष्यामी ( मी सांगेन ) ते ( तुला ) हितं ( कल्याण ).

भूयः सर्व गुह्यतमं मे परमं वच शृणु; मे दृढं इष्टः असि इति ततः ते हितं वक्ष्यामि.

पुनः एकदां सर्वांहून अति गुप्त गोष्ट मी तुला सांगतों, तें माझें श्रेष्ठ वचन ऐक; माझा तूं अत्यंत आवडता आहेस, म्हणून तुझ्या कल्याणाची गोष्ट सांगतों ॥ ६४ ॥

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥ ६५ ॥**

**मन्मना** ( माझ्या ठिकाणीं मन दृढ केलेला असा ) **भव** ( हो ) **मद्भक्तः** ( माझा भक्त ) **मद्याजी** = मां यजति इति ( मला सर्व अर्पण करणारा असा ) **मां** ( मला ) **नमस्कुरु** ( नमस्कार कर ) **मां** ( माझ्याकडे ) **एव** ( देखील ) **एष्यसि** ( तूं येशील ) **सत्यं** ( खरें ) **ते** ( तुला ) **प्रतिजाने** ( मी वचन देतों, प्रतिज्ञेनें सांगतों ) **प्रियः** ( आवडता ) **असि** ( तूं आहेस ) **मे** ( माझा ).

मन्मना मद्भक्तः मद्याजी भव; मां नमस्कुरु; मां एव एष्यसि; ते सत्यं प्रतिजाने; मे प्रियः असि.

मन निरंतर माझ्या ठिकाणीं लाव, माझी भक्ति कर, मला सर्व अर्पण कर, मला नमस्कार कर, म्हणजे तूं मजकडेच येशील ( माझ्या पदाला येऊन पोंचशील ); तूं माझा आवडता आहेस म्हणून मी तुला प्रतिज्ञेनें खरें सांगतों ॥ ६५ ॥

**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ६६ ॥**

---

**टीपः**—धर्म शब्दावर पुष्कळांच्या टीका आहेत. धर्म म्हणजे निरनिराळ्या पंथांचे, जातींचे अगर लोकांचे धर्म असा अर्थ येथें नहीं. ज्या जातींचे, पंथांचे अगर जन्मस्वभावाचे जे जे धर्म, तसेंच शरीरधर्म आहेत ते काळजीपूर्वक पाळलेच पाहिजेत; त्याशिवाय गत्यंतर नाहीं, हें पूर्वी स्पष्ट रीतीनें सांगितलें आहे. येथें धर्म शब्दानें कर्ममूलक म्हणजे जे धर्म आचरल्यानें, जीं कर्में केल्यानें संचितकर्मांत भर पडेल असे सर्व धर्म, किंवा अधर्म हे घ्यावयाचे असें बरें दिसतें.

सर्वधर्मान् = सर्वान् धर्मान् ( सर्व धर्म ) परित्यज्य ( सोडून देऊन ) मां ( मला ) एकं ( एकट्याला ) शरणं ( शरण ) व्रज ( ये ) अहं ( मी ) त्वा ( तुला ) सर्वपापेभ्यः = सर्वेभ्यः पापेभ्यः ( सर्व पापांपासून ) मोक्षयिष्यामि ( मुक्त करीन ) मा शुच ( शोक करूं नको ).

सर्व-धर्मान् परित्यज्य मां एकं शरणं व्रज, अहं त्वा सर्व पापेभ्यः मोक्षयिष्यामि; ( त्वं ) मा शुच.

सर्व प्रकारचे धर्म टाकून मला एकट्यालाच शरण ये; मी तुला सर्व पापांपासून मुक्त करीन, तुला शोक करण्याचें कारण नाहीं ॥ ६६ ॥

इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।
न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ ६७ ॥

इदं ( हें ) ते ( तुझ्याकरतां, तुझ्या हिताकरतां ) न ( नाहीं ) अतपस्काय ( तपाचरण करीत नाहीं त्याला ) न ( नाहीं ) अभक्ताय ( भक्ति करीत नाहीं त्याला ) कदाचन ( कधींही ) न ( नाहीं ) च ( आणि ) अशुश्रूषवे ( ऐकण्याची व सेवा करण्याची इच्छा नाहीं त्याला ) वाच्यं ( सांगावयाचें ) न ( नाहीं ) च ( आणि ) मां ( मला ) यः ( जो ) अभ्यसूयति ( दोषदृष्टीनें पहातो ).

इदं ते; न अतपस्काय, न अभक्ताय, न च अशुश्रूषवे, न च यः मां अभ्युसूयति ( तस्मै ) कदाचन वाच्यं.

हें ( गीताशास्त्र ) तुझ्याकरतां ( तुझ्या हिताकरतां ) सांगितलें; जो तपाचरण करीत नाहीं, जो भक्ति करीत नाहीं, ज्याला ऐकण्याची व त्याकरतां सेवा करण्याची इच्छा नाहीं आणि जो मजकडे दोषदृष्टीनें पाहतो अशांना हें ( गीताशास्त्र ) कधींही सांगावयाचें नाहीं ॥ ६७ ॥

य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वाभिधास्यति ।
भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥

यः ( जो ) इदं ( हें ) परमं ( अति श्रेष्ठ ) गुह्यं ( गुप्त शास्त्र ) मद्भक्तेषु = मम भक्तेषु ( माझ्या भक्तांमध्यें ) अभिधास्यति ( उघड

करून सांगेल ) भक्तिं ( भक्ति) मयि ( माझ्यांत ) परां ( उत्कृष्ट ) कृत्वा ( करून ) माम् ( मला ) एव ( देखील ) एष्यति ( येईल ) असंशयः ( निःसंशय ).

इदं परमं गुह्यं यः मद्भक्तेषु अभिधास्यति, ( सः ) मयि परां भक्तिं कृत्वा मां एव एष्यति असंशयः.

जो हें अत्यंत गुप्तशास्त्र माझ्या भक्तांना उघड करून सांगेल तो माझा परम भक्त होऊन माझ्या पदाला प्राप्त होईल यांत कांहीं एक संशय नाहीं ॥ ६८ ॥

न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।
भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९ ॥

न ( नाहीं ) च ( आणि ) तस्मात् ( त्यापेक्षां ) मनुष्येषु ( मानवांमध्यें ) कश्चित् ( कोणीही ) मे ( माझा ) प्रियकृत्तमः ( अति प्रिय करणारा ) भविता ( होईल ) न ( नाहीं ) च ( आणि ) मे ( माझा ) तस्मात् ( त्याच्यापेक्षां ) अन्यः ( दुसरा ) प्रियतरः (अधिक प्रियकर) भुवि ( पृथिवींत ).

मनुष्येषु कश्चित् च तस्मात् मे प्रियकृत्तमः न (अस्ति) च तस्मात् अन्यः मे प्रियतरः भुवि न च भविता.

या भूलोकीं मानवांमध्यें त्याच्यापेक्षां माझें अत्यंत प्रिय करणारा कोणीही नाहीं आणि त्याच्यापेक्षां मला अधिक आवडता असाही कोणी नाहीं ॥६९॥

अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।
ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ ७० ॥

अध्येष्यते ( अभ्यास करील ) च ( आणि ) यः ( जो ) इमं ( हें ) धर्म्यं ( पवित्र, आचरण्यास योग्य ) संवादं ( प्रश्नोत्तररूप भाषण, संभाषण ) आवयोः ( आपणा दोघांचें ) ज्ञानयज्ञेन = ज्ञानस्य यज्ञेन ( ज्ञानाच्या यज्ञानें ) तेन ( त्यानें ) अहं ( मी ) इष्टः ( पूजिलेला ) स्याम् ( होईन ) इति ( त्याप्रमाणें ) मे ( माझें ) मतिः ( मत ).

च भवयो: इमं धर्म्यं संवादं यः अध्येष्यते, तेन ज्ञानयज्ञेन अहं इष्टः स्याम् इति मे मतिः.

आणि आपला हा दोघांचा पवित्र ( धार्मिक ) असा संवाद याचें जो अभ्ययन करील त्यानें ज्ञानाच्या यज्ञानें माझें पूजन केलें असें माझें मत आहे ॥ ७० ॥

श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ।
सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥ ७१ ॥

श्रद्धावान् ( विश्वास ठेवणारा ) अनसूयः ( हेवा न करणारा, निर्मत्सरी ) च ( आणि ) शृणुयात् ( ऐकेल, श्रवण करील ) अपि ( सुद्धां ) यः ( जो ) नरः ( पुरुष ) सः ( तो ) अपि ( सुद्धां ) मुक्तः ( मुक्त ) शुभान् ( मंगलदायक ) लोकान् ( लोक ) प्राप्नुयात् ( मिळवील ) पुण्यकर्मणाम् = पुण्य कर्म येषां तेषां ( पुण्यकर्म करणाराच्या ).

श्रद्धावान् अनुसूयः च यः नरः शृणुयात् अपि सः मुक्तः ( सन् ) पुण्यकर्मणां शुभान् लोकान् प्राप्नुयात्.

जो पुरुष श्रद्धापूर्वक व निर्मत्सरबुद्धीनें हा संवाद श्रवण करील तोसुद्धां पापमुक्त होऊन, पुण्यकर्म करणारे ज्या शुभलोकाला जातात, तो लोक त्याला प्राप्त होईल ॥ ७१ ॥

कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।
कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥ ७२ ॥

कच्चित् ( काय? ) एतत् ( हें ) श्रुतं ( श्रवण केलें ) पार्थ ( हे अर्जुना ) त्वया (तुवां) एकाग्रेण ( एकचित्तानें ) चेतसा (मनानें ) कच्चित् ( किंवा ) अज्ञानसंमोहः = अज्ञानस्य संमोहः ( अज्ञानाची भ्रांति ) प्रनष्टः ( नाश पावला ) ते ( तुझा ) धनंजय ( हे धनंजया, अर्जुना ).

पार्थ, त्वया एकाग्रेण चेतसा कच्चित् एतत् श्रुतं ? धनंजय, ते अज्ञानसंमोहः कच्चित् प्रनष्टः ( किम् ) ?

पार्था, तू एकाग्रचित्तानें मी सांगितलें तें ऐकलेस काय? हे धनंजया, तुझी अज्ञानानें झालेली भ्रांति नाहींशी झाली काय? ॥ ७२ ॥

अर्जुन उवाच—नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाऽच्युत ।
स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ ७३ ॥

नष्टः (नाहींशी झाली) मोहः (भ्रांति) स्मृतिः (आठवण) लब्धा (प्राप्त झाली) त्वत्प्रसादात्=तव प्रसादात् (तुझ्या कृपेनें) मया (म्यां) अच्युत (हे कृष्ण) स्थितः (स्थिर) अस्मि (मी आहें) गतसंदेहः=गतः संदेहः यस्य सः (ज्याचा संशय गेला आहे तो) करिष्ये (मी करीन) वचनं (सांगणें) तव (तुझें).

अच्युत, त्वत्प्रसादात् मोहः नष्टः मया स्मृतिः लब्धा, गतसंदेहः स्थितः अस्मि; (अहं) तव वचनं करिष्ये.

हे अच्युत, तुमच्या प्रसादानें माझी भ्रांति नाहींशी झाली, पूर्वीची (माझ्या कर्तव्याची) आठवण जागृत झाली, माझा संशय सर्व गेला; आपण जें सांगितलें त्याप्रमाणें मी करीन ॥ ७३ ॥

संजय उवाच—इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ।
संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥ ७४ ॥

इति (याप्रमाणें) अहं (मी) वासुदेवस्य (वासुदेवाचा, कृष्णाचा) पार्थस्य (अर्जुनाचा) च (आणि) महात्मनः (मोठ्या मनाचा जो त्याचा) संवादं (संभाषण) इमम् (हें) अश्रौषम् (ऐकला) अद्भुतं (अपूर्व) रोमहर्षणम्=रोमाणां हर्षणम् यस्मात् तत् (ज्याच्यापासून रोमांच उभे राहतात असा).

इति इमं वासुदेवस्य च महात्मनः पार्थस्य अद्भुतं रोमहर्षणं संवादं अहं अश्रौषं.

संजय म्हणाला—याप्रमाणें वासुदेव आणि महात्मा अर्जुन यांचा अपूर्व आणि अंगावर रोमांच उभे करणारा संवाद मीं ऐकला ॥ ७४ ॥

व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतत् गुह्यमहं परम् ।
योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥ ७५ ॥

व्यासप्रसादात् = ( व्यासाच्या कृपेनें ) श्रुतवान् ( ऐकलें ) एतत् ( हें ) गुह्यं ( गुह्य ) अहं ( मी ) परं ( परम श्रेष्ठ ) योगं ( योग ) योगेश्वरात् = योगस्य ईश्वरात् ( योगाच्या अधिपतीपासून ) कृष्णात् ( कृष्णापासून ) साक्षात् ( प्रत्यक्ष ) कथयतः ( सांगताना ) स्वयं ( स्वतः ).

व्यासप्रसादात् एतत् परं गुह्यं योगं योगेश्वरात् कृष्णात् स्वयं कथयतः अहं साक्षात् श्रुतवान्.

व्यासांच्या कृपेनें हा परम श्रेष्ठ आणि गुप्त योगमार्ग, योगाचा अधिपति जो कृष्ण परमात्मा तो स्वतः सांगत असतांना मीं प्रत्यक्ष ऐकला ॥ ७५ ॥

राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् ।
केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥

राजन् ( हे राजा धृतराष्ट्रा ) संस्मृत्य ( आठवून ) संस्मृत्य ( आठवून ) संवादं ( संभाषण ) इमं ( हा ) अद्भुतं ( अपूर्व ) केशवार्जुनयोः = केशवस्य च अर्जुनस्य च ( श्रीकृष्णाचा आणि अर्जुनाचा ) पुण्यं ( पवित्र ) हृष्यामि ( मी आनंद पावत आहें, मला हर्ष होत आहे ) च ( आणि ) मुहुः मुहुः ( वारंवार ).

राजन्, केशवार्जुनयोः इमं पुण्यं अद्भुतं संवादं संस्मृत्य संस्मृत्य मुहुः मुहुः हृष्यामि.

हे राजा धृतराष्ट्रा, श्रीकृष्ण आणि अर्जुन यांचा पावन करणारा व अद्भुत असा जो हा संवाद त्याची पुनः पुन्हां आठवण होऊन मला वारंवार अत्यंत आनंद होत आहे ॥ ७६ ॥

तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ।
विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ॥ ७७ ॥

तत् ( तें ) च ( आणि ) संस्मृत्य संस्मृत्य ( आठवून आठवून ) रूपं ( विश्वरूप ) अत्यद्भुतं ( अति अपूर्व ) हरेः ( श्रीहरीचें ) विस्मयः ( आश्चर्य ) मे ( मला ) महान् ( मोठा ) राजन् ( हे राजा ) हृष्यामि ( मला आनंद होतो ) च ( आणि ) पुनः पुनः ( वारंवार ).

राजन्, हरेः तत् च अद्भुतं रूपं संस्मृत्य संस्मृत्य मे महान् विस्मयः ( जातः ) च पुनः पुनः हृष्यामि.

हे राजा, श्रीकृष्णाच्या त्या अति अपूर्व विश्वरूपाचें राहून राहून ( वारंवार ) स्मरण होऊन मला फार आश्चर्य वाटतें आणि पुनः पुनः मला आनंद होतो ॥ ७७ ॥

यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ ७८ ॥

यत्र ( जेथें ) योगेश्वरः ( योगाचा अधिपति ) कृष्णः ( श्रीकृष्ण ) यत्र ( जेथें ) पार्थः ( पार्थ, अर्जुन ) धनुर्धरः ( धनुष्य धारण करणारा शूरवीर ) तत्र ( तेथें ) श्रीः ( संपत्ति, लक्ष्मी ) विजयः ( जय ) भूतिः ( सौख्य ) ध्रुवा ( अचल ) नीतिः ( नीति ) मतिः ( मत ) मम ( माझें ).

यत्र योगेश्वरः कृष्णः यत्र धनुर्धरः पार्थः तत्र श्रीः विजयः भूतिः ध्रुवा नीतिः ( इति ) मम मतिः ( अस्ति ).

जेथें योगाचा अधिपति श्रीकृष्ण आणि जेथें धनुर्धारी अर्जुन विद्यमान् आहेत तेथें संपत्ति, जय, सौख्य आणि निरंतरची नीति हीं असावयाचींच असें माझें मत आहे ॥ ७८ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे मोक्ष संन्यास–योगो नामाष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥



समाप्त.

